लाल । कपाळीं कुंकुम चिरी लाल । भांगीं भरून गुलाल । मुखीं विडा रंग लाल । जसें डाळिंबीचें फुल । ऐशा आल्या पांच गौळणी ॥४॥ पांचवी गौळण हिरवा रंग । अवघ्या झाल्या दंग । हिरव्या कांकणाचा पट्टा रंग । जसें आरशांत जडलें भिंग । फुगडी खेळतां कृष्णासंग । एकनाथ अभंग । ऐशा आल्या पांच गौळणी ॥५॥

९७. दुडिवरी दुडी गौळणी साते निघाली । गौळण गोरस ह्मणों विसरली ॥१॥ गोविंदु घ्या कोणी दामोदरु घ्यागे । तंव तंव हासती मथुरेच्या गे । दुडिया माझारीं कान्होबा झाला भारी । उचंबळे गोरस सांडे बाहेरी ॥२॥ एकाजनार्दनीं सबलस गौळणी । ब्रह्मानंदु न समाये मनीं ॥३॥

९८. गौळणीचा थाट निघाला मथुरे हाटालागीं । तें देखोनी जगदीश धांवला गोप घेउनी वेगीं ॥१॥ कान्ह्या सरसर परता नको आडता येऊं । तुझा संग झालिया मग मी घरा कैसी जाऊं ॥ ध्रु० ॥ सासुरवासिनी आह्मी गौळणी जाऊं देरे हरी । बहु वेळ लागतां सासु सासरे कोपतील घरीं । आह्मीं वहुजणीं येकला तूं शारंगपाणी दिससी येथें । हृदयमंदिरीं ठेउनी तूतें जाऊं मथुरा पंथें ॥२॥ एकाजनार्दनीं ब्रह्मवादिनी गोपीया बरवंटा । कृष्णपदीं त्या लीन झाल्या पूर्णपणें तन्निष्ठा ॥३॥

९९. मथुरेसी गोरस विकूं जातां नितंबिनी । तयांमाजी देखिली राधिका गौळणी । जवळी जाऊनियां धरिली तिची वेणी ॥१॥ सोडीं सोडीं कान्हा शारंगपाणी । माझीया संसारा घातिलें पाणी । नांव रूप माझें बुडविलें जनीं ॥२॥ राधा ह्मणे येथोनियां बहु चाट होसी । घरीं चोरी करूनियां वाटे अडविसी । ओढोनियां नेतें आतां तुज मातेपाशीं ॥३॥ धरिली पदरीं राधा न सोडीच निरी । दान दे आमुचें ह्मणे मुरारी । भोंवतालीं हासती व्रज सुंदरी ॥४॥ भक्तीचिया पोटीं राधा समरस जाली । कृष्णरूप पाहूनियां देहभावा विसरली । एकाजनार्दनीं राधा शेजे पहुडली ॥५॥

१००. फणस जंबीर कर्दळी दाटा । हातीं घेउनी नारंगी फाटा ॥१॥ वारियानें कुंडल हाले । डोळे मोडित राधा चाले ॥२॥

राधा पाहुन भुलले हरी । बैल दुभे नंदाघरीं ॥३॥ हरी पाहूनि भुलली चित्ता । राधा घुसळी डेरा रिता ॥४॥ मन मिनलेंसे मना । एका भुलला जनार्दना ॥५॥

१०१. पहाहो पहा वृंदावनीं आनंदु । क्रीडा करी यशोदेचा बाळ मुकुंदु ॥१॥ गोपाळ गौळणी मिळोनी गोधनें । काला वांटी हमामा खेळे मांडोनि देहुडें ठाणें ॥२॥ रासमंडळ रची आडवितसे गौळणी । जाऊनियां धरी राधिकेची वेणी ॥३॥ एकाजनार्दनीं धन्य सुख तयांचें । वाउग्या ते क्रोध आणुनी बोलती वाचे ॥४॥

१०२. नानापरी समजाविलें परी न राहे श्रीहरी । दहींभात कालवोनि दिला वेगीं झडकरी । कडेवरी घेऊनियां फिरलें मी द्वारोद्वारीं ॥१॥ राधे राधे राधे राधे घेईं शाम सुंदरा । नेईं आतां झडकरीं आपुलिया मंदिरा ॥ ध्रु० ॥ क्षणभरी घरीं असतां करी खोडी शारंगपाणी । खेळावया बाहेरी जातां आळ घेती गौळणी । थापटोनि निजवितां पळोनि जातो राजद्वारा ॥२॥ राधा घेऊनि हरीला त्वरें जात मंदिरीं । हृदय मंचकीं पहुडविला श्रीहरी । एकाजनार्दनीं हरीला भोगी राधा सुंदरा ॥३॥

१०३. करूं देईना मज दूध तूप बाई । मथितां दधि तो धरी रवी ठायीं ठायीं । हट्ट हा कदापि तुमचे समजाविल्यास काई । समजाउनी यातें तुझ्या घरास नेईं नेईं ॥१॥ राधे हा मुकुंद कडिये उचलोनी घेईं घेईं । रडतांना राहिना करूं यास गत काई ॥धु०॥ हरिसी आनंदें राधा मृदु मृदु बोलवीती । पाळण्यांत तुला कृष्णा निजवोनी हालविती । गृहा नेऊनियां दहींभात कालविती । यशोदेसी सोडीं कान्हा माझ्याजवळीं येईं येईं ॥२॥ हट्ट मोठा घेतो मला छळितो गे राधे पहाणें । असाच हा नित्य राधे हरि घरा नेत जाणें । उगाचि हा निश्चळ कैसा त्वां समजावल्यानें । तुझी धरितें हनुवटी यासी गृहां नेईं नेईं ॥३॥ गोविंदा गोपाळा कृष्णा मुकुंदा शेषशाई । जगज्जीवना गोकुळभूषणा गोपी भुलवणा बाई । उगा नको रडूं कृष्णा यशोदेसी सोडीं तूंही । एकाजनार्दनीं शरण राधे घेउनी यासी जाईं ॥४॥

१०४. कृष्णलाजे ती राधा राहे घरीं । जीवनालागीं जिवें जीव भारी । कृष्ण दृष्टी तो गाश्री तुरे उरी । यमुने जातां सन्मुख देखे हरी ॥१॥ कृष्ण पावलावो हरी पावलावो ॥ध्रु०॥ एकाएकी एक हा एकटु । माझ्या संसारा झाला शेवटु । मी पतिव्रता तो दों-बलो आलगटु । आपपर नाहीं तूं होरी क्रिया नष्टु ॥२॥ दृश्य न दिसे तंव जाली दुपारी । रळीया वासना ते चास फेडी हरी । सुटली लिंग देह गांठी अभ्यंतरीं । सरसर निर्लज्जा गी परात्पर नारी वो ॥३॥ कृष्णा मार्गें मार्गें ते माया आली जाणा । पुसे यशोदा बा काय जालें कान्हा । येरू स्फुंदस्फुंदें करितो रुदना । भाव चेंडु चोरिला गोपांगना वो ॥४॥ गोपी म्हणती हा वर्मनष्ट कुडा । क्रिया प्रमाणेसी बोलयाचा खुडा । हा बोलतो आवडीच्या चाडा । कृष्ण ह्मणे तूं माग इसी झाडा वो ॥५॥ वासना वारा तें फेडी प्रमदा । भाव चेंडूवातें तंव देखे यशोदा । हरी कृष्ण येरू हांसे खदखदां । स्वेदु-रोमांचित वरी कापत गदगदा वो ॥६॥ नष्ट गवळणी विजन व्यभि-चारी । परा रातली या निर्लज्ज.निर्धारीं । दैवें आलीये या सुकली कुपरी ॥७॥ कृष्णें लाघव तें कैसें केलें पाहे । गोपी उपरमोनी पाठि-मोरी राहे । माया वंदीतसे कान्हयाचे पाय । एकाजनार्दनीं दोष नाहीं वो माय ॥८॥

१०५. गोधनें चाराया जातो शारंगपाणी । मार्गी भेटली राधिका गौळणी । कृष्णा दान मागे निरी आसडोनी । तंव ती देखिली यशोदा जननी ॥१॥ यशोदा ह्मणे नाटका हृषिकेशी । पर-नारीसी कैसा रे झोंबसी । येरु रुदत सांगतो मातेपाशीं । माझा चेंडू लपविला निरीपाशीं ॥२॥ राधिका म्हणे यशोदे परीयेसीं । चेंडू नाहीं नाहीं वो मजपाशीं । परि हा लाटिका लबाड हृषिकेशी । निरी आसडितां चेंडु पडे धरणीसीं ॥३॥ यशोदा ह्मणे चाळका तुझी नारी । मार्गीं येतां क्षण एक मुरारी । एकाजनार्दनीं विनवी श्रीहरी । नाम घेतां पातकें जाती दुरी ॥४॥

१०६. खांद्यावरी कांबळी हातामधीं काठी । चारितसे धेनु सांवळा जगजेठी ॥१॥ राधे राधे राधे राधे मुकुंद मुरारी । पाञ-

वितो वेणु कान्हा श्रीहरी ॥२॥ एकएक गौळणी एकएक गोपाळा । हातीं धरूनि नाचती रासमंडळा ॥३॥ एकाजनार्दनीं रासमंडळ रचिलें । जिकडे पाहे तिकडे अवघें ब्रह्म कोंदलें ॥४॥

१०७. तुझी संगति नाहीं कामाची । मी सुंदरा कोंवळ्या मनाची । मज दृष्टि होईल साची मग तुझी घेईन चर्या ॥१॥ कसें वेड लाविलें कान्हो गोवळीयां ॥ध्रु०॥ माझा वंश आहे मोठ्याचा । तूं तंव यातीहीन गौळ्याचा । ऐक्य जालीया नांव रूपाचा । ठावाचि पुसलीया ॥२॥ तुझ्या अंगांची घुरट घाणी । तनु काय दिसती चोंगळवाणी । मुरली वाजविसी मंजुळवाणी । मनमोहन कान्हया ॥३॥ तुझ्या ठिकाणीं अवगुण मोठा । चोरी करुनी भरिसी पोटा । व्रजनारी सुंदरा चावटा । अडविसी अवगुणीया ॥४॥ सर्व सुखाची कृष्णसंगती । वेणुनादें गाई गोप वेधती । एकाजनार्दनीं हरिरूपीं रमती । त्या व्रज सुंदरीया ॥५॥

१०८. कृष्णाला भुलविलें गोपीनें ॥ध्रु०॥ यशोदे तुझा हा कान्हा राहीना । मी मारीन क्रोधानें ॥१॥ नंदजी तुमचा कृष्ण लाडका । हाका मारितो मोठ्यानें ॥२॥ वेताटी घेउनी नावेंत बैसला । वांचाविलें देवानें ३ एकाजनार्दनीं पूर्ण कृपेनें । नाहीं ऐकिलें मातेनें ४

१०९. गोकुळीं गोमाई गवळणी । तिच्या सुना चवघी जणी । यमुने गेल्या एके दिनीं । त्यांनीं कृष्ण पाहिला ॥१॥ कृष्ण पाहतां मधुसूदन । मोहिलें चवघींचें मन । कृष्णकृष्ण लागलें ध्यान । देहभान विसरल्या ॥२॥ सवें एक होती शेजारीण । आली सदनासी धांवून । गोमाईसी वर्तमान । अवघें विदीत केलें ॥३॥ राखी लपवीं आपुल्या सुना । सुनेचें नख दृष्टी पडूं देईना । जर कां येशील माझे सदना । नासिका चुना तीन बोटें ४ कृष्ण काय ह्मणे तिसी । येणें जाणें नाहीं आम्हासी । जें कां वदलीसी रसनेसी । तिची प्राप्ति तुजलागीं ५ देव ब्राह्मणीचा वेष । धरिता जाला जगन्निवास । हा रस ऐकतां सायास । मूढ जन उद्धरती ६ पांढऱ्या पातळाची कासोटी । जीर्ण चीट वेष्टिलें कंटीं । हातीं घेऊनि धाकुटी । काठी धरुनी चालिली ॥७॥ वाऱ्यासारखी

चाचरी जाये । तोल सांभाळूनि उभी राहे । अवसान धरूनियां पाहे । गोमाईनें देखिली ॥८॥ गोमाई ह्मणे अहो ब्राह्मणी । कोठें जातेस आलीस कोठुनी । आशापाश नाहीं कोण्ही । माझी मीच एकली ॥९॥ करून आली वाराणशी । पुढें जाणें रामेश्वरासी । आणिक जाणें बहु तीर्थांसी । ऐसी गोमाईसीं बोलली ॥१०॥ येवढ्या नगरामध्यें कोणी । दयाळू नाहीं तुजवांचुनी । जागा देई वृंदावनीं । रातचे रात करमीन ॥११॥ अस्ता गेला वासरमणी । सुखें राहें वृंदावनीं । आज्ञा केली इंद्रालागुनी । सत्वर मेघा पाठवीं ॥१२॥ वीज लवली मेघमंडळीं । ढग निघाला तेच काळीं । मेघानें मांडली फळी । जनलोक पहातसे ॥१३॥ मेघानें सोडिल्या धारा । थंडगार सुटला वारा । शामाई कांपतसे थरथरां । गोमाईनें देखिली ॥१४॥ गोमाई ह्मणे अहो साजणी । आंत येई वो ब्राह्मणी । मरूनि जाशील वृंदावनीं । प्रायश्चित्त मजवरी येईल ॥१५॥ मरूनि जाईन वृंदावनीं । परी मी येईना कोणाचे सदनीं । देव राखील मजलागुनी । ऐसी शामाई बोलिली ॥१६॥ इतुका मेघ वर्षला थोर । भिजलें नाहीं तुझें वस्त्र । शामाई ह्मणे आह्मांवर । ईश्वराची बहु कृपा ॥१७॥ तुह्मी शुद्ध ब्राह्मणी । देव तुह्मीं केला ऋणी । आह्मी नरदेहासी येउनी । प्रपंच सदनीं बुडालों ॥१८॥ द्वारावाटें बोलावून । नेत्रीं पाहे अवलोकून । चक्रपाणी ओळखून । चरणीं ठाव मज देई ॥१९॥ आतां उठवेना करूं काई । हातीं धरुनी उठवी गोमाई । कवाड उघडोनी लवलाही । बळें सदनीं लोटली ॥२०॥ बळें सदनीं लोटिलें मला । मजवर बलात्कार केला । मी सांगेन नंदजीला । म्हणोनी गलबला करीतसे ॥२१॥ सदनीं जातां तत्क्षणीं । चवघी उद्धरल्या कामिनी । द्वारापाशीं येउनी । हाका मारी गोमाई ॥२२॥ गोमाई येउनी लागे चरणां । पुनीत केल्या आमुच्या सुना । नासिका लावियेला चुना । पाहून पळे गोविंद ॥२३॥ गोमाई उद्धरली कथा । आपण होउनी श्रोता वक्ता । एकाजनार्दनीं दाता । सत्य वार्ता ही माझी ॥२४॥

११०. मनमोहन मुरलीवाला । नंदाचा आलवेला ॥१॥ भक्तासाठीं तो जगजेठी । कुब्जेसी रत जाला ॥२॥ विदुरा घरच्या भक्षूनि कण्या । परमानंदें धाला ॥३॥ भक्तिसुखें सुखावला । एकाजनार्दनीं निमाला ॥४॥

१११. नंदनंदन मुरलीवाला । याच्या मुरलीचा वेध लागला ॥ १॥ प्रपंच धंदा नाठवे कांहीं । मुरलीचा नाद भरला हृदयीं ॥२॥ पती सुताचा विसर पडिला । याच्या मुरलीचा छंद लागला ॥३॥ स्थावर जंगम विसरुनी गेले । भेदभाव हारपला ॥४॥ समाधि उन्मनी तुच्छ वाटती । मुरली नाद ऐकतां मना विश्रांति ॥५॥ एकाजनार्दनीं मुरलीचा नाद । ऐकतां होती त्या सद्गद ॥६॥

११२. मुरली मनोहररे माधव ॥ ध्रु० ॥ श्रीवत्सलांछन हृदयीं विलासन । दीन दयाघनरे ॥१॥ सुरनर किन्नर नारद तुंबर । गाती निरंतररे ॥२॥ एकाजनार्दनीं त्रिभुवनमोहन । राखीत गोधनरे ॥३॥

११३. तुझ्या मुरलीची ध्वनी । अकल्पित पडली कानीं । विव्हळ जालें अंतःकरणीं । मी घरधंदा विसरलें ॥१॥ अहारे सांवळीया कैशी वाजविली मुरली ॥ ध्रु० ॥ मुरली नोहे केवळ बाण । तिनें हरिला माझा प्राण । संसार केला दाणादीन । येउनी हृदयीं संचरली ॥२॥ तुझ्या मुरलीचा सूर तान । मी विसरलें देहभान । घर सोडोनी धरिलें रान । मी वृंदावनीं गेलें ॥३॥ एकाजनार्दनीं गोविंदा । पतितपावन परमानंदा । तुझ्या नामाचा मज धंदा । वृत्ति तंव पदीं निवर्तली ॥४॥

११४. तुझें श्रीमुख सुंदर । कुसुम शुभकांति नागर । कांसे पीतांबर मनोहर । पाहुनी भूल पडली करुणाघना ॥१॥ मुरली नको वाजवूं मनमोहना ॥ध्रु०॥ सरपरता होय माघारा । देहभाव बुडाला सारा । नाहीं संसारासी थारा । भेद भ्रम गेला कमळनयना ॥२॥ ध्वनि मंजुळ ऐकिली कानीं । सर्व सुखा जाली धणी । एकाजनार्दनीं ध्यानीं मनीं । एकपण जगजीवना ॥३॥

११५. मुरली धरुनी अधरीं । वाजवी छंदें नानापरी । भोंवते

गोपाळ नाचती गजरीं । यमुना तीरीं आनंदें ॥१॥ तो हा नंदनंदन गे माये । त्याचा वेध लागला मज सये । कांहीं केलीया तो न राहे । नाठवे देह गेहगे माय ॥२॥ स्थूल सूक्ष्म कारणापरता । चहु वाचां वेगळा तत्त्वतां । आगमां निगमांही वरता । ज्याचा वेध शिवाचिया चित्तागे माय ॥३॥ अचोज वेदा चोजवेना । श्रुतीशास्त्रां नये अनुमाना । शरण एकाजनार्दना । एकपणें जाणा रावो ठाईं ४

११६. भुलविलें वेणुनादें । वेणु वाजविला गोविंदें ॥१॥ पांगुळलें यमुनाजळ । पक्षी राहिले निश्चळ ॥२॥ तृणचरें लुब्ध जालीं । पुच्छ वाहूनियां ठेलीं ॥३॥ नाद न समाये त्रिभुवनीं । एका भुलला जनार्दनीं ॥४॥

११७. कशी जाऊं मी वृंदावना । मुरली वाजवी कान्हा । ॥ध्रु०॥ पैल तीरीं हरी वाजवी मुरली । नदी भरली यमुना ॥१॥ कासे पीतांबर कस्तुरी टिळक । कुंडल शोभे काना । ॥२॥ काय करूं बाई कोणाला सांगूं । नामाची सांगड आणा ॥३॥ नंदाच्या हरीनें कौतुक केलें । जाणे अंतरींच्या खुणा ॥४॥ एकाजनार्दनीं मनीं ह्मणा । देव माहात्म्य कळेना कोणा ॥५॥

११८. सुंदर मुख साजिरें कस्तुरी मळवटीं । मुरली वाजवीत उभा यमुनेचे तटीं । गोपवेष शोभे खांदा कांबळी हातीं काठी । तो नंदनंदन देखिला जगजेठी वो ॥१॥ मंजुळ मंजुळ वाजवी मुरली । ऐकतां माझी चित्तवृत्ति हरली ॥ध्रु०॥ चारी वेद जया गातातो आनंदें । तो गोकुळीं गाई चारी परमानंदें । श्रुतिशास्त्रें वेधलीं जयाचीया छंदें । तया गोवळ ह्मणती कान्हा आनंदें ॥२॥ ऐसी आवडी भक्तीची देखा । उच्छिष्ट खातां कांहीं न धरी शंका । एकाजनार्दनीं भुलला तयाचिया सुखा । वैकुंठ नायकेचि देखा ॥३॥

११९. माझा कृष्ण देखिला काय । कोणी तरी सांगा गे ॥ध्रु०॥ हातीं घेऊनियां फूल । अंगणीं रांगत आलें मूल । होतें सारवित मी चूल । कैसी भूल पडियेली ॥१॥ माथां शोभे पिंपळपान । मेघवर्ण ऐसा जाण । त्याला म्हणती श्रीभगवान । योगी ध्यान विश्रांती ॥२॥ संगें घेउनी गोपाळ । बाळ खेळे आळुमाळ । पायीं पोल्हारे

झळाळ । गळां माळ वैजयंती ॥३॥ एकाजनार्दनीं माय । घरो-घरांप्रती जाय । कृष्णा जाणावें तें काय । कोणी सांगा गे ॥४॥

१२०. भिंगाचें भिंगुलें खांद्यावर आंगुलें । नाचत तान्हुलें यशोदेचें ॥१॥ येती गौळणी करती बुझावणी । लागती चरणीं कान्होबाच्या ॥२॥ गोविंद बाळिया वाजविती टाळिया । आमुचा कान्हया देवराव ॥३॥ कडदोरा बिंदुलीं वाघनखें साजिरीं । नाचत श्रीहरी यशोदेचा ॥४॥ पायीं घागरीया वाक्या साजरीया । कानींच्या बाळया ढाळ देती ॥५॥ एकाजनार्दनीं एकत्व शरण । जीवें निंबलोण उतरती ॥६॥

१२१. एके ऐक सखये बाई नवल मी सांगूं काई । त्रैलोक्याचा धनी तो हा यशोदेसी ह्मणतो आई ॥१॥ देवकीनें वाईलागे यशोदेनें पाळिला । पांडवांचा बंदीजन होऊनियां राहिला गे ॥२॥ ब्रह्मांडाची सांठवण योगीयाचें निज धन । चोरी केली म्हणऊन उखळासी बंधन ॥३॥ सकळ तीर्थें जया चरणीं । सुलभ हा शूलपाणी । राधिकेसी ह्मणे तुझी करीन वेणीफणी ॥४॥ शरण एकाजनार्दनीं कैवल्याचा मोक्षदानी । गाई गोप गोपी बाळा मेळविले आपुलेपणीं ॥५॥

१२२. गवळण म्हणती यशोदेला । कोठें गे सांवळा ॥ कां रथ शृंगारिला । सांगे वो मजला ॥ अक्रूर उभा असे बाईगे साजणी ॥१॥ या नंदाच्या आंगणीं । मिळाल्या गौळणी ॥ध्रु०॥ बोले नंदाची पट्टराणी । सद्गदीत होउनी ॥ मथुरेसी चक्रपाणी । जातो गे साजणी ॥ विव्हळ झालें मन वचन ऐकोनी ॥२॥ अक्रूरा चांडाळा । तुज कोणी धाडिला ॥ कां घात करूं आलासि । वधिसी सकळां ॥ अक्रूरा तुझें नाम तैशीच करणी ॥३॥ रथीं चढले वनमाळी । आक्रांत गोकुळीं ॥ भूमि पडल्या व्रजबाळी । कोण त्या सांभाळी ॥ नयनींच्या उदकानें भिजली धरणी ॥४॥ देव बोले अक्रूरासी । वेगें हांकीं रथासी ॥ या गोपींच्या शोकासी न पाहवे मजसी । एकाजनार्दनीं रथ गेला निघोनी ॥५॥

१२३. उद्धवासी एकांतीं बोले गुज सांवळा । गोकुळासी

जाउनी बोधीं सुंदरी गोपिंबाळा । रथीं बैसोनी निघाला वेगीं पावला गोकुळा । तो उद्धव देखोनी दृष्टीं गोपींनीं वेढिला ॥१॥ उद्धवा जाय मथुरेला । आणीं लौकरी हरीला ॥ध्रु०॥ मुख सुंदर शोभे कपाळीं टिळक रेखिला । नवरत्नजडित मुद्रिका हार कंठीं घातिला । झळकती कुंडलें कानीं शिरीं मुगुट शोभला । मुरली धरुनी अधरीं नाचे यमुना तीरीं देखिला ॥२॥ मथुरेसी राहिला हरी विसरोनी आम्हांसी । कुब्जेनें मोहिला भाळला तिच्या रूपासी । डोळे पिचके खुरडत जे चाले काय वानूं मुखासी । शुद्ध भाव देखोनी तिचा अनुसरला तियेसी ॥३॥ रासमंडळीं नाचे मुरारी कधीं भेटेल तो न कळे। वेणु वाजवी सुस्वर सोज्वळ पदकमळें । धणी न पुरे तया पहातां मन आमुचें वेधिलें ॥४॥ हा अक्रूर कोठोन आला हरि गेला घेउनी । तो वियोग जाळी न जाय जीव आमुचा अझुनी । घरदार सोडोनी जावें गोकुळ हें सांडोनी । उद्धवा कधीं भेटविसी हरीला आणुनी ॥५॥ घडी घडी घरा येतो चोरितो श्रीहरी । तो झडकरी दाखवीं उद्धवा लौकरी । धन्य प्रेम तयाचें सद्‌गदित अंतरीं । एकाजनार्दनीं हरिरूपीं वेधल्या नारी ॥६॥

१२४. कृष्ण आला परिसुनि मथुरे नारी । चपला धांवती अतिसुंदरी । येकीं त्या भोजन कवळ करीं । ऐकी त्या आलीया मार्जन शिरीं ॥१॥ अरे कृष्णा अरे कान्हा मनमोहना । गोपिका भाळल्या तुझिया गुणा । जय जय मानस मनमोहना । जीवीं जीवें गुंतल्या नंदनंदना ॥२॥ कृष्ण दृष्टी पहावया प्राण पिसा । एकी त्या आलिया मुक्त केशा । येकी त्या आलीया विगुतवासा । देह गेह नाठवे कृष्ण मानसा ॥३॥ कृष्णदृष्टी पहावया वेगु कामिनी । अस्ताव्यस्त इंद्रियां बाणलीं लेणीं । एकी त्या आलीया कर्म सांडोनी । तनुमन वेधिल्या सारंगपाणी ॥४॥ एकी त्या काजळ सुदल्या मुखीं । जावड कुंकम लाविती नाकीं । तांबूल विडीया खोविती मस्तकीं । कृष्णादृष्टी इंद्रियां नाहीं वोळखी ॥५॥ येकी त्या तानवडें लेइल्या पायीं । पायींचीं पोल्हारें कानींवो बाई । वाळे वाक्या बांधल्या कंठाचे ठायीं । लाहे लाहे नेपुरें बांधलीं डोई ॥६॥ येकी त्या

आलिया चोखण शिरीं । नागवें शरीर नेणें सुंदरी । मोतीयाचे हार नेसल्या नारी । पाटाउ विसरल्या घरच्या घरीं ॥७॥ एकी त्या अ-र्धांगीं लेइल्या चोळी । गुडगीया बांधिली मोतिया जाळी । नाकींचें मुक्ताफळ खोविती भाळीं । देह गेह नाठवे कृष्ण स्नेहाळीं ॥८॥ एकी त्या कडीये घेतिल्या झारी । बाळकें विसरल्या घरींच्या घरीं । दृष्टीं सम दृश्य न दिसे नारी । पुत्र स्नेहे नाठवे देखोनी हरी ॥९॥ रंगीं रंगल्या आल्हादें भारी । आपपर नाठवे तया सुंदरी । एका-जनार्दनीं वेधल्या नारी । परतोनी संसारा तुरेची उरी ॥१०॥

१२५. यमुनेचे तीरीं नवल परी वो । तेथें गोपाळ वत्सें स्वयें झाला हरी वो ॥१॥ नवल देखा ठक तिन्ही लोकां । भुली ब्रह्मादिकां पार नाहीं सुखा ॥२॥ कृष्णवत्साची ध्वनी गाई पान्हा । तेथें बोळलें निराळें विस्मयो गौळीजना ॥३॥ गोपाळाचे वचनीं सुखें सुखा भेटी । तेथें वोसंडला आनंद माय कृष्णीं भेटी ॥४॥ ऐसा रचिला आनंदु देखोनी निवाडा । तेथें सृष्टीकर्ता तोहि झाला वेडा ॥५॥ ऐसें अचोज पैं मना नये अनुमाना । अचुंबीत करणें एका-जनार्दना ॥ ६ ॥

१२६. न माये चराचरीं त्रैलोक्य उदरीं । तो यशोदेचे कडे-वरी शोभतो कैसा ॥१॥ गोपवेष मिसें ब्रह्मीया लाविलें पिसें । तो गोपवत्सवेषें शोभतो कैसा ॥२॥ एके घटिकेवरि सोळा सहस्र घरीं । नोवरा श्रीहरी शोभतो कैसा ॥३॥ अनंगेंविण अंगें गोपी भोगिल्या श्रीरंगें । तो कृष्ण निजांगें शोभतो कैसा ॥४॥ सच्चिदानंदघन तान्हुलें आपण । एकाजनार्दन शोभतो कैसा ॥५॥

१२७. सुंदर बाळका म्हणती गोपिका यशोदा रोहिणी सन्मुखा । आदि नाटका नाच व्यापका मिळालिया अनेका । सर्व पाळका सकळ चाळका सुखदाता सकळिका । धिमी धिमी बाळा नाचे वहिला म्हणती मायादिका ॥१॥ कृष्णा नाचरे व्यापका । म्हणताती गोपिका ॥ ध्रु० ॥ दण दण मेदिनी वाजत वाम चरण-निघातें । थोंगीत थोंगीत थाक तोडीत चित्त अनुकारें संगीतें । टाळछंदें मन वेधे टाळी वाजे अनुहातें । धिम

धिम धिमतांग थोंकीत तालछंदें सांवळें नाचतें ॥२॥ गुप्त प्रगटीत थाक दावित स्थूळ सूक्ष्म आनंदें। धिगीतां धिगीतां वाजती गजरें शास्त्राचेनी विवादें। घटतनं घटतनं शब्दें बोलती तार्किक गेले भेदें। गर गर गर गर भोंवरी देत अवतार संबंधें ॥३॥ रुणुझुणु रुणुझुणु वाजती श्रुति नेति नेति उच्चारी। आत्मा हा व्यापक नाटक त्रैलोक्य पडलें फेरी। यशोदा रोहिणी वृद्ध गौळणी नाचत देह विसरीं। पक्षी चारा विसरले पवन मुख पसरे अंबरीं ॥४॥ देव विमानीं पहाती गगनीं ब्रह्मा नाचताहे येउनी। इंद्र ऐरावत नाचत जवळील बृहस्पति तो मुनी। गण गंधर्व देव सर्व तेहतीस कोटी मिळोनी। कुबेर पोटा नाचत मोठा कृष्णछंद घेउनी ॥५॥ शेष वासुकी नाचत वेगीं चवदा भुवनें माथां। वराह गाढा पृथ्वी दाढां नाचे विसरुनी चिंता। तृणें तरुवरें पर्वत कुंजर लाचावले अनंता। सगुण निर्गुण जंगम स्थावर वेधले अच्युता ॥५॥ घुळु घुळु घुळु घुळु कंकण वाजती वाहुभूषित भूषाणें। तो परात्पर त्रैलोक्य सुंदर जगाच्चिया जीवना। खुणखुण बोलती संत घांगुरले हरी चरणा। दृष्टीं देखिला सबाह्य निवाला एका शरण जनार्दना ॥७॥

१२८. गोकुळीं लाघव दावितो चक्रपाणी। भोंवत्या वेष्टित बैसल्या अवघ्या गौळणी। मध्यें सुकुमार सांवळा शारंगपाणी ॥१॥ चिमणा पितांबर पिंवळा। गळां वैजयंती माळा। घवघवीत घनसांवळा। पाहे नंदराणी ॥२॥ नाचरे तूं कृष्णा मज पाहूंदे नयनीं ॥ध्रु०॥ नाचतो सांवळा सुंदर निमासुर वदन। वाके घोळ घागरीयांचा झणत्कार पूर्ण। आकर्ण नयन सुहास्य वदन। पाहुनी भुले मदन ॥३॥ हातींच्या मुद्रिका झळकती। क्षुद्र किंकिणी सुस्वर गाती। वाकी नेपुरें ढाळ देती। पहाती गौळणी ॥४॥ सप्तही पाताळें नाचती हरीचिया छंदें। आकाश धरणी स्वर्गीं देव नाचती आनंदें। गण गंधर्व देव सर्व अक्षर हरिपदें ॥५॥ वैकुंठ कैलास नाचती। चंद्र सूर्य रस नायक दीप्ति। ऋषिमंडळ थाक तोडिती। अद्भुत हरिकरणी ॥६॥ नाचती हरिपदें चतुर्दशलोकपाळ। शेष वासुकी नाचती सर्वही फणीपाळ। परिवारेसी नाचती पृथ्वीचे भूपाळ ॥७॥ मेरु पर्वत

भोगी नायक । वनस्पति नाचती कौतुक । वेदशास्त्र पुराण पावक । नाचत शूळपाणी ॥८॥ नाचती गोपाळ गोपिका सुंदर मंदिरें । उखळें जाती मुसळें पाळीं आणि देव्हारे । धातुमूर्ति नाचूं लागल्या एकसरें ॥९॥ गौळणी अवघ्या विस्मित । देहभाव हरपला समस्त । यशोदेसी प्रेम लोटत धरिला धाउनी ॥१०॥ शिणलासी नाचतां आतां पुरे करीं हरी । विश्वरूप पहातां गोपी विस्मित अंतरीं । यशोदेनें कृष्ण घेतला कडीयेवरी ॥११॥ एकाजनार्दनीं भक्तिभावें । अनन्य भक्तां दावी लाघव । निज भक्तांचें काज सर्व । करितां शिण न मानी १२

१२९. प्रथम मत्स्यावतारीं तुमचें अगाध चरित्र । न कळे ब्रह्मादिका वैष्णव गाती पवित्र ॥१॥ उठोनी प्रातःकाळीं गौळणी घुराळण घुसळिती । गाती कृष्णाचे पोवाडे हृदयीं परोपरी ध्याती ॥२॥ द्वितीय अवतारीं आपण कच्छ रूप जाला । सृष्टि धरुनी पृष्ठीं शेवटीं सांभाळ केला ॥३॥ तृतीय अवतारीं आपण वराहरूप झाला । धरणी धरुनी दाढे हिरण्याक्ष वधिला ॥४॥ चतुर्थ अवतारीं आपण नरहरि रूप । रक्षुनी प्रल्हाद वधिला हिरण्यकश्यप ॥५॥ पांचवे अवतारीं आपण वामन झाला । बळी घालुनी पाताळीं शेखीं द्वारपाळ ठेला ॥६॥ सहावे अवतारीं आपण परशुराम झाला । धरुनी परशु हातीं सहस्रभुजा वध केला ॥७॥ सातवे अवतारीं आपण दाशरथी राम । वधोनी रावण कुंभकर्ण सुखी देव परम ॥८॥ आठवे अवतारीं आपण वसुदेवा घरीं । वधोनी कंसादिक असुर मारिले भारी९ नववे अवतारीं आपण बौद्धरूप झाला । धरुनियां मौन भक्तांघरीं राहिला ॥१०॥ दहावे अवतारीं आपण झालासे वारु । एकाजनार्दनीं वर्णिला त्याचा बडिवारु ॥११॥

१३०. उठोनी प्रातःकाळीं ह्मणे यशोदा मुरारी । गोपाळ वाट पहाती उभे तुझ्या द्वारीं । शिदोरी घेउनी वेगीं जाय राना ॥१॥ यमुनेचे तीरीं खेळ खेळतो कान्हा । नानापरी क्रीडा करी यादवांचा राणा ॥ध्रु०॥ मागें पुढें गोपाळमध्यें चाले हरी । सांवळा सुकुमार वाजवी मुरली अधरीं । पुच्छें वर करुनी गाई नाचती नाना ॥२॥ मुरलीचा नाद न समाय त्रिभुवनीं । कितीएक नादें भुलल्या गौळणी ।

देहगेह सांडोनी चालताती वना ॥३॥ खग मृग गायी व्याघ्र वसे तुजा भाव । सकळीं उच्चारण एक कृष्ण नांव । काया वाचा मनें शरण एकाजनार्दना ॥४॥

१३१. अविद्या निशीचा लोटला पहार । रजेंसी लोपला तम- अंधकार । सत्त्व शोधित शुद्ध सुमन हार । प्रबोध पाहतां परतला कृष्ण वीर वो ॥१॥ आलारे आलागे ह्मणती पहा कृष्ण । जैसा निर्जीवा मिनला जीवप्राण । श्रुति परतल्या आत्म साक्षात्कार देखोन । तैशा विव्हळ गोपिका हरि पाहून ॥२॥ कृष्णापाशीं मिनल्या व्रजनारी । कांहो निष्ठुर तूं जालासी हरि । स्नेह धरिती तयासी होसी दुरी । लोभु सांडिती त्यापाशीं निरंतरीं वो ॥३॥ थोर शिणलाती तुह्मी मजविण । माझे स्वरूपीं ठेविला जीव प्राण । माझे भेटिसी तंव नाहीं खंडन । सबाह्य अंतरीं माझें अधिष्ठान वो ॥४॥ ऐसें वचन ऐकोनी हरी मुखें । थोर चकल्या वियोगाचे दुःखें । आह्मां मारिलें शस्त्राविण वचन तिखें । शेखीं हें ना तें केलें रंग- दोषें वो ॥५॥ कृष्णीं गोपिका वेधल्या एका मनें । मागा गुरुडती प्रीति प्रेमाचें रुसणें । जेवीं श्रुति परतल्या नेति या वचनें । एका- जनार्दनीं धरुनी ठेल्या मौन्यें वो ॥६॥

१३२. भक्ति गोकुळीं नवविधा नारी । गजरे चालती गारी वो ॥ सुनीळ जळीं अति संतोषें । क्रीडती यमुना तीरीं वो ॥१॥ स्थिर स्थिर माधवा विचार धरीं । आम्ही परात्पर परनारी ॥ वासना वास अलक्ष लक्षोनी । वस्त्राची करिसी चोरीरे ॥२॥ आकंठ मग्न सुनीळ निरी । घन सांवळा देखोनि वरी ॥ येथोनि निघतां लाज मोठी । विनोद न करीरे ॥३॥ लाज सांडोनि धरा चरण । तंव मी होईन प्रसन्न ॥ एकाजनार्दनीं निःशंक झाल्या । जीवींची जाणूनि खूण वो ॥४॥

१३३. कृष्णरूपीं भाळल्या गोपिका नारी । नित्य नवा कृष्ण जीवा आवडतो भारी । पवन वेगीं चालिल्या कालिंदी तीरीं । चिदानंद भावें भोगावा श्रीहरी ॥१॥ वाजती गाजती अनुहत टिपरी । बारा सोळा मिळोनी गौळयाच्या नारी । प्रातःकाळीं जाती

22657.

यमुना तीरीं । कृष्ण प्राप्तिलागीं पूजिती गौरी ॥२॥ एकमेकीतें खुणाविती दृष्टी । हरिरूपीं आवड जीवा लागली मोठी । समर्थी एकांत होईल काय भेटी । मनींचें आर्त सांगूं गुज गोष्टी ॥३॥ कृष्णरूपीं वेधल्या विसरल्या अन्नपान । माया विलास नेघे अंजन चंदन । रात्र आणि दिवस कृष्णाचें ध्यान । एकाजनार्दनीं चरणीं वेधलें मन ॥४॥

१३४. चंद्राहुनी शीतळ रवीहुनी सोज्वळ । तेणें मज केवळ वेधियेलें ॥१॥ वेध कैसा मज लागला वो बाई ॥ध्रु०॥ अमृताहुनी स्वादु गगनाहुनी मृदु । रूपेंविण आनंदु देखिला बाई ॥२॥ एकाजनार्दनीं आनंदु परिपूर्ण । कायावाचा मनें वेधिलें वो बाई ॥३॥

१३५. आजी वो कांहो कृष्ण नाहीं आला । ह्मणोनि खेद करी गौळणी बाळा । काय वो ऐसा देहीं लागला चाळा । कांरे न येसी बाळा नंदाचिया ॥१॥ कवण देवा नवसीं नवसूं । कवणा गुरूतें मार्ग पुसूं । कैं भेटेल हा हृषिकेशू । ह्मणोनि मन जाहलें उदासू ॥२॥ हा कृष्ण आजी कां घरीं नये । आतां काय करूं यासी उपाय । एकाजनार्दनीं धरूं जाय पाय । तैंच दरुशन होय आजी याचें ॥३॥

१३६. दिव्यतेज झळकती रत्नकीळा फांकती । अगणीत लावण्य तेजप्रभा दिसतीगे माये ॥१॥ कानडा वो सुंदर रूपडागे । अंतरीं बाहेरीं पहातां दिसे उघडागे ॥२॥ आलिंगनालागीं मन उतावीळ होय । क्षेम देतां माझें मीपण जाय ॥३॥ मागें पुढें चहूंकडे उघडें पाहीं । पाहावयासी गेलें मजला ठक पडलें बाई ॥४॥ बाहेरी पाहूं जातां अंतरीं भासे । जें जें भासे तें तें येकीयेक समरसें ॥५॥ एकाजनार्दनीं जिवींचा जिव्हाळा । एकपणें पहातां न दिसे दृष्टीवेगळा ॥६॥

१३७. देह गेह कर्म सारूनी । शेजे पहुडली निज समाधानीं । कृष्ण वेणु गीत ये श्रवणीं । वृत्ति उचलली भेटी लागुनी वो ॥१॥ जवीं लागलें हरीचें ध्यान । कांहीं केलिया न राहे मन । प्रेम पडींभरें येतसे स्फुंदोन । हरिचरणीं तें वेधिलें मन वो ॥२॥ लाज सांडोनी जालें निर्लज्ज । सासु सासऱ्यासी नाहीं मज काज । माया माहेर

अंतरलें सहज । हरिचरणीं तों वेधलें निज वो ३ चिदाकाशींचें स्वच्छ चांदिणें । कृष्ण प्रभा ते चंद्र परिपूर्ण । ध्येय ध्यातां खुंटलें तेणें गुणें । एकाजनार्दनीं सहज एकवर्णे वो ॥४॥

१३८. ज्ञाति कूळ सांडिलें आह्मीं वेगीं । माया माहेर त्यजिलें तुजलागीं । अंग अर्पिलें अंगींचीये अंगीं । शेखीं रतलासि दासी कुब्जेलागीं ॥१॥ सर रार निर्गुणा तूं अगुणाचा हरी । जवळी असतां जालासी कैसा दुरी । चित्त उतटे चिंतितां निरंतरीं । मन मावळलें न दिसे दृश्याकारीं वो ॥२॥ तुजलागीं सांडिला देहरंग । तुजविण विटला विषयभोग । जळो तुझा उपदेश सांगसी योग । आह्मां देई सप्रेम संयोग ॥३॥ एक म्हणती गे सांडा शब्द आटी । शब्दा नातुडे कोरड्या ज्ञान गोष्टी । आजिचा सुदीन श्रीकृष्णीं झाली भेटी । हरुषें निर्भर स्वानंदें भरली सृष्टी ॥४॥ एक म्हणती गे सांडा शब्दज्ञान । ध्येय जोडलें काईसें आतां ध्यान । भज्य भजक एक झाले भजन । गेली दिपुटी मिथ्या मोक्ष बंधन । ॥५॥ एक म्हणतीगे चला मांडू रासू । क्षणे उगवेल मायामय दिवसू । दैवें जोडला गे कृष्ण परमहंसू । शोधा निज तत्त्व सांडोनि आळसू ॥६॥ गोपी मंडळी मिळाली कृष्णापाशीं । जैशा रश्मि मिनल्या रविबिंबाशी । कृष्ण भोगितां नाठवे दिननिशी । एकाजनार्दनीं ऐक्यता प्रेमेंसी ॥७॥

१३९. कृष्ण मूर्ति होय गे कळों आली सोय गे । प्राणाचाही प्राण पहातां सुख सांगूं काय गे ॥१॥ तुळशी माळ गळां गे कस्तुरीचा टिळा गे । अर्धांगीं रुक्मिणी विंझणे वारित गोपी बाळा गे ॥२॥ पीतांबराची कारा गे कसिली सावकाश गे । नारद तुंबर गायन करती पुढें निजदास गे ॥३॥ भक्त कृपेचि माय गे वोळखिली विठाई गे । एकाजनार्दनीं विटे जोडियेले पायगे ॥४॥

१४०. चला बाई वृंदावनीं, रासक्रीडा पाहूं । नंदाचा बाळ येणें केला नवलाऊ ॥१॥ कल्पनेची सासू इचा महुताचे ग्राचू । देह भाव ठेउनी पायीं ब्रह्मपदीं नाचूं २ सर्व गर्व सोडूनि बाई चला हरीपाशीं । द्वैतभाव ठेवुनी पायीं हरीरूप होशी ॥३॥ एकाजनार्दनीं विश्वव्यापक हा देव । एक एक पाहतां अवघें स्वप्रवत भाव ॥४॥

१४१. ब्रह्म कैसें वेडावलें गे बाईये ॥धु०॥ निर्गुण होते सगुणा आलें । त्रिभुवन उद्धरिलें बाईये ॥१॥ घेउनी वसुदेवें गोकुळा नेलें । यशोदेनें खेळविले गे बाईयें ॥२॥ एका एकपण तेंही नेलें । जनीं जनार्दन केलेंगे बाईये ॥३॥

१४२. काळी घोंगडी हातीं काठी । लागला धेनुचे पाठीं ॥१॥ अरे हरी व्रज वांकुडा कीं तुजसाठीं । बैसला यमुनेचे तटीं ॥२॥ राधा गोरटी हातीं वाटी । लागली कृष्णाचे पाठीं ॥३॥ एकाजनार्दनीं झाली दाटी । घातली पायांवर मिठी ॥४॥

१४३. देखिला अवचिता डोळां सुखाचा सागरु । मन बुद्धि हारपली झाले एकाकारु । न दिसे काया माया कृष्णीं लागला मोहरु ॥१॥ अद्वया आनंदारे अद्वया आनंदारे । वेधियल्या कामिनी अद्वया आनंदारे ॥२॥ खुंटलें येणें जाणें घर सासुर । नाठवे आपपर वेधियेलें सुंदर । आतें सबाह्य व्यापिलें कृष्ण परात्पर नागर वो ॥३॥ सावजी कळलें आतां लोधलें निर्गुणा । एकाजनार्दनीं कृपा केली परिपूर्णा । गगनीं गिळियलें येणें उरी नुरेचि आपणा ॥४॥

१४४. मैं दधी बेचन चलि मथुरा । तुम कैंव थारे नंदजीको छोरा ॥१॥ भक्ति का आचला पकडा हरी । मत खेचो मोरी फारी चुनरी ॥२॥ अहंकारका मोरा गरगा फोरा । म्हाको गोरस सबही गीरा ॥३॥ द्वैतनकी मोरी आंगीया फारी । क्या कहूं मैं नंगी नार उघारी ॥४॥ एकाजनार्दन ज्यासो भेटा । लागत पगसे कबु नहीं छुटा ॥५॥

१४५. मारी गावडी चुकलीछे भाई । देखन देखन त्रिभुवनछे आई । उन शोधन लागछे भाई । अब कैसीगत करुछे आई ॥१॥ मथुरा लमानीन मारो नामछे । गावडी देखत आई गांवछे । दृष्टी देखन नही मनछे । कैसे भुलाय कान्हयानछे ॥२॥ भुली भुली आई मानछे । कही मीलन मोरे ध्यानछे । एकाजनार्दनसे पगछे । अखंड चित्त जडे गावडीछे ॥३॥

१४६. दे दे दे मोरी कन्हया लाल साडीछे । तुम भलो नंदजी नंदन लालछे ॥१॥ मैतो आई मथुरा हाटछे । बिसरी तूं क्या भरे घाटछे कन्हया ॥२॥ ज्याकर बोलूंगी जसोदानंदछे । तारी खोड

तोडुंगी हातछें कन्हया ॥३॥ एकाजनार्दन विनती करतछे । दोनो हात जोडकरछे कन्हया ॥४॥

१४७. भुली भटकी आई कान्हा तोरे गांवछे । मारो नंदनंदन चित्त जडो तोरे पावछे लालना ॥१॥ चली आई परपंच हादरो । तूं कैव धरीयो मेरे वाटछे ॥२॥ आव तूं नंदनंदन लालछे । मैं गारी देऊं तुजसे लालना ॥३॥ एकाजनार्दन नाम तोरे गांवछे । पीरीत बसे तोरे चरणछे लालना ॥४॥

१४८. हो भलो तुम नंदन लालछे । मुजे गावडी बतावछे १ आगल पिछील ध्यानमे आवछे । मंगल नाम तोरा मैं गावछे ॥२॥ तारो सुंदर रुप मोरे मनछे । प्रीत लगी कान्हा हगछे ॥२॥ एकाजनार्दनीं तोरे नामछे । गावत ध्यावत हृदयमेंछे ॥४॥

१४९. याहांकी बात नही मेरी आवछे । तोरे चरणकमल मैं ध्यावछे ॥१॥ सुंदरतु नंदनंदन लालछे । गळां शोभे वैजयंती मालछे ॥२॥ पीत पीतांबर घोंगरीयाछे । गोपाळ नाचती तोरे सातछे ॥३॥ एकाजनार्दनीं रखत गावडीछे । चित्त जडे मोरे पावडीछे ॥४॥

१५०. देखे देखे गे जशोदा मायछे । तोरे छोरीयानें मुजे गारी देवछे ॥१॥ जमुनाके पानीया मैं ज्यावछे । बीच गीलके घागरीया फोडछे ॥२॥ मैंने ज्याके हात पकरछे । देखे आपही रोवछे मायना ॥३॥ एकाजनार्दन गुन गावछे । फेर जन्म नही आवछे मायना ॥४॥

१५१. देवरे देवरे मोरी घागरीया लालछे । मैं बोलुंगी जशोदा मायछे ॥१॥ हाम रहो नंदसे नामछे । तारो भीड नही गारो कागछे ॥२॥ आकर पकरीयो मोरे आंगछो । मैं लाजे न आइगे मा आवछो ॥३॥ एकाजनार्दनीं तोरे पुत्रने हामछे । फजीतीनें मानली आइछे ॥४॥

१५२. मैं ज्यावगी छोरकर तोरे गांवछे । तूं खोरी मतकर मोरे लालछे ॥१॥ मोरे घर तूं आकर लालछे । माखन चुरावत आपने हातछे २ मैं कहुंगी तोरे मातछे । किसननें चोरी करी गोरी घरछे ॥३॥ कहे एकाजनार्दन लालछे । चरण पकरु मो तुमछे ॥४॥

१५३. माई मोरे घर आयो शामछे । गावढी छोडी मोरे मनछे ॥१॥ दधी दुध माखन चुरावे हमछे । छोकरीया खिलावन देवछे २ मारी सुसोवन लगीछे । बालन उनके पकड लीनछे ॥३॥ एकाजनार्दन थारो छोरेछे । बेड लगाये माई हामछे ॥४॥

१५४. हामे आपले सोवेले घरछे । रात आयो थारो शामछे ॥१॥ मारी वेनी पकड करी हातछे । दाढी बांधी गाठछे ॥२॥ मोरी घागरीया फोर करछे । भागन गयो आप घरछे ॥३॥ एकाजनार्दनीं तोरे शामनेछे । मोरो संसारको नाशछे ॥४॥

## विरहिणी.

१५५. कसा मला टाकुनी गेला राम ॥ध्रु०॥ रामाविण जीव व्याकुळ होतो । सुचंत नाहीं काम ॥१॥ रामाविण मज चैन पडेना । नाहीं जीवासी आराम ॥२॥ एकाजनार्दनीं पाहुनी डोळा । स्वरूप तुझें घनशाम ॥३॥

१५६. वेधला जीव माझा भेटवा श्रीरंग । सर्व सांडियेला मोह ममता संग । जीवीं जीवलग जाला अनंग । भेटवा भेटवा मज श्रीरंग ॥१॥ ऐशी विरहिणी बोले बोली । कां रे हरी तूं सांडी केली ॥ ध्रु० ॥ समभाग तुज पहावया । मन आमुचें गुंतलें देवराया । तूं तंव मध्यें घालिसी माया । नको आतां विरह पाया ॥२॥ आमुचा विरह कोण निवारी । विरहिणी बोले ऐशीया परी । एकाजनार्दनीं विनवी श्रीहरी । जन्ममरणाचा विरह निवारीं ॥३॥

१५७. कोण्या वियोगें गुंतला कवणें हातीं । परापश्यंती मध्यमा जया ध्याती । श्रुति शास्त्र जया भांडती । तो कांहो रुसला श्रीपती ॥१॥ येईं येईं कान्हा देईं आलिंगन । भेटी देऊनि पुरवीं पूर्ण मनोरथ । विरहविरहा करी समाधान । दावीं तूं आमुले चरण ॥२॥ येथें अपराध आमुचा नाहीं । खेळ सर्व तुझा पाहीं । एकाजनार्दनीं नवल काई । एकदा येउनी भेटी देईं ॥३॥

१५८. विरहिणी विरहा विरहित बोले । कां वो पूर्वकर्म आड ठेलें । याचे न येती नाम सांवळे । तया विरहा मन माझें वेधलें ॥१॥ ऐशा परी बोलती गोपबाळा । कोठें गेला नेणों सांवळा । प-

व्हातां पहातां ठकविलें गोपाळां । ऐसा याचा विरह लागला ॥२॥ नेणों कांहीं कर्म आड ठेलें । वियोग वियोगाचें वर्म ऐसें जालें । एकाजनार्दनीं कौतुक बोले । ऐशा दुःखा विरहिणी बोले ॥३॥

१५९. नको नको दूर देशीं । आह्मा ठेवीं चरणापाशीं । मग या विरहा कोण पुसी । ऐसी इच्छा देई आम्हासी ॥१॥ पुरे पुरे संसार विरह छंद । तेणें तूं अंतरसी गोविंद । द्वैताचा नको देऊं बाध । हृदयीं प्रगटोनी दावीं बोध ॥२॥ विरह हरीं सत्वर देवराया । परेपरता प्रगटोनी दावीं पायां । दुजें मागणें आणीक नाहीं काह्या । एकाजनार्दनीं शरण तुझीया पायां ॥३॥

१६०. समचरणीं मन माझें वेधलें । तें वेगळें होतां विरह ज्ञोलें । हर्षा मर्षा चित्त उन्मन ठेलें । म्हणोनी विरहिणी विरह बोले ॥१॥ सांवळिया कान्हया नको जाऊं दुरी । राहें परेपरता परतोनी हरीं । पश्यंती मध्यमा मरुनी वैखरी । चारी वाचा तटस्थ जाहल्या हरी ॥२॥ तुझ्या वियोगाचा न व्हावा रोग । अखंड नामीं असो अनुसंधान । शरण एकाजनार्दन । कायावाचा मनें जाणोन ३

१६१. आशा मनीपाचा विरह लागला । तेणें सांवळा दुरी ठेला । जवळी असोनी बोलती अबला । कवणे गुणें कान्हु रुसला १ धांवें धांवें कान्हाई नंद नंदना । पुरवीं तूं आमुची वासना । आणिक नको दुजी कल्पना । विरह निवारीं देईं दर्शना ॥२॥ छंदें छंदें विरहिणी बोले । कावो बोलण्या अबोलणें जालें । एकाजनार्दनीं ऐसें केलें । नंदनंदना चित्त गुंतलें ॥३॥

१६२. जन्म जन्मांतरीं विरहिणी । होती दुश्चित अंतःकरणीं । दुःख सोशिलें होतें मागें जन्मीं । ये खेपे निरसलें स्थूळ कारणीं ॥१॥ येउनी भेटी देहीं देहातीत । तयाचा विरह मजलागीं होत । मना समूळ मन पहात । तो भेटला गोपीनाथ ॥२॥ दुःख फिटलें सुख जालें थोर । हर्षे आनंदें आनंद तुषार । एकाजनार्दनीं भेटला परात्पर । तेणें संसार विरह गेला निर्धार ॥३॥

१६३. काम क्रोध वैरी हे खळ । लोभ अहंकार आशा बरळ । कर्म बळीवंत लागलें सबळ । तेणें वेधिलें आमुतें निखळ ॥१॥

नको नको वियोग हरी । येई येई तूं झडकरी । आम्हा भेटें नको धरूं दुरी । वियोग जाहला तो आवरीं ॥२॥ तुझीया भेटीचें आर्त मनीं । याकारणें विरह बोलणें वाणी । एका शरण जनार्दनीं । वियोग गेला पहातां रामचरणीं ॥३॥

१६४. मागें विरह बहुतांशीं झाला । संसार श्रम वांयां केला । क्षणभरी विश्रांति नाहीं मला । तो सद्गुरु जिवलग भेटला ॥१॥ आतां विरहाची सरली गोठी । डोळेभरी पाहिला जगजेठी । जाउनी चरणीं घालावी मिठी । विरह गेला समूळ दृष्टी ॥२॥ एकाजनार्दनीं पाहतां आनंदले । जन्मजन्मांतरींचें दुःख फिटलें । विरहाविरहें हर खुंटले । कायावाचामनें वेधलें वो ॥३॥

१६५. बहुत जन्में विरहें पीडली । नेणों कैशी स्थिर राहिली । मन आशा गोविंदीं वेधली । तों मध्यमा वैखरीये गुंतली वो ॥१॥ चारी वाचांपरता सांवळा । विरहिणीसी छंद लागला । चौपरता कोठें गुंतला । तें नेणों आह्मी अबला वो ॥२॥ विरह जाईल कैशा परी । पूर्वपुण्य सुकृत पदरीं । एकाजनार्दनीं भेटेल हरी । तैं विरह नोहे निर्धारीं ॥३॥

१६६. येई वो श्रीरंगा कान्हा आई । विरहाचें दुःख दाटलें हृदयीं । कोण सोडवील यांतून पाहीं । दैवयोगें सांपडला सगुण देहीं ॥१॥ सगुण निर्गुण याचा वेध । वेधें वेधलें मन झालें सावध । वाचा कुंठित हरपला बोध । नेणें आणिक परमानंद ॥२॥ स्थिर स्थिर मति झाली । वृत्ति विरक्ति हारपली । समाधी उन्मनी स्थिरावली । ऐसी विरहाची मति ठेली वो ॥३॥ संगविवर्जित मन झालें । काया वाचा मन चित्त ठेलें । एकाजनार्दनीं ऐसें केलें । विरह दुःख निरसिलें ॥४॥

१६७. भिन्न माध्यानीं रात्रीं नारी । विरह करी बैसोनि अंतरीं । केधवां भेटेल श्रीहरी । तों नवल जालें अंतरीं वो ॥१॥ अवचित घडला संतसंग । विरहाचा झाला भंग । तुटोनी गेला द्वैतसंग । फिटला जन्ममरणाचा पांग वो ॥२॥ एकाजनार्दनीं संतसंग । फिटला संसारपांग । विरह गेला देहत्याग । सुखें सुख झालें अनुरागवो ३

१६८. विषय विरह गुंतले संसारीं । तया जन्म जन्मांतरीं फेरी । कोणी न सोडवी निर्धारीं । यालागीं न गुंता संसारीं ॥१॥ मज सोडवा तुम्ही संतजन । या विषयविरहापासोन ॥ध्रु०॥ क्षणिक विषय संसार । भरला दिसे भवसागर । यांतुनी उतरीं पैलपार । संतसंग मिळलिया ॥२॥ यांसी शरण गेलियावांचुनी । संतसंग न जोडे त्रिभुवनीं । शरण एकाभावें जनार्दनीं । विरह गेला समूळ निरसोनी ॥३॥

१६९. ऐशी निर्धारें विरहिणी करी । परेपरता देखेन श्रीहरी । मन पवन साधन न करी । संतसंग घडलीया धन्य संसारीं ॥१॥ धन्य धन्य संतमहिमा । विरह गेला पावलें सुखधामा ॥ ध्रु० ॥ नामविरहित विरह तो कोण । विषय विरह गुंतीन गी जाण । नामावांचुनी नेणें साधन । तो विरह न व्हावा पूर्ण ॥२॥ एका- जनार्दनीं सत्य वचन । विरहाविरह गेला गुळीहुनी । नाम जपतां स्थिर झालें मन । विरह गेला त्यागून ॥३॥

१७०. रात्रंदिवस मन रंगलें । हरी चरणीं चित्त जडलें । विर- हाचें दुःख फिटलें । धन्य झालें संसारीं ॥१॥ विरह गेला सुख झालें वो माय । पुढतोपुढती आनंद न समाये ॥ध्रु०॥ संतसंग घडला धन्य आजी । मोह ममता तुटली माझी । भ्रांती फिटोनी गेली सहजीं । विरह गेला सुख झालें आजी ॥२॥ धन्य संतसंगती अवघी झाली विश्रांति । एकाजनार्दनीं चित्तीं । विरहभ्रांति निरसली ३

१७१. अनुतापें विरहिणी बैसे । का वो कर्म बळिवंत दिसे । संगवर्जित मज झालें ऐसें । कोणें योगें भेटी नसे ॥१॥ मज भे- टवा संत संगती । तेणें निवारेल सर्व भ्रांति ॥ध्रु०॥ विरहें बहुत पीडिली बाळा । कोण शांतवी तया अबला । येथें श्रीरंग जीवीं ला- गला । तया भेटलीया सुख होईल तयाला ॥२॥ नेणें आपप- रावें दुजें कांहीं । विरहें विरह जडला हृदयीं । कोण सो- डवी गुरु मज देहीं । या विरहा अंत पार नाहीं ॥३॥ ऐसा विरह करितां दुःख । दैवयोगें घडलें संत सुख । तापत्रय विरह गेला देख । सुखें सुख अपार झालें देख ॥४॥ संतसंगें निरसे विरह ।

पावन देह झाला विदेह । एकाजनार्दनीं आनंद पाहे । विरह निरसला सुख झालें गे माय ॥५॥

१७२. बोला बोल विरहिणी बोले । गगनीं चांदणें शुद्ध शोभलें । श्यामाजी घन सांवळा खेळे । कर्मदशें वियोग जाला वळें ॥१॥ दावागे दावागे कृष्णवदन । विरहाचें दुःख दारुण । कोण्या कर्में झालें खंडन । कांहो यदुनंदन न बोले ॥२॥ विरह तापें तापलें भारी । कोण आतां दुजा निवारी । श्रीगुरु भेटला झडकरी । एकाजनार्दनीं दाविला श्रीहरी ॥३॥

१७३. युगायुगीं पीडिली विरहिणी । नाठवी ध्यानीं मनीं चक्रपाणी । ह्मणोनि वियोगाची जाचणी । तों भेटला संतसंग साजणी ॥१॥ विरह गेला सुख झालें अपार । जन्मोजन्मींची तुटे वेरझार वो ॥ध्रु०॥ घडतां संतसंग विश्रांति । तुटली माया पडळभ्रांति । भव संसार याची झाली शांति । संत महिमा वर्णावा किती ॥२॥ महिमा वर्णितां विरहा फिटलें । एकाजनार्दनीं तया भेटलें । सुख अनुभवें अंतरीं दाटलें । विरहाचें बीज भाजिलें वो ३

## गोपींचे खेळ.

### जातें.

१७४. सुंदर माझें जातें फिरे बहुतेकें । ओंव्या गाऊं कौतुकें तूं येरे बा विठ्ठला ॥१॥ जीवशिव दोनी खुंटे गे प्रपंचाचे नेटें गे । लावुनी पांचीं बोटेंगे तूं येरे बा विठ्ठला ॥२॥ सासु आणि सासरा दीर तो तिसरा । ओंव्या गाऊं भ्रतारा । तूं येरे बा विठ्ठला ॥३॥ बारा सोळा गडणी अवघ्या कामिनी । ओंव्या गाऊं बसूनि तूं येरे बा विठ्ठला ॥४॥ प्रपंचदळण दळिलें पीठ भरिलें । सासुपुढें ठेविलें तूं येरे बा विठ्ठला ॥५॥ सत्त्वाचें आधण ठेविलें पुण्य वैरिलें । पाप तें उतूं गेलें तूं येरे बा विठ्ठला ॥६॥ एकाजनार्दनीं जातें गाइल कीर्ति राहिल । थोडासा लाभ होईल तूं येरे बा विठ्ठला ॥७॥

### दळण.

१७५. माया जिवलग जातां बैसली कृष्ण ह्मणे गे आई । दळण दळितां शिणलिसी हात लावूं गे आई । समान तळी तळी-

वर ठेवी पा वो ठायीं । क्षणामाजि मी वो दळीन तूं कौतुकें पाहीं ॥१॥ येईंगे येईंगे येईंगे कान्हाई हात लावीं तूं वहिली । जातीये जातां शिणलिये किती दळूं एकली । विसांवा निजाचा तूं माझा विश्रांती साउली । येईंगे येईंगे येईंगे कानाई ॥ धृ० ॥ ब्रह्माहंगासि टांकिया उफटी द्वैत दळी । आधिष्ठान खुंटा निश्चळ दोहीं येकली बोली । पाहिले चारी निरसोनि निज नित्य न्याहाळी । साहाही वैरण वेरुनी अठराही दळी ॥२॥ पंच भूतें पंच धान्यें दळियेलें जाता । शशी सूर्य दोन्ही दाळिले प्राणाच्या समता । ध्येय ध्याता ध्यान दळियलें धारणा धरिता । पंच विषय तेही दळियलें वैराग्यें राहाता ॥३॥ वैकुंठ कैलास दाळिले गती एक देशी । क्षीरसागर तोही दाळियला शेषशयनेसी । ध्रुव तोही जाता वैरिला अढळ पदेसी । जे जे देखो तेही दळियलें दृश्या-दृश्यासी ॥४॥ वासना मिथ्या भाजूनि वैरिलिया जाता । मेळवणी गुण घातले समान सामता । गुणा गुणातेंही दळियलें पहाते पहाता । ब्रह्मा विष्णु रुद्र दळिले ओवीया गातां ॥५॥ कर्माकर्म वैरा दळिलें जन्म मरणेसी । मीतूंपण दोन्ही दळियलें जीव शिवेसी । पुढें वैर-णिया कांहीं न दिसे पहातां चौपासी । माया तेही जातां दळिली दळतें दळणेसी ॥६॥ वृत्ती तेही निवतेली पडियेली ठका । समाधी उत्थान दळियलें देह बुद्धीसी देखा । दळितें जातें तेंही दळियलें कवतुक देखा । स्वभावें लीला हे खेळे जनार्दनीं एका ॥७॥

१७६. येईं हो कान्हाई मी दळीन एकली । एकली दळितां शिणले हात लावीं वहिली ॥धृ०॥ वैराग्य जातें मांडुनी विवेक खुंटा थापटोनी । अनुहत दळण मांडुनी त्रिगुण वैरणी घातले ॥ येईं० ॥ ॥१॥ स्थूळ सूक्ष्म दळियेले देहकारणासहित । महाकारण दळियेले औट मात्रेसहित ॥ येईं० ॥२॥ दशा दोनी दळिल्या द्वैत अद्वैतासा-हित । याही व्यापक दळियेले अहंसोहंसाहित ॥ येईं० ॥३॥ एका-वीस स्वर्ग दळियेले चवदा भुवनांसहित । सप्त पाताळें दळियलीं सप्त-सागरांसहित ॥ येईं० ॥४॥ बारा सोळा दळियल्या रात्रदिवसा-हितं । चंद्र सूर्य दळियले तारागणांसहित ॥ येईं० ॥५॥ नक्षत्र वैरण

घालुनी नवग्रहांसहित । तेहतीस कोटी देव दळियेले ब्रह्मा विष्णु-सहित ॥ येई०॥६॥ ज्ञान अज्ञान दळियेलें विज्ञानासहित । मीतूंपण दळियेलें जन्ममरणासहित ॥ येई० ॥७॥ ऐसें दळण दळियेलें दोनी तळ्यांसहित । एकाजनार्दनीं कांहीं नाहीं उरलें द्वैत ॥ येई०॥८॥

## कांडण.

१७७. विवेक कांडणीं कांडिलें साजणी । निजबोध स्मरणीं फिरतसे ॥१॥ देह हें उखळ मन हें मुसळ । कांडिले तांदूळ विवेकाचे ॥२॥ एकजनार्दनीं कांडण कांडितां । ब्रह्म सायुज्यता प्राप्त झाली ॥३॥

## पिंगा.

१७८. पिंगा बाई पिंगा गे । अवघा धांगड धिंगा गे ॥१॥ सांडोनी संतांची गोडी गे । कासया धिंगा जोडी गे ॥२॥ नको घालूं पिंगा गे । तुह्मी रामरंगीं रंगागे ॥३॥ एकाजनार्दनीं पिंगा गे । कायावाचा गुरुचरणीं रंगा गे ॥४॥

१७९. निराकाराचा आकार झाला । त्यांतच माझा धिंगा जन्मला । निराकारासी घेऊन आला ॥ माझा पिंगा घालितो धिंगा ॥ध्रु०॥ पिंग्यापासून शंकर झाला । धवळ्या नंदीवर बसून आला । माझ्या पिंग्यानें धक्का दिला ॥ माझा० ॥१॥ पिंग्यापासून मच्छ झाला । शंखासुराचा प्राण घेतला । चारी वेद घेउनी आला ॥ माझा० ॥२॥ पिंग्यापासून कूर्म झाला । पर्वत पाठीवर घेतला । चौदा रत्नें घेऊन आला ॥ माझा० ॥३॥ पिंग्यापासून वराह झाला । हिरण्याक्षाचा प्राण घेतला । पृथ्वी वरती घेऊन आला ॥ माझा० ॥ ॥४॥ पिंग्यापासून नारसिंह झाला । हिरण्यकश्यप दैत्य वधिला । प्रऱ्हाद भक्त रक्षिला ॥ माझा० ॥५॥ पिंग्यापासून वामन झाला । बलीदान मागूं आला । बळी पाताळीं घातला ॥ माझा० ॥६॥ पिंग्यापासून भार्गव झाले । मातेचें शिर छेदियेलें । अवघे राजे नाहींसे केले ॥ माझा०. ॥७॥ पिंग्यापासून राम झाले । पितृवचन सांभाळिलें । रावण कुंभकर्ण मारिलें ॥ माझा० ॥८॥ पिंग्यापासून कृष्ण झाला । कंसाचा प्राण घेतला । गोकुळ सोडून मथुरेसी आला ॥ माझा०

॥९॥ पिंगयापासून बौद्ध झाला । दिलें जगन्नाथ नांव त्याला । भक्तांनीं दहींभात चारला ॥ माझा० ॥१०॥ ऐसा निराकाराचा पिंगा। त्यांत माझा श्रीरंगा । एकाजनार्दनीं पांडुरंगा । माझा पिंगा घालितो धिंगा ॥११॥

## फुगडी.

१८०. फुगडी घालीं मीपणाची । वेणी गुंफी त्रिगुणांची ॥१॥ चाड नाहीं कोणाची । आण सद्गुरु चरणांची ॥२॥ फुगडी घाली आज गे । नाचूं सहजा सहज गे ॥३॥ एकाजनार्दनीं निज गे । वंदूं संत चरणरज गे ॥४॥

---

१८१. उठोनि येके दिनीं ह्मणे यशोदा कान्हया । गोधनें घेऊनियां जाईं वनासी लवलाह्या ॥१॥ सर्व मिळाले चिमणें सवंगडी । सिदोरी काठी कांबळी जाळी घेती आवडी ॥२॥ एकाजनार्दनीं गाई सोडिल्या सान्या । रामकृष्ण सवंगडीया देव येती पहावया ॥३॥

१८२. घेउनी गोधनें जाती यमुने तटीं । नानापरी खेळ खेळताती जगजेठी ॥१॥ मेळवोनी गोपाळ मध्यें खेळे कान्हा । न कळेचि महिमान ऐसा यादवांचा राणा ॥२॥ नानापरींचे खेळ खेळती गोपाळ । नाचती गदारोळ मिळोनी सकळ ॥३॥ एकाजनार्दनीं खेळे मदनपुतळा । नंदरायाचा कुमरु ह्मणताती सांवळा ४

१८३. आनंद सोहळा वृंदावनीं पाहों । नंदजीचा कृष्ण तेणें केला नवलावो ॥१॥ धाकुले सवंगडे गौळणीचा थाट । वेणु पांवा वाजविती नाचती दाट ॥२॥ एकाजनार्दनीं वेधलें मन । पाहतां पाहतां चित्त जालें उन्मन ॥३॥

१८४. सैराट गोधनें चालती वना । तयांमागें चाले वैकुंठींचा राणा ॥१॥ सांवळें चतुर्भुज मेघश्याम वर्ण । गाई गोपाळांसमवेत खेळे मनमोहन ॥२॥ यमुनेचे पाबळीं मिळोनियां सकळीं । खेळे चेंडुफळी गडियांसम ॥३॥ एकाजनार्दनीं मदनपुतळा । देखियेला डोळां नंदरायाचा ॥४॥

१८५. विष्णु मूर्ति चतुर्भुज शंख चक्र हातीं । गदा पद्म वनमाला शोभती ॥१॥ गाई गोपाळ सवंगडे वनां । घेऊनियां जाय खेळे नंदाचा कान्हा ॥२॥ विटीदांडू चेंडू लगोरी नानापरी । खेळ मांडियेला यमुनेचे तीरीं ॥३॥ एकाजनार्दनीं पाहतां तन्मय । वेधलें मन वृत्तिसहित माय ॥४॥

१८६. जो परिपूर्ण परब्रह्म व्यापक गे माये । तो गोकुळीं गाई चारिताहे ॥१॥ पहा हो भुलला भक्ति प्रेमासी । शिदोऱ्या चोरुनी खाये वेगेंसी ॥२॥ एकाजनार्दनीं व्यापक देखा । तो गोकुळीं चोरी करी कौतुका ॥३॥

१८७. परब्रह्म सांवळा खेळे यमुनातीरीं । सवें घेउनी गायी गोपवत्स नानापरी ॥१॥ कान्होबा यमुनेसी जाऊं । आदरें दहींभात खाऊं ॥२॥ नाचती गोपाळ एक एकाच्या आवडी । परब्रह्म सांवळा पहातसे संवगडी ॥३॥ एकाजनार्दनीं ब्रह्म साराचें सार । धन्य भाग्य गौळीयांचें कृष्ण खेळे परिकर ॥४॥

## गोपांचे खेळ.

१८८. खेळ मांडिलावो खेळ मांडिला वो । या संसाराचा खेळ मांडिला वो ॥१॥ पंचप्राणांचे गडी वांटिले । तेथें जीवशिव नाम ठेविलें वो ॥२॥ एकाजनार्दनीं खेळ मांडिला । शाहणा तो येथें नाहीं गुंतला वो ॥३॥

१८९. यमुने तटीं मांडिला खेळ । मेळवोनी गोपाळ सवंगडे ॥१॥ जाहले गडी दोहींकडे । येकीकडे रामकृष्ण ॥२॥ खेळती विटीदांडू चेंडू । भोंवरे लगोऱ्या उदंडू ॥३॥ ऐसा खेळ खेळे कान्हा । एकाजनार्दनीं जाणे खुणा ॥४॥

## टिपरी.

१९०. खेळसी टिपऱ्या घाईरे । वाचे हरिनाम गाईरे । टिपरीस टिपरी चुकूं जातां भाई । पडसी यमाच्या घाईरे ॥१॥ सहा चार अठरा गड्यांचा मेळारे । टिपरीयांचा खेळ खेळारे । एका खेळा दोन्ही गुंतला । यमाजी घालील डोळारे ॥२॥ वांयां

खेळ खेळतोसी वाळारे । सावध होई पाहें डोळारे । एकाजनार्दनीं शरण जातां । चुकशील कळिकाळारे ॥३॥

१९१. अनुहत टिपरी घाई खेळूं जाणें तो भाईरे । खोटा खेळ खेळोनि काय स्वतः अनुभव घेईरे ॥धु०॥ मत्स्येंद्र कुळीं एक गोरक्ष जाला तो बहुत खेळ खेळलारे । पवन साधूनि अष्टांग योगें तेणेंचि बळें मातलारे । खेचरी भूचरी चाचरी धरुनी अगोचरीं मिळालारे । गोल्हाट योग साधूनि तेणें काळ तो जिंकूनि गेलारे ॥१॥ निवृत्तांचा पोर एक ज्ञाना जाणतो खेळिया माजी शहाणारे । कवित्व केलें प्रकाश मातला प्रवृत्ति गाळिली घाणारे । असोनि मेला नसोनि गेला काळ केला आंकणारे । भले भले गडी मिळविले तेणें काय सांगूं कवणारे ॥२॥ जनार्दनाची सात पांच पोरें त्यांमाजी लाडका येकारे । एकही साधन न करी परी तो बळेंचि मातला फुकारे । आपपर देहीं कांहींच नेणे रायासी ह्मणे तो रंकारे । भले भले गडी मेळवोनि तेणें खेळ दाविला असकारे ॥३॥ तिघां जणांचें खेळणें जालें चवथें एक उठविलेंरे । अनन्यभावें सद्गुरुचरणीं गुरुसी शरण गेलेरे । भवासी न भ्यालें कळलें ह्मणोनि तिघांचि समान जालेंरे । आपण जैसें पूर्ण तैसें एकाजनार्दनीं केलेंरे ॥४॥

## विटीदांडू.

१९२. आबक दुबक तिबक पोरा त्रिगुण खेळ मांडू । खेळे विटदांडू खेळे विटिदांडू ॥१॥ सत्त्व विटी घेऊनि हातीं धीर धरी दांडू । भावबळें टोला मारी नको भेऊं गांडू ॥२॥ बोदगळ खेळ खेळूं लक्ष लावीतीसी । मूर्खापाशीं युक्ति नाहीं उडोनी गेली उशी ॥३॥ वकट लेंड मूंड नाल पुढें आणीं लेका । भावबळें खेळ खेळे जनार्दनएका ॥४॥

१९३. बारा सोळा अठरा गडियांचा मेळा । मांडियेला डाव कोणं आवरी तयांला ॥१॥ खेळा भाई विटीदांडू खेळा भाई विटीदांडू । खेळ खेळतां परी बरा नोहे सहज दांडू ॥२॥ पांच सात बारा नव तेरा यांची नका धरूं गोडी । खेळ खेळतां दांत विचकून

पडाल घसीं तोंडीं ॥३॥ एकाजनार्दनीं कायावाचा शरण रिघा पायीं । खेळ तो अवघा सोपा मग प्रेमा उणें नाहीं ॥४॥

१९४. विटिदांडू चेंडू भला रे । मनीं समजोनि मारा टोला रे ॥१॥ खेळूं विटीदांडू चेंडू । काळा नका भिऊं गांडू रे ॥ ध्रु० ॥ सद्दा चार एकत्र करूनि अवघे पुढें रहा । सावध होऊनि धरा चेंडू कोणी कोणाकडे न पहा ॥२॥ प्रपंचाचे घाई धन वित्त म्हणतां भाई । हातींचा चेंडू सोडूनि देई पुढें मारील डोई ॥३॥ खेळ खेळा परी मनीं धरा जनार्दन । तेणें चुके जन्ममरण शरण एकाजनार्दन ४

१९५. एक पांच सात मिळोनी खेळती विटीदांडू । डाव आलिया पळुनी जातां तया म्हणती गांडू ॥१॥ खेळों विटीदांडू खेळों विटीदांडू ॥ध्रु०॥ मुळींचा दांडू हातीं धरूनि भावबळें खेळूं खेळा । भक्तिबळें टोला मारूं न भिऊं काळिकाळा ॥२॥ आपुली याची सांडोनि आस जावें गुरूसी शरण । कायावाचामनें चरणीं लोळे एकाजनार्दन ॥३॥

१९६. विटीदांडू खेळसी वांयां । चौऱ्यांयशीं वेरझारा होती पाया ॥१॥ नको विटीदांडू सांडीं हा छंदू । आवडी वदें रामगोविंदू ॥२॥ किती वेरझारी करिसी पा वांयां । शरण रिघें एकाजनार्दन पायां ॥३॥

## चेंडूफळी.

१९७. मिळवोनी पांच सात गडी मेळीं । डाव खेळती चेंडूफळी ॥१॥ खेळ चेंडूचा झेलारे झेला बाळा । विचारूनि खेळ खेळा न पडूं प्रवाहीं काळा ॥२॥ वंदु यरडु मोरु नाकु मिळालेती गडी । एकाजनार्दनीं शरण अनुपम्य धरा गोडी ॥३॥

१९८. सहज तो चेंडू समान फळी । झेलूं जाणे तो खेळिया बळी ॥१॥ झेला रे भाईनो झेलारे । सद्गुरु वचनें झेलारे ॥धु०॥ अवघे गडी समान रहा । येतां यावा सावध पहा ॥२॥ सुटे सुटे तंव सरिसाचि पावें । लक्ष जाणें तो साधारा नव्हे ॥३॥ गडियानें गडियाची न धरावी आस । आपुलिया बळें घालावी कास ॥४॥

अभिमाना चढे तो बाहेरी पडे। हातींचें जाय मग उगलाचि रडे ॥५॥ एकाजनार्दनीं येकचि बोली। भावार्थी तो सद्गुरू वचनें झेली ॥६॥

### लगोरी.

१९९. खेळ मांडिला लगोरी। खेळताती नानापरी। चेंडू घेऊनि आपुले करीं। खेळताती एकमेक ॥१॥ देती आपुलाला डाव। ज्याचा जैसा आहे भाव। तोचि जिंकीतसे वैभव। आणिक महाती उगें वाव ॥२॥ बरोबर करूं गडी। नाहीं विषमता जोडी। चेंडू हाणती तांतडी। येती हरीया वैसती गडी ॥३॥ एकाजनार्दनीं कान्होबा भला। खेळा गोविलें कीं सकळां। आपण असेचि निराळा। नवल कळा पाहे डोळां ॥४॥

२००. त्रिगुणात्मक मांडियेला डाव। सहा चार अठरा गडी वांटिले ऐका त्याचें नांव ॥१॥ कान्होबा खेळूं लगोरीचा खेळ। तुह्मी आह्मी मिळूं एका ठायीं सहज होईल मेळ ॥२॥ चौदा बारा सोळा पंचविसांचा करुनी मेळ। एक एका पुढें पळती अवघा हाल-कल्लोळ ॥३॥ एकाजनार्दनीं ह्मणे कान्होबा खेळ तूं आंवरी। खेळ खेळतां शिणलों आह्मी पुरे बा वेरझारी ॥४॥

### भोंवरा.

२०१. भ्रम धरूनि वांयां कासया खेळसी भोंवरा। यम मारी कुचा फिरसील चौऱ्यांयशीं घरां ॥१॥ पुढें शुद्धि करीं वाचें स्मरे हरी। वांयां भ्रमें फिरसी गरगरां पडसी माशाफेरीं ॥२॥ एकावरी एक मारिताती घाय। दया नाहीं येत कोणाखालीं न ठेविती पाय ॥३॥ एका शरण जनार्दनीं तरीच चुके फेरा। नाहीं तरी फिरसी गरगरां ॥४॥

२०२. खेळे भोंवरा गे बाई भोंवरा। राधिकेचा नवरा ॥ध्रु०॥ माझ्या भोंवऱ्याची अरी। सप्त पाताळें त्यावरी। फिरे गरगरां। राधिकेचा नवरा ॥ खेळे० ॥१॥ भोंवरा बनला निर्गुणीं। त्यावर चंद्र-सूर्य दोनी। जाली शंकर गवरा। राधिकेचा नवरा ॥ खेळे० ॥२॥ एकाजनार्दनीं खेळिया। भोंवरा खेळून पाहें चेलिया। नाद देतो हरिहरा। राधिकेचा नवरा ॥ खेळे भोंवरा० ॥३॥

## लपंडाई.

२०३. कृष्णा कैसी खेळूं लपंडाई । अनंत लोचन तुझे पाही । तेथें लपावे कवणे ठायीं । तुझें देखणें लागलें पाहीं ॥१॥ कान्होबा पाववी आपुल्या खुणा ॥ध्रु०॥ लपूं ममतेच्या पोटीं । जेथें तेथें तुझीच दृष्टी । तेथें लपायाची काय गोष्टी । तुझें देखणें लागलें पाठीं ॥२॥ लपूं गिरीं कपाटीं कडवसा । जेथें तेथें तुझाचि ठसा । एकाजनार्दनीं सरिसा । तेणें मोडली खेळायाची आशा ॥३॥

२०४. उघड जगीं दिसोनियां कां झांकितोसी डोळा । पहातां पहतां खेळामध्यें वरपडा होसी काळा ॥१॥ नको खेळूं लपंडाई नको खेळूं लपंडाई । मिळाले ते गडी जाती पळुनी पडाल दांत विचकून भाई ॥२॥उगाचि डोळे झांकुनी कां रे होसी अंध । संसार-मायामोह याचा टाकीं बा छंद ॥३॥ शरण एकाजनार्दनीं जातां चुके हा खेळ । नाहीं तरी पडसी गुंतोनी कोण करील कळवळ ॥४॥

## सुरकाठी.

२०५. घेऊनियां हातीं काठी । पोरा खेळसी सुरकाठीरे ॥१॥ खेळें सुरकाठी पोरा खेळें सुरकाठी । विषयाची वासना धरुनी चढसी प्रपंच्याचे झाडीं ॥२॥ बुडापासून शेंडारे चढसी फांदो फांदींरे । कामक्रोध पोरें लागती पाठीं ह्मणती माझा दादारे ॥३॥ धरी एकाजनार्दनीं गोडी तरी खेळ जोडीरे । वांयां खेळ खेळूं जातां होईल भरकवडीरे ॥४॥

## वावडी.

२०६. अलक्ष केली वावडी । लक्षाचा दोर परवडी । उडविती बारा चौदा गडी । भरली ती गगनीं उडी ॥१॥ भली चंग वावडी । दादांनो भली चंग वावडी ॥ध्रु०॥ आट हात सोडोनी दोरा । मध्यें कामटी लाविल्या बारा । आत्मस्थितीचा चंग उबारा । वावडी उडती अंबरा ॥२॥ साहा चार मिळवोनी गडी । अठराजण सोडिती वावडी । एकाजनार्दनीं त्याची जोडी । जनार्दनाचे पायीं गोडी ३

## एकीबेकी.

२०७. एकीबेकी पोरा सांग झडकरी । एकी ह्मणतां जिंकि-

शी वेकी ह्मणतां हरी ॥ ध्रु०॥ नव्हे काई बाई तेथें झालें एक शून्य । त्यासी फांटा फुटतां मग लेखा आलें जाण ॥ येकीवेकी० ॥१॥ एक दोन तीन पांच विस्तारिलां जाण । दहापासुनी सहस्रवरी एक झाला पूर्ण ॥२॥ एक ब्रह्म पूर्ण तेथें फाट झाली माया । एकाजनार्दनीं नित्य लक्ष लावीं पायां ॥३॥

२०८. खेळ खेळूं सुरकवडी । कान्होबा उगाचि पाहे गोडी ॥१॥ एकीबेकी पोरा खेळ भला वेकी । सांडुनी एकीबेकी धरितां शेवटीं होईल फुकी ॥२॥ एक दोन तीन चार पांच सहाच्या पुढें नको डाई । सहस्र लक्ष कोट गेले उगाची शीण पाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं ह्मणे कान्होबा वाउगा नको गोऊं । जेणेंकरुनी संसार खेळ तुटोन लक्ष तुझे पायीं लाऊं ॥४॥

२०९. वांया खेळ एकीबेकी । पडसील काळाचे मुखीं ॥१॥ आधींच एक निर्गुणरे । मायेनें केलें सगुणरे ॥२॥ एकीबेकी म्हणतां एकलेंरे । दोन म्हणतां सर्व आटलेंरे ॥३॥ एकाजनार्दनीं एकलेंरे । एकपण अवघें फिटलेंरे ॥४॥

## पटपट सांवली.

२१०. पटपट सांवली खेळूं यारे । सावध गड्यांनो कां वेळु लावारे । भीड्र तथा सोडोनी सहा गडी मारूं यारे ॥१॥ निजानंदीं खेळोनी मित्रतनया हारूं यारे ॥ ध्रु० ॥ अवघे गडी एकवटोनी जाऊंदे यारे । बहु कष्टें फेरे फिरतां मन तेथें लावारे ॥२॥ एकाजनार्दनीं खेळतां ब्रह्मरूप कायारे । जेथें पाहे तेथें दिसे जनार्दनीं छायारे ॥३॥

## झोंबी.

२११. तारुण्याचे मदें घेशी एकमेकां झोंबी । वांयां जाईल नरदेह धरीं हरीशीं झोंबी ॥१॥ तरीच खेळ भलारे वांयां काय गलबला । एकावरी एक खालीं पडतां मारी यमाजी टोलारे ॥२॥ हातीं हात धरूनियां घालिसी गळां गळखोडारे । फजीत होसी खालीं पडतां हांसतील पोरें रांडारे ॥३॥ एकाजनार्दनीं ह्मणे खेळ नोहे भलारे । आपण न पडतां दुजियासी पाडी तोचि खेळिया भलारे ४

## चिकाटी.

२१२. धरितां हातीं हात न सुटे चिकाटी । पडली तीं मिठी नोहे कदा सुटी ॥१॥ वांयां काय बळ वेंचितोसी मूढा । न सुटतां हातीं हात वांयां जिणें दगडा ॥२॥ ऐशी मिठी घालीं एकदां जनार्दन पायीं । न सुटेचि काळत्रयीं सर्वत्र देती ग्वाही ॥३॥ कायावाचामनें शरण एकाजनार्दनीं । मिठी पडली ते न सुटे भावें चरणीं ॥४॥

## उमाण.

२१३. बैसोनियां निवांत घालिसी उमाण । एका हरिविण सर्व वांयां न धरीं गुमान ॥१॥ नको खेळ खोटा सांडीं मनाचा ताठा । उमान गुमान दोन्ही न कळे होतील जगीं चेष्टा ॥२॥ उ ह्मणणें उकाररे मा ह्मणणें मकाररे । न ह्मणणे नश्वर देह या तिहींचा आकाररे ॥३॥ एकाजनार्दनीं उमानरे । सांगों आतां न कळे खूण तया ह्मणिजे गुमानरे ॥४॥

## हमामा.

२१४. हमामा पोरा हमामा । घुंबरी वाजे घमामा ॥१॥ हमाम्याचे नादानीं । घुंबरी वाजली रानीं ॥२॥ हमाम्याची शीतळ शाई । पोरा मेली तुझी आई ॥३॥ कामक्रोध पोरा नाशी । अहंकार तोंड वासी ॥४॥ एकाजनार्दनाशीं । पोरा वाहिल्या गांवा जाशी ॥५॥

२१५. हमामा बाळा घालीं । नको पडों काळाचे चालीं ॥१॥ हमामा पोरा हमामा ॥ध्रु० ॥ हमामा घालीं बरव्यापरी । क्रोधकामा सारुनी दुरी ॥२॥ हमामा घालीं नेटें । धरीं भक्तीचें बळ मोठें ॥३॥ हमामा घालसील जरी । एकाजनार्दनाचे चरण धरीं ४

२१६. हमामा घालूं सोई । सांभाळूं शिवा दोही ॥१॥ हमामारे भाई हमामा । कान्होबाचे बळें घालूं हमामा ॥२॥ हमामा घालूं ऐसा । भक्तिबळें कान्होबा बैसा ॥३॥ हमामा घालूं नेटें । एकाजनार्दनाचें बळ मोठें ॥४॥

२१७. हमामा मांडिला कान्होबा भाई । हमामा खेळूं भाई कान्होबा तुझे पायीं १ हमामारे हमामा । कान्होबा खेळूं हमामा ।।ध्रु०।। हमामा खेळा वेगीं । सांडुनी द्वैताच्या संगीं ॥२॥ हमामा

१३३६. नामपाठ माधव सदा तूं उच्चारीं । माधव अंतरीं धरुनी राहें ॥१॥ माधवा माधवा आठवीं यादवा । आणिक धांवा धांवा करूं नको ॥२॥ जनार्दनाचा एका माधवीं मुराला । वसंत तयाला जनार्दन ३

१३३७. नामपाठ गोविंद हाचि लागो छंद । न करीं भेदाभेद हृदयामाजी ॥१॥ गोविंदनाम गाय गोविंदनाम गाय । गोविंदनाम गाय हृदयीं सदा ॥२॥ जनार्दनाचा एका हृदयीं ध्याये सच्चिता । गोविंद गीतीं गातां सुख जोडे ॥३॥

१३३८. विष्णुनामपाठ करीं वेळोवेळां । पाहें तूं सांवळा विष्णु सखा ॥१॥ विष्णुनाम गाय अंतरीं सर्वदा । तुटे जन्मजरा बाधा येणें नामें ॥२॥ जनार्दनाचा एका विष्णुरूप देखा । जनार्दन सखा एकरूप ३

१३३९. नामपाठें मधुसूदन वाचे । अनंत जन्मांचे दोष जाती ॥१॥ मधुनामें जैसा माक्षिकेशी वेधु । तैसा तूं बोधु धरीं देहीं ॥२॥ जनार्दनाचा एका मधुर बोले वाणी । मधुसूदन चरणीं देउनी दिठी ३

१३४०. नामपाठ त्रिविक्रम वदें तूं रे वाचे । अनंत जन्मांचे दोष जाती ॥१॥ वळीये द्वारीं त्रिविक्रम उभा । नामपाठें उभा तुजपुढें २ जनार्दनाचा एका त्रिविक्रमीं वंदी । साधन उपाधी नेणे आन ३

१३४१. नामपाठें वामन अक्षरें तीं तीन । आणिक योग साधन आन नाहीं ॥१॥ वदें तूं वामन वदें तूं वामन । विषय वमन करूनि सांडीं ॥२॥ जनार्दनाचा एका नसे तो पारखा । वामन तेणें सखा जोडियेला ॥३॥

१३४२. नाम तें सार श्रीधराचें वाचे । कोटी जन्मांचे दोष जाती १ जपें तूं आवडी धरूनियां गोडी । युगाऐसी घडी करूनियां २ जनार्दनीं एका श्रीधर निजसखा । नोहे तो पारखा जनार्दनीं ३

१३४३. नाम हृषिकेश गायें सावकाश । धरुनी उदास देह-आशा ॥१॥ जाईल जाईल देह नाशिवंत । नाम तें शाश्वत हृषि-केश २ जनार्दनाचा एका नाम गाय सदा । पंचभूत बाधा तेणें नोहे ३

१३४४. नाम तें सोपें पद्मनाभ पाठ । करीं तूं बोभाट दिवसं निशीं ॥१॥ चौसष्ट घडियांमाजी जपें नामावळी । कळिकाळ टाळी मारूं न शके ॥२॥ जनार्दनाचा एका नामीं तो निर्भय । कळिकाळ वंदी पाय जन्मोजन्मीं ॥३॥

१३४५. दामोदर गावा दामोदर पहावा । दामोदर सांठवा हृदयामाजी ॥१॥ गोपीराजीं ध्यान दामोदरीं मन । चुकलें बंधन नाम घेतां ॥२॥ जनार्दनाचा एका दामोदरीं मिनला । कृतकृत्य झाला उभयलोकीं ॥३॥

१३४६. नाम तें सोपें संकर्षण जपे । आणिक संकल्पें धरूं नको ॥१॥ धरितां संकल्प नाशिवंत बाधा । नाम जप सोपा मंत्र मार्गें ॥२॥ जनार्दनाचा एका बोले लडिवाळ । जनार्दन कृपाळ जगीं तोची ॥३॥

१३४७. वासुदेव नाम प्रातःकाळीं वाचे । धन्य जन्म त्याचें सुफळ सदा ॥१॥ वहातां टाळी मुखीं नाम सार । वासुदेव उच्चार करीं आधीं ॥२॥ जनार्दनाचा एका एकपणें देखा । जनार्दन सखा जोडियेला ॥३॥

१३४८. नाम जप वाचा प्रद्युम्न साचा । न करीं नामाचा आळस कदा ॥१॥ संसार यातना जाती पां निर्धारें । नाम निरंतर जपें आधीं ॥२॥ जनार्दनाचा एका त्रैलोक्याचा सखा । झाली पूर्ण कृपा जनार्दन ॥३॥

१३४९. नाम अनिरुद्ध जगीं तें प्रसिद्ध । ओहंसोहं बोध गिळोनी गाये ॥१॥ अहंकार सांडीं नाम मुखें मांडीं । साधन देशधडी करुनी जपें ॥२॥ जनार्दनाचा एका साधन सारुनी । जनार्दनचरणीं विनटला ॥३॥

१३५०. नाम पुरुषोत्तम घेईं तूं आवडीं । यातना कल्पकोडी नाहीं तुज ॥१॥ नाम हें आठवीं नाम हें आठवीं । हृदयीं सांठवीं पुरुषोत्तम ॥२॥ जनार्दनाचा एका पारखी नेटका । पुरुषोत्तम सखा जोडिलासे ॥३॥

१३५१. नाम तूं अधोक्षज घेईं सर्वकाळ । महा काळा काळ अधोक्षज ॥१॥ नामीं धरुनी प्रीति आठव सर्वदा । नाहीं तुज बाधा जन्मोजन्मीं ॥२॥ जनार्दनाचा एका प्रेमें विनटला । आपुलासा केला जनार्दन ॥३॥

१३५२. नाम नारसिंह नाम नारसिंह। भक्तांसी तो सम सर्वकाळ ॥१॥ जपें तो प्रल्हाद आवडी तें नाम। पावला सर्वोत्तम तयालागीं ॥२॥ जनार्दनाचा एका रूप तें पाहुनी। नारसिंह चरणीं मिठी घाली ३

१३५३. वदें तूं अच्युत सर्वकाळ सदा । मायापाश बंध तुटोनि जाय ॥१॥ करीं करीं नेम धरीं करीं प्रेम । अच्युताचें नाम वदें सदा २ जनार्दनाचा एका अच्युत पैं झाला । सप्रेमें रंगला प्रेमरंगीं ॥३॥

१३५४. नाम जनार्दन रूप जनार्दन । ध्यान जनार्दन सर्व मज ॥१॥ माय जनार्दन बाप जनार्दन । जन जनार्दन सर्व मज ॥२॥ जनार्दनाचा एका जनार्दन देखा । जनीं वनीं सखा जनार्दन ॥३॥

१३५५. नाम उपेंद्र सर्व देवांचा तो इंद्र । शुभ काळ वक्त्र जप सदा ॥१॥ तें नाम सोपें जपें करिं वाचे । अहर्निशीं साचें नाम जप २ जनार्दनाचा एका एकभावें नटला। हृदयीं सांठविला जनार्दन ३

१३५६. नाम हरिहरि संसार तो हरी । सबाह्य अभ्यंतरीं हरी माझा ॥१॥ हरिनाम जपें हरिनाम जपें । तें वर्म सोपें हरी जपें ॥२॥ जनार्दनाचा एका हरिचरणीं देखा । सुखासुख सुखा अनुभवला ॥३॥

१३५७. नाम श्रीकृष्ण उद्धवें साधिलें । चोविस नामें झालें जप पचे ॥१॥ आठवा श्रीकृष्ण आठवा श्रीकृष्ण । आठवा श्रीकृष्ण वेळोवेळां ॥२॥ जनार्दनाचा एका श्रीकृष्ण निजसखा । जनार्दनें देखा दावियेला ॥३॥

१३५८. नामपाठ विठ्ठल पंचविसावा वाचे । सार्थक जन्माचें जालें जालें ॥१॥ विठ्ठल विठ्ठल वदतां वो वाचे । सार्थक जन्माचें झालें साचें ॥२॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाय । विठ्ठल विठ्ठल ध्यायें वेळोवेळां ॥३॥

१३५९. झाला नामपाठ झाला नामपाठ। मोक्ष मार्ग वाट सोपी झाली ॥१॥ आवडीं आदरें नामपाठ गाये । हरीकृपा होय तयावरी ॥२॥ जनार्दनाचा एका नामपाठें निका। तोडियेली शाखा अद्वैताची ३

---

# कीर्तनमहिमा.

१२६०. क्षीरसागर सांडोनि हरी । कीर्तनीं उभा सहपरीवारीं । लक्ष्मी गरुड कामारी । होती तया कीर्तनीं ॥१॥ आलिया विघ्न निवारी आपण । शंख चक्र गदा हातीं घेऊन । सुदर्शन कौस्तुभ-मंडित जाण । उभा असे चतुर्भुज ॥२॥ गरुड तिष्ठे जोडिल्या करीं । लक्ष्मी तेथें कामारी । ऋद्धिसिद्धि सहपरिवारीं । तिष्ठताती स्वानंदें ॥३॥ कीर्तन गजरें वाहे टाळी । महा दोषांची होय होळी । एका-जनार्दनीं गदारोळी । नामोच्चार आनंदें ॥४॥

१२६१. श्रीशंभूचें आराध्य दैवत । क्षणीं वैकुंठीं क्षणीं क्षीर-सागरांत । जयालागीं योगी तप तपती समस्त । तो सांपडला आह्मां कीर्तन रंगांत ॥१॥ धन्य धन्य कीर्तन भूमंडळीं । महा दोषां होतसे होळी । पूर्वज उद्धरती सकळी । वाहतां टाळी कीर्तनीं ॥२॥ पार्वतीसी गूज सांगे आपण । शंकर राजा बोले वचन । माझें आ-राध्य दैवत जाण । कीर्तन रंगणीं उभें आहे ॥३॥ मी त्रिशूळ पाशु-पत घेउनी करीं । कीर्तना भोंवतीं घिरटी करीं । विघ्ना हाणोनि लाथा निवारीं । रक्षीं स्वयें हरिदासां ॥४॥ त्याचे चरणींचे रज वंदी आपण । हें पार्वतीसी सांगे गुह्य ज्ञान । एकाजनार्दनीं शरण । कीर्तन रंगीं नाचतसे ॥५॥

१२६२. तेजाचें तेजस रूपाचें रूपस । वैकुंठनिवास पंढरीये ॥१॥ पाहतां चित्त निवे मनाचें उन्मन । ते समचरण विटेवरी ॥२॥ आदी अंत नाहीं पाहतां प्रकार । तो हा सर्वेश्वर भीमातटीं ॥३॥ योगी चिंतिती अखंडता मनीं । तें उभें असे रंगणीं वैष्णवांचे ॥४॥ समाधी अष्टांग साधनें साधिती । तो मागे क्षीरापती आ-पुल्या मुखें ॥५॥ एकाजनार्दनीं भावाचा लंपट । सांडोनी वैकुंठ कीर्तनीं डोले ॥६॥

१२६३. कीर्तनाची आवडी देवा । वैकुंठाहूनि घाली धांवा ॥१॥ नवल वैकुंठींच नसे । तो कीर्तनीं नाचतसे ॥२॥ भाळ्याभोळ्या-साठीं । धांवे त्याच्या पाठोपाठीं ॥३॥ आपुलें सुख तया द्यावें । दुःख आपण भोगावें ४ दीनानाथ पतीत पावना । एकाजनार्दनीं वचना ५

१३६४. गरुड हनुमंतादि आपण । सामोरा येत जगजीवन ॥१॥ आवडी कीर्तनीं ऐशी । लक्ष्मी तेथें प्रत्यक्ष दासी ॥२॥ मोक्षादिकां नव्हे वाड । येरा कोण वाहे काबाड ॥३॥ एकाजनार्दनीं भुलला । उघडा कीर्तनीं रंगला ॥४॥

१३६५. कीर्तनीं आवडी जया नरा देखा । चुकतील खेपा जन्म कोटी ॥१॥ कीर्तनीं समाधी कीर्तनीं समाधी । तुटे आधीव्याधी कीर्तनेंची ॥२॥ कीर्तनें बोध कीर्तनें सिद्धी । एकाजनार्दनीं गोविंदीं कीर्तनीं ऐक्य ॥३॥

१३६६. देवासी तों मुख्य कीर्तनाची गोडी । म्हणोनियां उडी घाली स्वयें ॥१॥ नावडे तया आणीक संकल्प । कीर्तनीं विकल्प करितां क्षोभे ॥२॥ साबडे भाळे भोळे नाचताती रंगीं । प्रेम तें अंगीं देवाचिये ॥३॥ एकाजनार्दनीं धांवे लवलाहें । न तो कांहीं पाहे आपणातें ॥४॥

१३६७. धन्य भाग्याचे जन इहलोकीं । कीर्तनें जाले सुखी कृतकृत्य ॥१॥ पातकी घातकी यासी सोपा पंथ । कीर्तनें सरते कलीमाजी ॥२॥ योगयाग व्रत तप कल्पकोडी । कीर्तन श्रवण गोडी तेथें नाहीं ॥३॥ वेदशास्त्र पुराण श्रुतीचें अनुमोदन । करारे कीर्तन कलीमाजी ॥४॥ एकाजनार्दनीं आल्हादें कीर्तन । करितां श्रोते वक्ते जाण पावन होती ॥५॥

१३६८. तरले तरती भरंसा । कीर्तन महिमा हा ऐसा ॥१॥ म्हणोनियां हरीचे दास । कीर्तन करिती सावकाश ॥२॥ एकाजनार्दनीं कीर्तन । आनंदें होती ते पावन ॥३॥

१३६९. देखोनी कीर्तनाची गोडी । देव धांवे लवडसवडी ॥१॥ वैकुंठींहुनी आला । कीर्तनीं तो सुखें धाला ॥२॥ ऐसा कीर्तनाचा गजर । देव नाचतसे निर्भर ॥३॥ भुलला कीर्तनीं । एका शरण जनार्दनीं ॥४॥

१३७०. धन्य धन्य तें शरीर । जेथें कथा निरंतर ॥१॥ गुण गाती भगवंताचे । तेचि जाणावे दैवाचे ॥२॥ स्वयें बोलिले जगज्जीवन । थोर कलियुगीं कीर्तन ॥३॥ एकाजनार्दनीं भले । हरिभक्तीनें उद्धरिले ॥४॥

१३७१. कीर्तनाचें थोर सुख । यदुनायक राहे उभा ॥१॥ भाळे भोळे घेती नाम । करिती आराम कीर्तन ॥२॥ नाना साधनांचे वोढी । न लगे सांकडी सोसाव्या ॥३॥ एकाजनार्दनीं सोपें बहु । कीर्तनीं पाहूं देवातें ॥४॥

१३७२. मधुपर्कादिक नावडे पूजन । आवडे कीर्तन भाविकांचें ॥१॥ शंखचक्रादिक नावडती मनीं । वोडवितसे पाणी भाजीपाना ॥२॥ लक्ष्मीसारखी नावडती जीवा । आवडे या देवा तुळशी बुक्का ३ एकाजनार्दनीं कीर्तनीं नाचे । आणिक सुख त्याचें नये मना ४

१३७३. सर्वभावें जे झाले उदास । धरूनियां आस कीर्तनीं ॥१॥ सर्वकाळ सर्व वाचे । सर्व साचें कीर्तन ॥२॥ सर्वां देहीं सर्वविदेहीं । सर्वां वदवी कीर्तन ॥३॥ सर्व मनीं सर्व ध्यानीं । सर्वां ठिकाणीं कीर्तन ॥४॥ सर्व देशीं सर्व गांवीं । एका भावीं कीर्तन ॥५॥

१३७४. पुरुष अथवा नारी । नाचती कीर्तनीं गजरीं ॥१॥ तयां कोण्ही जे हांसती । त्यांचे पूर्वज नरका जाती ॥२॥ आपुली आपण । कीर्तनीं सोडवण ॥३॥ देहीं असोनी विदेहता । कीर्तनीं होय पैं तत्त्वतां ॥४॥ ऐसा कीर्तन महिमा । एकाजनार्दनीं उपमा ॥५॥

१३७५. देवासी दुजें नावडे सर्वथा । करितां हरिकथा समाधान ॥१॥ येऊनियां नाचे कीर्तनीं सर्वदा । निवारी आपदा सर्व त्याची ॥२॥ भाविकांसाठीं मोठा लोभापर । नाचतो निर्भर कीर्तनांत ३ एकाजनार्दनीं आवडे कीर्तन । म्हणोनी वैकुंठसदन नावडेची ॥४॥

१३७६. देवासी प्रिय होय कीर्तन । नाचे येऊन आनंदें ॥१॥ न विचारी यातीकुळ । असोत अमंगळ भलतैसे ॥२॥ करती कीर्तन अनन्य भावें । ते पढीये जीवेंभावें ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । कुळें पावन होती कीर्तनीं ॥४॥

१३७७. हेंचि कलीमाजी साधन । आवडी कीर्तन हरीचें ॥१॥ न घडे योगयागतप । होय अनुताप कीर्तनीं ॥२॥ भावभक्ति लागे हातीं । प्रेम धरिती कीर्तनीं ॥३॥ आवडी धरा हरिकीर्तनीं । एका शरण जनार्दनीं ॥४॥

१३७८. ऐशी शांति जयासी देखा । तोचि सर्व भूतांचा सखा

॥१॥ सर्व लोकीं आवडला । जाला सरता कीर्तनीं ॥२॥ नवलावो तयाचा भावो । सर्वां ठाईं देखे देवो ॥३॥ सर्व दृष्टीचा देखणा । शरण एकाजनार्दना ॥४॥

१३७९. तुमचें चरित्र श्रवण । आवडी करूं तें कीर्तन ॥१॥ संसार पुसोनियां वाव । निजपद देशी ठाव ॥२॥ स्वभावें कीर्तन करितां । एवढा लाभ येत हातां ॥३॥ एकाजनार्दनीं कीर्तन । होती पातकी पावन ॥४॥

१३८०. आवडी करितां हरि कीर्तन । हृदयीं प्रगटे जनार्दन ॥१॥ थोर कीर्तनाचें सुख । स्वयें तिष्ठे आपण देख ॥२॥ धांत आलिया सिवारी । चक्र गदा घेउनी करीं ॥३॥ कीर्तनीं होऊनि सादर । एकाजनार्दनीं तत्पर ॥४॥

१३८१. जेथें सर्वदा कीर्तन घोष । जाती दोष पळुनी ॥१॥ यमधर्म सांगे दूता । तुम्ही सर्वथा जाऊं नका ॥२॥ जेथें स्वर्गे हरी उभा । कोण शोभा तुमची ॥३॥ तुम्हीं रहाणें उगें पुढें । आलें कोडें निवारावें ॥४॥ एकाजनार्दनीं कीर्तन । श्रेष्ठ सर्वांहुनी जाण ॥५॥

१३८२. कीर्तनें सिद्धि कीर्तनें सिद्धि । कीर्तनें निरसे आधि-व्याधि ॥१॥ कीर्तनें काया कीर्तनें माया । कीर्तनें सर्व एके ठायीं ॥२॥ द्वंद्व द्वैत भेद पुरेचि ठाव । कीर्तनीं तिष्ठे उभाचि देव ॥३॥ निर्गुणमाजी बोराणे देवो । म्हणे भज ठावो कीर्तनीं ॥४॥ एकाजना-र्दनीं कीर्तनासाठीं । देव धांवे भक्तापाठीं ॥५॥

१३८३. एक कीर्तन करितां पंढरीसी । शुकृताच्या राशी ब्रह्मा नेणे ॥१॥ संतसमागम टाळ घोळ नाद । ऐकतां गोविंद सुख पावे ॥२॥ जनार्दनाचा एका करी विनवणी । मस्तक चरणीं ठेवितसे ॥३॥

१३८४. जुनाट कीर्तन महिमा । तया काय देऊं उपमा ॥१॥ धन्य धन्य हरिचे दास । करिती आस कीर्तनीं ॥२॥ मागें तरले पुढें तरती । पहा प्रचीति पुराणीं ॥३॥ म्हणोनि एका काकुळती । कीर्तन करा दिनराती ॥४॥

१३८५. कीर्तनें तोषे अधोक्षज । राखी लाज भक्तांची ॥१॥ धांवे द्रौपदीचे पानासाठीं । भीड मोठी कीर्तनाची ॥२॥ वधा गर्भ-

वास सोसले । उणें नाहीं आलें भक्तांचें ॥३॥ एका विनवी जनार्दनीं । कीर्तनीं प्राणी धन्य होती ॥४॥

१३८६. जन्ममरणाचें निवारेल दुःख । करितां देख कीर्तन ॥१॥ नारद प्रल्हाद अंबऋषि । विनटले कीर्तनासी ॥२॥ व्यास शुक वामदेव । धरिती भाव कीर्तनीं ॥३॥ एका त्याचा दास खरा । करी पसारा कीर्तन ॥४॥

१३८७. महा पापराशी तरले कीर्तनीं । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य जाले ॥१॥ वाल्हा अजामेळ तारिली गणिका । त्रैलोक्यीं देखा सरते जाले ॥२॥ कीर्तनें दोष पळती रानोरान । यापरतें आन दुजें नाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं कीर्तन सार । तेणें पैलपार उतरलों ॥४॥

१३८८. कीर्तनाची आवडी मोठी । प्रेमें देव घाली मिठी ॥१॥ कीर्तन प्रिय पैं गोविंदा । आदरें पूजितो नारदा ॥२॥ कीर्तन करितां अभेदु । आदरें रक्षिला प्रल्हादु ॥३॥ गजेंद्र करी नामस्मरण । धांवण्या धांवे नारायण ॥४॥ एकाजनार्दनीं कळवळा । भक्तालागीं देव भोळा ॥५॥

१३८९. अंतर शुद्धीचें कारण । वाचे करा हरीकीर्तन ॥१॥ कीर्तनीं देवा आवडी कैशी । धेनु धांवे वत्सा जैशी ॥२॥ कीर्तनीं तारिला वाल्हा कोळी । अजामेळ दोषी वळी ॥३॥ कीर्तनीं तारिली गणिका । नामस्मरणें मोक्ष देखा ॥४॥ ऐशी कीर्तनाची गोडी । एकाजनार्दनीं घाली उडी ॥५॥

१३९०. करितां कीर्तन श्रवण । अंतर्मळाचें होत क्षालन ॥१॥ तुमचें कीर्तन पवित्र कथा । पावन होय श्रोता वक्ता ॥२॥ तुमचे कीर्तनीं आनंद । गातां तरले ध्रुव प्रल्हाद ॥३॥ कीर्तनाचा गजर होतां । यम काळ पळे सर्वथा ॥४॥ एकाजनार्दनीं कीर्तन । तिन्हीं देव वंदिती चरण ॥५॥

१३९१. कीर्तनीं प्रल्हाद तरला । बिभिषण मुक्त जाला ॥१॥ ऐसा कीर्तन महिमा । गणिका नेली निजधामा ॥२॥ तारले वानर असुर । कीर्तनीं पावन चराचर ॥३॥ गाई गोपाळ संवगडे । कीर्तनीं तरले वाडेंकोडें ४ अजामेळ उद्धरिला । कीर्तनीं आल्हाद भला ॥५॥ एकाजनार्दनीं कीर्तन । कली कलमष नाशी क्षण ॥६॥

१३९२. कीर्तन श्रेष्ठ कलियुगीं सेवा । तरले पातकी ते देवा ॥१॥ वाल्हा तारिला कीर्तनीं । पावन जाला त्रिभुवनीं ॥२॥ गणिका कीर्तनें तरली । मोक्षधामा ती नेली ॥३॥ अजामेळ चोखा महार । कीर्तनीं तरले अपार ॥४॥ एकाजनार्दनीं कीर्तन । तिन्ही लोक जाले पावन ॥५॥

१३९३. वेदाचिया मतें विसरूनि कीर्तन । करती जे पठन क्षीण त्यांसी ॥१॥ वेदाचा अर्थ न कळेची पाठका । कीर्तनीं नेटका भाव सोपा ॥२॥ श्रुतीचेनी मतें पाहे तो उच्चार । परी सारासार विचार कीर्तनीं ॥३॥ एकाजनार्दनीं पुराणाच्या गोष्टी । कीर्तन वाक्पुटीं करा सुखें ॥४॥

१३९४. पाहूं गेलीये हरी जागरा । नयन लांचावले नंदकुमरा ॥१॥ कान्हयारे मनमोहना । देहगेहाची तुटली वासना ॥२॥ आदरें आवडीं ऐकतां नाम । नाममात्रें जालों निष्काम ॥३॥ एकाजनार्दनीं हरिकीर्तन । समाधीसी तेथें समाधान ॥४॥

१३९५. नसे वैकुंठीं अणुमात्र । नाचतां पवित्र कीर्तनीं ॥१॥ त्याचा छंद माझे मनीं । अनुदिनीं कीर्तन ॥२॥ नेणें कांहीं दुजें आतां । कीर्तनापरता छंद नाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं वेध । कीर्तन छंद गोड देखा ॥४॥

१३९६. नेणे वेदशास्त्र पुराण पठन । तेणें नाम कीर्तन करावें ॥१॥ कलीमाजी सोपा मार्ग । तरावया जग उत्तम हें ॥२॥ नोहे यज्ञ यागयोग व्रत । करावें व्रत येकादशी ॥३॥ एकाजनार्दनीं सार । वाचे उच्चार हरिनाम ॥४॥

१३९७. चरणीं ठेउनी माथा संतांसी पुसावें । उगेंची ऐकावें हरिकीर्तन ॥१॥ कलीमाजी श्रेष्ठ कलीमाजी श्रेष्ठ । कीर्तन बोभाटें पळती दोष ॥२॥ न लगे नाना युक्ती व्युत्पत्तीचें वर्म । हरीचें कीर्तन सोपें बहु ॥३॥ योगयागादिक नोहे यथासांग । तेणें होय भंग सर्व कर्मा ४ एकाजनार्दनीं धरुनी विश्वास । जाईं तूं संतांस शरण सुखें ५

१३९८. नरदेहा येउनी करावें कीर्तन । वाचे नामस्मरण विठ्ठलाचें ॥१॥ आणिक सायास न करीं आळस । सर्वकाळ सोस

हाचि वाहे ॥२॥ घटिका आणि पळ न वेंचीं वांयां । नामस्मरणीं काया झिजवावी ॥३॥ प्रपंच परमार्थ करीं कारे सारखा । संसार पारखा करुनी सांडीं ॥४॥ माईक हें धन इष्टमित्र सखे । अंतकाळीं पारखे अवघे चोर ॥५॥ एकाजनार्दनीं न धरीं भरंवसा । कोण यमपाशा चुकवील ॥६॥

१३९९. देह लावीं हरीकीर्तनीं । येर कारणीं पडूं नको ॥१॥ सोडीं संसाराचा छंद । कीर्तनीं गोविंद आठवीं ॥२॥ होईं दास संतचरणीं । पायवणी वंदीं तूं ॥३॥ काया लावीं देवाकडे । येर सांकडें वारील ॥४॥ अनुमोदन सर्वांठाईं । मन देईं हरिचरणीं ॥५॥ ह्मणे जनार्दनाचा एका । कायावाचा भाविका सांगत ॥६॥

१४००. नरदेह उत्तम चांग । धरा लाग कीर्तनीं ॥१॥ वांयां जाऊं नेदा घडी । करा जोडी कीर्तन ॥२॥ क्षणभंगुर हा देहो । करा लाहो कीर्तनीं ॥३॥ संसार अवघा नासे । खरें दिसे कीर्तन ४ ह्मणे जनार्दनीं एका । उपाय निका कीर्तन ॥५॥

१४०१. शुद्ध ज्याचें मन । तया आवडे कीर्तन ॥१॥ येर ते पामर पातकी । दैन्यवाणे तिहीं लोकीं ॥२॥ नावडे हरीचें कीर्तन । तेथें वसे नाना विघ्न ॥३॥ एका शरण जनार्दनीं । करा कीर्तन अनुदिनीं ॥४॥

१४०२. वाउगा पसारा नेणे तो पामर । कीर्तनीं निर्धार ठेवीचिना ॥१॥ सोपें हें वर्म कीर्तन हरीचें । उच्चारीं रे वाचे रामनाम ॥२॥ एकाजनार्दनीं कीर्तन आदरें । सर्वभावें निर्धारें श्रवण करी ३

१४०३. कायावाचा मनें निग्रह करीं । कीर्तन सर्वभावें ऐकें निर्धारी । अष्टांग साधन न करीं । सुखें करीं कीर्तन ॥१॥ देव तुष्टेल तुष्टेल । सर्वभाव तुझा पुरवेल ॥धु०॥ शांति क्षमा दया उन्मनी । आशा मनीषा तृष्णा दवडोनी । कामक्रोध मद लोभ बंदीखानीं । घालीं नेउनी निर्धारें ॥२॥ सर्वांभूतीं समदृष्टी । पाहे सर्व एकमय सृष्टी । तरी ऐक्य कीर्तन गोष्टी । परमानंदें आल्हाद ॥३॥ धरी संतांचा सांगात । कीर्तनीं करीं शुद्ध चित्त । एकाजनार्दनीं वचनार्थ । रामहरी गोविंद ॥४॥

१४०४. जो जो काळ वेंचिता कीर्तनीं । तों तों सार्थक जनीं होतसे ॥१॥ साधन जागा साधन जागा । पुढें दगा चुकवी ॥२॥ करीं कीर्तनीं तूं वेग । तेणें संग तुटेल ॥३॥ ह्मणे जनार्दनाचा एका । उपाय सोपा कलीमाजी ॥४॥

१४०५. सप्रेम नाचोनी वाजवा टाळी । गर्जा हरिकथा नामावळी ॥१॥ ऐशी कथेची आवडी । दोष गेले देशोधडी ॥२॥ सेवितां कथामृतसार । दीन वदनें दिसे संसार ॥३॥ एकाजनार्दनीं प्रेम । स्वयें सांगे पुरुषोत्तम ॥४॥

१४०६. दीन ह्मणोनी नाचरे कीर्तनीं । तेणें चक्रपाणी करी कृपा ॥१॥ अनाथाचा नाथ पतीतपावन । ह्मणोनी कीर्तन तया गोड ॥२॥ एकाजनार्दनीं गोडाचें तें गोड । कीर्तन सुरवाड तिहीं लोकीं ॥३॥

१४०७. भुलले ते प्राणी विसरले कीर्तना । अंतीं त्या पतना वारी कोण ॥१॥ जयांसी नावडे हरीचें कीर्तन । ते जाणावे पाषाण कलीमाजी ॥२॥ मागें सांगितलें संतीं अनुभवुनी । तरावया जनीं कीर्तन नौका३एकाजनार्दनीं साराचें हें सार । कीर्तनें भवपार मृत्युलोकीं४

१४०८. अपाय उपाय न टाकी कीर्तन । सदा सर्वकाळ ध्यान रामकृष्ण ॥१॥ तयाचिये घरीं वसे नारायण । लक्ष्मीसह आपण कार्य करी ॥२॥ एकाजनार्दनीं कीर्तनासाठीं । देव धांवे पाठीं त्यामागें ॥३॥

१४०९. नसे वैकुंठीं हरी । नाचे कीर्तनीं परोपरी । भक्तांबरोबरी । पाठीं धांवे तयाच्या ॥१॥ ह्मणोनी करावें कीर्तन । तेणें तुष्टे नारायण । मनोरथ करी पूर्ण । इच्छिले ते सर्वदा ॥२॥ आणा अनुभव मनीं । करा कीर्तन अनुदिनीं । एकाजनार्दनीं । उभा असे कीर्तनीं ३

१४१०. करुनी हरिकीर्तन । तेथें सेविती जे अन्न ॥१॥ ऐसे अभागी खळ । परम चांडाळ कलीयुगीं ॥२॥ हरिकथा माउली । विकिताती अर्थ भुली ॥३॥ पंच महा पातक । तयां घडे दोष देख ॥४॥ एकाजनार्दनीं । करा कीर्तन अनुदिनीं ॥५॥

१४११. करुनी कीर्तन मागती जे द्रव्य । तें जाणावें वैधव्य विधवेचें ॥१॥ सर्व अळंकार शरीर शोभलें । वांयांपरी गेलें कुंकूंहीन ॥२॥ मानवानें भावें करावें कीर्तन । आनंदें नर्तन वैष्णवांपुढें ३ एकाजनार्दनीं कामनीक कीर्तन । करितां पतन जन्मोजन्मीं ॥४॥

१४१२. साधन नको आणिक कांहीं। करीं लवलाहीं कीर्तन ॥१॥ मोक्ष मुक्ती ठाके पुढें। येर अवघें तें बापुडें ॥२॥ भक्ति साधे नवरत्नें। कीर्तनें होती ते पावन ॥३॥ एकाजनार्दनीं कीर्तन। ओहं सोहं कोहं जाती पळून ॥४॥

१४१३. सामाधीचें स्थान हरीकीर्तन। येर आवघा वांयां शीण। कासया गुदाग्रीं अंगुष्ठ लाऊन। खटाटोप पसारा ॥१॥ रामकृष्ण हरी वासुदेवा। हाचि छंद असो जीवा ॥ध्रु०॥ आसन ध्यान मुद्रा लक्षण। कर्मकांड क्रिया धर्म जाण। वाउगी कासुझा भस्म लेपन। कीर्तन अंतरीं नसेची ॥२॥ माळा मुद्रा शृंगार भारी। भाळें भोळें भोंदी निरंतरीं। ऐशी कीर्तन मर्यादा नाहीं निर्धारीं। निरपेक्ष हरीकीर्तन ॥३॥ श्रोता वक्ता होउनी सावधान। परनिंदा परपीडा टाकून। कीर्तन करावें श्रवण। रामकृष्ण नामें उच्चार ॥४॥ ऐसें ऐकतां कीर्तन। समाधीसी तेथें समाधान। अष्टांगादि कर जोडोन। उभे सर्वदा राहाती ॥५॥ कीर्तनें होय सर्व सिद्धी। तुटती भवपाश आधिव्याधि। एकाजनार्दनीं नाहीं उपाधि। कीर्तन श्रवण केलिया ॥६॥

१४१४. सदैव आवडे ज्यां कीर्तन। धन्य पावन जगीं ते ॥१॥ ब्रह्मचारी गृहस्थाश्रमी। करिती कीर्तन निजधार्मी ॥२॥ शुद्ध अथवा अति निंद्य। कीर्तनीं वंद्य सर्वथा ॥३॥ यवन मातंगादी जन। कीर्तनीं पावन कलियुगीं ॥४॥ एका शरण जीवेंभावें। सदा कीर्तन करावें ॥५॥

१४१५. कीर्तनानंदें चारी मुक्ति। धांवत येती घरासी ॥१॥ सोपें सार सोपें सार। कीर्तन उच्चार कलियुगीं ॥२॥ वाहतां टाळी कीर्तन छंदें। जाती वृंदें पातक ॥३॥ एका विनटला कीर्तनीं। भुक्तिमुक्ति लागती चरणीं ॥४॥

१४१६. हरीकीर्तनें चित्त शुद्ध। जाय भेद निरसुनी ॥१॥ कामक्रोध पळती दुरी। होत भोंवरी महापापा ॥२॥ गजरें हरीचें कीर्तन। पशुपक्षी होती पावन ॥३॥ स्त्रीपुरुषां अधिकार। कीर्तन सार कलियुगीं ॥४॥ एकाजनार्दनीं उपाय। तरावया भवनदीसी ५

१४१७. कीर्तनासाठीं चारी मुक्ति । उभ्या राबती हरिदासां १ कलियुगीं हेंचि सार । करावें साचार कीर्तन ॥२॥ कृता त्रेता द्वापारीं । कीर्तनमहिमा परोपरी ॥३॥ एका तयांसी शरण । कीर्तन करिती अनुदिन ॥४॥

१४१८. परंपरा कीर्तन चाली । मागून आली अनिवार ॥१॥ उद्धवा सांगे जनार्दन । कीर्तन पावन कलीमाजी ॥२॥ अर्जुना तोची उपदेश । कीर्तन उद्देश सर्वथा ॥३॥ एकाजनार्दनीं तत्पर । कीर्तन करावें निरंतर ॥४॥

१४१९. काळाचें तों न चले बळ । करितां कल्लोळ कीर्तनीं ॥१॥ शिव सांगे गिरजेप्रती । कीर्तनीं प्रीति धरावी ॥२॥ सांगे शुक परीक्षिती । कीर्तनीं उद्धार पावती ॥३॥ एका अनन्य त्याचा दास । धरती आस कीर्तनीं जे ॥४॥

१४२०. कीर्तनीं स्वधर्म वाढे । कीर्तनीं जोडे चित्तशुद्धि ॥१॥ ऐसा महिमा कीर्तनाचा । शुक सांगे परीक्षिती साचा ॥२॥ होती पावन अधम जन । करितां कीर्तन कलियुगीं ॥३॥ एका त्याचा दासानुदास । जाती कीर्तनास आवडी जे ॥४॥

१४२१. शाम चतुर्भुज पीतांबरधारी । शंख चक्र मिरवे करीं ॥१॥ आला पुंडलीकाकारणें । आवडी कीर्तनें धरुनी ॥२॥ युगें अठ्ठावीस जालीं । न बैसे उभा सम पाउलीं ॥३॥ कीर्तनीं धरूनियां हेत । उभा राहिला तिष्ठत ॥४॥ एका शरण जनार्दनीं । अनुदिनीं करा कीर्तन ॥५॥

१४२२. कीर्तनाची देवा आवडी । ह्मणोनी धांवे तो तांतडी ॥१॥ सुख कीर्तनीं अद्भुत आहे । शंकरराज जाणताहे ॥२॥ गोडी सेविती संतजन । येरां न कळे महिमान ॥३॥ ऐसा कीर्तन सोहळा । एकाजनार्दनीं पहा डोळां ॥४॥

१४२३. कीर्तनाची मर्यादा कैसी । देव सांगे उद्धवासी ॥१॥ गावें नाचावें सावडें । व घालावें कोडें त्या कांहीं ॥२॥ मिळेल तरी खावें अन्न । अथवा पर्णें तीं भक्षून ॥३॥ जाईल तरी जावो प्राण । परी न संडावें कीर्तन ॥४॥ किरकीर आणूं नये पाठीं । बोलूं नये

भलती गोष्टी ॥५॥ स्वयें उभा राहून । तेथें करीं मी कीर्तन ॥६॥ घात आलिया निवारी । माता जैसी बाळावरी ॥७॥ बोले उद्धवासी गूज । एका जनार्दनीं बीज ॥८॥

१४२४. उद्धवा तूं करीं कीर्तन । अनन्यभावें माझें भजन । नको आणीक साधन । यापरतें सर्वथा ॥१॥ धरीं प्रेम सदा वाचे । कीर्तनरंगीं तूं नाचें । मीतूंपण साचें । अंगीं न धरीं कांहीं ॥२॥ भाळे भोळे जन । गाती अनुदिनीं कीर्तन । तेथें अधिष्ठान । माझें जाण सर्वथा ॥३॥ नको चुकूं तया ठाई । बसें सर्वदा मीही । एकाजनार्दनीं पाही । कीर्तनीं वसे सर्वदा ॥४॥

१४२५. जें पदीं निरूपण तेंचि हृदयीं ध्यान । तेथें सहजीं स्थिर राहे मन । कीर्तनासी तोषोनि कळिकाळ तुष्टला । समाधीसी समाधानरे रे ॥१॥ कीर्तनें सिद्धि कीर्तनें सिद्धि । कीर्तनें समाधान बुद्धि । कीर्तनीं विनटले नारद प्रल्हाद । द्वंद्वामाजी समाधी रे ॥२॥ कीर्तनीं सद्भाव अखंड अहर्निशीं । पाप न रिघे त्याच्या देशीं । निजनामें निष्पाप अंतर देखोनि । देव तिष्ठे तयापाशीं रे ॥३॥ हरिनाम कीर्तनें अभिमान सरे । आणिक श्रेष्ठ आहे काज । सद्भावें कीर्तनीं गातां पैं नाचतां । लोकेषणा सांडीं लाज रे ॥४॥ कलीमाजी कीर्तन श्रेष्ठ पैं साधन । साच न मानी ज्याचें मन । नामासी विन्मुख जन्म त्यासी दुःख । त्या केविं होय समाधान रे ॥५॥ कीर्तनाचेनि पंथें लाजविलीं तीर्थें । जप तपासी केलें मुक्त । हरिनामें लोधला देवाधिदेवो । वैकुंठचि केलें तेथें रे ॥६॥ व्रतां तपां तीर्थां न भेटे जो पाहतां । तो कीर्तनीं सांपडे देवो । तनु मन प्राणें कीर्तनीं विनटले । भावा विकिला वासुदेवो रे ॥७॥ एकाजनार्दनीं कीर्तन भावें । श्रोता वक्ता ऐसें लाहावें । गर्जत नामें निशाण लागुनी । सकळिकीं वैकुंठासी जावें रे ॥८॥

१४२६. हरीकीर्तन नामोच्चार । जे नर करिती वारंवार । तया नाहीं संसार । ब्रह्मादि देव वंदिती ॥१॥ कीर्तनमहिमा नारदु । जाणतसे परमानंदु । जालासे सर्वां वंद्यु । देवां असुर मानवां ॥२॥ कीर्तनमहिमा परीक्षिती । जाणतसे परम प्रीती । अंतीं सायुज्यता

मुक्ती । पावती झाली ॥३॥ कीर्तनमहिमा जाणे शुक । जाणती ते व्यासादिक । वाल्मिकादि सर्व सुख । कीर्तनें सरते ॥४॥ कीर्तनमहिमा जाणे प्रल्हादु । तोडियेला मायाकंदु । कोरडे काष्ठीं गोविंदु । प्रगटला ॥५॥ कीर्तनमहिमा जाणे बळी । याचक झाला वनमाळी । एकाजनार्दनीं कळीं । कीर्तनें न पीडी ॥६॥

१४२७. आणिक तें आह्मां न दिसे प्रमाण । कीर्तनावांचून आनु लेणों ॥१॥ रामकृष्ण हरी विठ्ठल उच्चार । करूं हा गजर वाहूं टाळी ॥२॥ आनंदें नामावळी गाऊं पैं कीर्तनीं । श्रुती टाळ घोळ लाउनी गजरेंसी ॥३॥ एकाजनार्दनीं हाचि आह्मां छंद । वाउगा तो धंदा करूं कांहीं ॥४॥

१४२८. आमुच्या स्वहिता आम्ही जागूं । वाउग्या न लागूं मार्गासी ॥१॥ करूं पूजन संत सेवा । होंचि देवा आवडतें ॥२॥ तुळशी माळा घालूं गळां । मस्तकीं टिळा चंदन ॥३॥ मुद्रा अळंकार भूषण । करूं कीर्तन दिननिशीं ॥४॥ एकाजनार्दनीं न सेवूं आन । वाहूं आण देवाची ॥५॥

१४२९. येती कीर्तना आल्हादें । गाती नाचती परमानंदें । सुखाचे ते दोंदें । आनंदें तयासी ॥१॥ धन्य धन्य कीर्तन । धन्य धन्य संतजन । जाले कीर्तनीं पावन । परमानंद गजरीं ॥२॥ हरी कृष्ण गोविंद । हाचि तया नित्य छंद । तेणें जाय भेदाभेद । कीर्तन गजरीं ॥३॥ एकाजनार्दनीं सार । कीर्तनीं केलासे निर्धार । आणिक नाहीं दुजा विचार । कीर्तनावांचून ॥४॥

१४३०. नारदें केलासे प्रश्न । सांगतसे जगजीवन । कळीमाजी प्रमाण । कीर्तन करावें ॥१॥ महापापीयां उद्धार । पावन करती हरिहर । ब्रह्मादि सामोर । लोटांगण घालिती ॥२॥ श्रुती स्मृति वाक्यार्थ । कीर्तन तोचि परमार्थ । शास्त्रांचा मतितार्थ । कीर्तन पसारा ॥३॥ एका शरण जनार्दन । कीर्तनें तरती विश्वजन । हें प्रभूचें वचन । धन्य धन्य मानावें ॥४॥

१४३१. नावडे वैकुंठ शेषशयन । वैष्णव संतजन आवडले ॥१॥ रमा म्हणे कैसी नवल परी । देव भुलले वैष्णवा घरीं ॥२॥ जो

नातुडे ध्यानीं समाधिसाधनीं । तो स्वानंदें कीर्तनीं नाचतसे ॥३॥ जो यज्ञावदानीं कांहीं नेघे माये । तो द्वादशीं क्षीराब्धी उभउभ्या खाये ॥४॥ लक्ष्मी म्हणे देव आतुडे कवणे बुद्धी । वैष्णवांची सेवा करावी त्रिशुद्धी ॥५॥ वैष्णवा घरीं लक्ष्मी कामारी । एकाजनार्दनीं देव दास्यत्व करी ॥६॥

१४३२. योगियांचे चिंतनीं न बैसे । यज्ञयागादिकां जो न गिवसे । तो भाविकांचे कीर्तनासरिसें । नाचतसे आनंदें ॥१॥ तो भाविकांचे कीर्तनीं आपुलें । सुख अनुभवी वहिलें । प्रेमें ब्रह्मानंदीं डोले । वैष्णवांचे सदनीं ॥२॥ यज्ञांचे अवदानीं न धायें । तो क्षीरापती लागीं मुख पसरूनि धांवे । केवढें नवल सांगावें । या वैष्णवसुखाचें ॥३॥ सुख येतें समाधानीं । ह्मणोनी सुख जनार्दनीं । एकाजनार्दनाचे चरणीं । सप्रेमें विनटला ॥४॥

१४३३. योगी शिणती साधनीं । पावन होती ते कीर्तनीं ॥१॥ अष्टांग धूम्रपान । तया श्रेष्ठ हें साधन ॥२॥ समाधि उन्मनी । कीर्तनीं पावन हे दोनी ॥३॥ चौदेहांसी अतीत । कीर्तनें होती ते मुक्त ॥४॥ कर्म धर्म न लगे श्रम । व्यर्थ वाउगा विश्राम ॥५॥ कीर्तन छंद निशिदिनीं । एका शरण जनार्दनीं ॥६॥

१४३४. ऐसी कीर्तनाची आवडी । प्रायश्चित्तें जालीं देशधडी ॥१॥ होतीं तीर्थें तीं बापुडीं । मळ रोकडीं टाकिती ॥२॥ ऐकोनी कीर्तनाचा गजर । ठेला यमलोकींचा व्यापार ॥३॥ यमपाश टाकिती खालीं । देखोनी कीर्तनाची चाली ॥४॥ ऐसा कीर्तन सोहळा । एकाजनार्दनीं देखे डोळां ॥५॥

१४३५. मागणें तें आह्मी मागूं देवा । देईं हेवा कीर्तनीं ॥१॥ दुजा हेत नाहीं मनीं । कीर्तनावांचुनी तुमचीया ॥२॥ प्रेमें हरिदास नाचत । कीर्तन होत गजरीं ॥३॥ एकाजनार्दनीं कीर्तन । पावन होती चराचर जाण ॥४॥

१४३६. धन्य धन्य कीर्तन जगीं । संत तेची सभागी ॥१॥ गाती कीर्तनीं उल्हास । सदा प्रेमें हरिदास ॥२॥ नाहीं आणिक चिंतन । करती आनंदें कीर्तन ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । जालों किर्तनीं पावन ॥४॥

१४३७. नेणों कळायुक्ती व्युत्पत्ती सर्वथा । करूं हरिकथा नाम गाऊं ॥१॥ कलियुगामाजी साधन वरिष्ठ । श्रेष्ठांचें तें श्रेष्ठ नाम जपूं ॥२॥ हाचि अनुभव बहुतांसी आला । ह्मणोनि वर्णिला नाममहिमा ॥३॥ एकाजनार्दनीं नाम यज्ञ कथा । पावन सर्वथा जड मूढा ॥४॥

१४३८. एकचि नाम वाचे । श्रीरामाचें सर्वकाळ ॥१॥ पर्वत उलंघी पापाचे । नाम वाचे वदतांची ॥२॥ आवडी करितां कीर्तन । नासे भवाचें बंधन ॥३॥ श्रेष्ठ साधन कीर्तन । तेणें तोषे जनार्दन ॥४॥ एकाजनार्दनीं कीर्तन । मना होय समाधान ॥५॥

१४३९. वसो का भलते ठाईं जन । परी कीर्तन करी हरीचें ॥१॥ तोची सर्वांमध्यें वरिष्ठ । एकनिष्ठपणें होतां कीर्तनीं ॥२॥ मनीं वसो सदा कीर्तन । अहर्निशीं ध्यान कीर्तनीं ॥३॥ पावन तो तिहीं लोकीं । एका अवलोकी तयातें ॥४॥

१४४०. या हो या चला जाऊं कीर्तना । आनंद तेणें मना नाचती वैष्णव ॥१॥ राम कृष्ण हरी वासुदेवा । गाताती प्रेमभावा आवडी आदरें ॥२॥ सुख तेथें शांति विरक्ति कोण पुसे । सबाह्य अभ्यंतरीं अवघा वासुदेव वसे ॥३॥ एकाजनार्दनीं वासुदेवीं मन । जन वन तेथें अवघा जनार्दन ॥४॥

१४४१. नवल भजनाचा भावो । स्वतां भक्तची होय देवो १ वाचे करती हरिकीर्तन । उन्मनी मन निशिदिनीं ॥२॥ नाहीं प्रपंचाचें भान । वाचे सदा नारायण ॥३॥ एकाजनार्दनीं मुक्त । सबाह्य अभ्यंतरीं पतीत ॥४॥

१४४२. कीर्तन ते पूजा कीर्तन ते भक्ति । कीर्तनें होय मुक्ति सर्व जीवां ॥१॥ पातकी चांडाळ असोत भलते । कीर्तनीं सरते कलियुगीं ॥२॥ कीर्तन श्रवण मनन पठन । कीर्तनें पावन तिन्ही लोक ३ एकाजनार्दनीं कीर्तनीं आवडी । घालीतसे उडी वैकुंठाहुनी ४

१४४३. आजी परमानंदु मानसीं । संत भेटतां सुखराशी । कीर्तनें तारिले सर्वांसी । विठ्ठल नामस्मरणें ॥१॥ धन्य धन्य विठ्ठल मंत्र । सोपा तीन अक्षरी पवित्र । कळिकाळ उघडोनी नेत्र । पाहूं

न शके जयासी ॥२॥ एकाजनार्दनीं शुद्ध भक्ति । कीर्तनें प्राप्त सर्व स्थिति । जयजय रामकृष्ण म्हणती । ते तरती कलीमाजी ॥३॥

१४४४. दिव्य नवा कीर्तनीं कैसा वोढवला रंग । श्रोता आणि वक्ता स्वयें जाला श्रीरंग ॥१॥ आल्हादें वैष्णव करती नामाचा घोष । हरिनाम गर्जतां गगनीं न माये हरुष ॥२॥ पदीं-पदीं कीर्तनीं निवताहे जन मन । आवडी भुकेली तिनें गिळिलें गगन ॥३॥ एकाजनादनीं गातां हरीचें नाम । निमालीं इंद्रियें विषय विसरलीं काम ॥४॥

१४४५. दुजेपणें पाहे तरी देवाचे चरण । आणि तें नर्तन वैष्णवांचें ॥१॥ कीर्तनीं नाचती हरिदास प्रेमें । दुजेपणा नेमें हारुनी जाय २ एकाजनार्दनीं दुजेपणा टाकुनी । वासुदेव चरणीं लीन होईं ३

१४४६. करितां भगवद्भक्ती । चारी मुक्ति पायां लागती ॥१॥ ऐसा लाभ नाहीं कोठें । कीर्तनामाजी देव भेटे ॥२॥ योगयाग तप साधन । कासया तें ब्रह्मज्ञान ॥३॥ न लगे तीर्थांचें भ्रमण । सदा ध्यान नारायण ॥४॥ एकाजनार्दनीं भक्ती । तेणें पावे उत्तम गती ॥५॥

१४४७. सेवितां कथा सार अमृत । तेणें गोड जाले भक्त ॥१॥ मातले मरणातें मारिती । धाकें पळती यमदूत ॥२॥ प्रेमें नाचे कथा मेळीं । सुख कल्लोळीं हरिनाम ॥३॥ गर्जती नाम सदा वाचे । एकाजनार्दन तेथें नाचे ॥४॥

१४४८. तान मान सर्वथा । तें भजन न मने चित्ता ॥१॥ वेडेंवांकुडें तुमचें नाम । गाईन सदोदित प्रेम ॥२॥ वाचा करुनी सोंवळी । उच्चारीन नामावळी ॥३॥ नाम तारक हें जनीं । व्यास बोलिले पुराणीं ४ एकाजनार्दनीं जप । सुलभ आह्मां विठ्ठल देख ५

१४४९. ऐसें सुख कोठें आहे । भजन सांडोनि करिशी काय १ सांडोनि भजनाचा प्रेमा । मुक्ति मागसी अधमा ॥२॥ सांडोनियां संतसंग । काय मुक्ति ते अभंग ॥३॥ एकाजनार्दनीं मुक्ति । भजन केलिया दासी होती ॥४॥

१४५०. वाहूनियां हातीं टाळी । करूं भजन प्रेमळ ॥१॥ विठ्ठल विठ्ठल वाचे वदूं । दुजा नाहीं आह्मां छंदु ॥२॥ जाऊं पंढ-

रीस नेमें । संतासंगें अनुक्रमें ॥३॥ पुंडलिक चंद्रभागा । दरुशनें जाय पाप भंगा ४ एकाजनार्दनीं स्नान । पातकें पळती रानोरान ५

१४५१. भजन भावें गाऊं भजन भावें ध्याऊं । भजन भावें पाहूं विठोबासी ॥१॥ भजन तें सोपें भजन तें सोपें । हरतील पापें जन्मांतरींचीं ॥२॥ घालूं तुळशी माळा गोपीचंदन ललाटीं । देखतां हिंपुटी यम पळे ॥३॥ सांडूनियां आशा जालों वारकरी । एकाजनार्दनीं पंढरी पाहूं डोळां ॥४॥

१४५२. भजन भावातें उपजवी । देव भक्तातें निपजवी ॥१॥ ऐसा भजनेंचि देव केला । भक्त वडिल देव धाकुला ॥२॥ भक्ताकारणें हा संकल्प । भक्त देवाचाही बाप ॥३॥ देव भक्ताचीये पोटीं । जाला म्हणोनी आवड मोठी ॥४॥ एकाजनार्दनीं नवलावो । भक्तचि कैसा जाला देवो ॥५॥

१४५३. जीऊ परमात्मा दोन्ही । ऐसे जाणते तेचि ज्ञानी ॥१॥ ऐसे असोनी संपन्न । सदा करिती माझें भजन ॥२॥ माझ्या भजना हातीं । उसंतु नाहीं दिवसरातीं ॥३॥ जन नोहे जनार्दन । एकाजनार्दनीं लोटांगण ॥४॥

१४५४. भजन पूजन करितां । देव भक्तांचा होय दाता ॥१॥ भजन माहिमा निःसीम । अधमाही पदवी उत्तम ॥२॥ ज्ञानी गुंतले उत्तम । भजनीं उद्धरिले अधम ॥३॥ दीनोद्धरण जनार्दन । एकाजनार्दनीं शरण ॥४॥

१४५५. हरिभजनीं घेतां गोडी । निवारे जन्ममरण कोडी ॥१॥ भावें करितां हरीचें भजन । देवा होय समाधान ॥२॥ हरिभजनाची आवडी । काळ केला देशोधडी ॥३॥ एकाजनार्दनीं भजन । भजनीं पावे समाधान ॥४॥

१४५६. कायावाचा आणि मन । एक करुनी करीं भजन ॥१॥ हाचि मुख्य भजनभावो । सांडीं भेद अभेदाचा ठावो ॥२॥ मना धरूनियां शांती । प्रेमें भजें कमळापती ॥३॥ एकाजनार्दनीं भजन । तेणें पावसी समाधान ॥४॥

१४५७. नवल रोग पडिपाडू । गोड परमार्थ झाला कडू ॥१॥

विषय व्याधीचा उफाडा । हरिकथेचा घ्यावा काढा ॥२॥ ऐसा रोग देखोनि गाढा । एकाजनार्दन धांवे पुढा ॥३॥

१४५८. नित्य हरीकथा वैष्णव सांगात । तोचि परमार्थ शुद्ध त्याचा ॥१॥ नाहीं कधीं द्वैत सदा तें अद्वैत । अभेदरहित सर्वकाळ ॥२॥ परमार्थ साधनीं झिजवितसे अंग । वाउगा उद्योग न करीं कांहीं ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसा ज्याचा हेत । त्याचे मनोरथ पूर्ण होती ॥४॥

१४५९. करी हरीकथा टाकी दंभमान । वांयांचि पतन पडूं नको ॥१॥ नामाचा विश्वास संतांचा सांगात । तेणें तुझें हित सर्व होय ॥२॥ द्रव्य दारा यांचा मानी पा विटाळ । सर्वां ठाईं निर्मळ होसी बापा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसा धरी मार्ग । सोपा संसर्ग पूर्वजांसी ॥४॥

१४६०. धरितां श्रीहरीचें ध्यान । समाधीस समाधान ॥१॥ तो सोपा आह्मांलागीं । उघडा पहा धन्य जगीं ॥२॥ कीर्तनीं नाचतो भक्तांमागें । मन वेधिलें या श्रीरंगें ॥३॥ एकाजनार्दनीं सुखाची भेटी । झालिया होय जन्ममरण तुटी ॥४॥

१४६१. नाभी कमळीं चतुरानन । न कळे तया महिमान । तो साबडें कीर्तन । तेथें नाचे सर्वदा ॥१॥ नातुडे जो सदा ध्यानीं । योगयाग यज्ञहवनीं । अष्टांग योग करितां साधनीं । न लाभेचि सर्वथा ॥२॥ भागले वेद गीती गातां । श्रमलीं शास्त्रें वेवादतां । पुराणें तों सर्वथा । तया न कळे महिमान ॥३॥ तो उभा भीमातीरीं । भक्त करुणाकर श्रीहरी । एकाजनार्दनीं विनंति करी । वास देईं हृदयीं ॥४

## संतमहिमा.

१४६२. ब्रह्म सर्वगत सदा सम । जेथें आनु नाहीं विषम । ऐसें जाणती ते अति दुर्गम । तयांची भेटी जालिया भाग्य परम ॥१॥ ऐसे कैसि यानें भेटती ते साधु । ज्यांचा अतर्क्य तर्केना बोधु । ज्यांसी निजानंदीं आनंदु । ज्यांचा परमानंदीं उद्बोधु ॥२॥ पवना घालवेल पाळण । पायीं चढवेल गगन । भूत भविष्य कळों येईल वर्तमान ।

परी त्या साधूचें न कळे महिमान ॥३॥ चंद्रामृत सुखें सेववेल । रवि अस्ता जातां धरवेल । बाह्यां हेळा सागर तरवेल । परी त्या साधूची भेटी न होईल ॥४॥ जप तप करवेल अनुष्ठान । ध्येय ध्याता धरवेल निजध्यान । ज्ञेय ज्ञाता विवर्जित ज्ञान । ज्ञाना ध्यानाचें मूळ हे साधुजन ॥५॥ निजवृत्तीचा करवेल निरोधु । जीवा शिवाचा भोगवेल आनंदु । एकाजनार्दनीं निजसाधु । त्यांच्या दर्शनें तुटे भवबंधु ॥६॥

१४६३. जन्म कोट्यांनीं हरिसेवा जोडे । नवविधा भजन सांग घडे । तंव वैराग्य तें पाहे पुढें । पूर्व प्राचीन फळ रोकडें ॥१॥ ऐसे तैंच मिळती ते साधु । ज्यांचा संग करी उद्बोधु । ज्यांचा स्पर्श करीं आल्हादु । ज्याचा महिमा न कळे आनंदु ॥२॥ घडे काम कर्म परित्याग । खडे समूळ विषयांचा संग । सर्व कामना जुरे सुसमार्ग । तैं आतुडे मानवा संतसंग ॥३॥ शुद्ध सत्वगुण देहीं पाहे । दंभ अहंकार मानामान जाय । कामक्रोधलोभ सांडी सोय । तैं भूतभाव नाहीं होय ॥४॥ जैं जनार्दनीं शुद्ध भाव । स्वकर्मीसी विश्रांती ठाव । ऐक्य तुजें दोन्ही होती वाव । देहबुद्धीच भासे देव ॥५॥ जैं संत दया होय बापा । तैंचि विश्रांती त्रिविध तापा । तैंच मिळणी होय स्वरूपा । पूर्ण एकाजनार्दनीं कृपा ॥६॥

१४६४. पूर्वपुण्य असतां गांठीं । संत भेटी तैं होय ॥१॥ धन्य धन्य संतसंग । फिटे पांग जन्माचा ॥२॥ चार सहा वंदिती पाय । आणिकां ठाय कोठें नाहीं ३ एकाजनार्दनीं संत । कृपावंत सुखसिंधु ४

१४६५. बहुता जन्मांचें सुकृत । तयासी घडत संतसंग ॥१॥ धन्य वैष्णव भूमंडळीं । दरुशन मेळीं जीव तरती ॥२॥ एकाजनार्दनीं विश्वास । निजदास संतांचा ॥३॥

१४६६. बहु पुण्य होय गांठीं । तरीच भेटी संतांची ॥१॥ पापताप दैन्य गेलें । संत पाउलें देखतां ॥२॥ मोक्ष मुक्ति साधे फुका । ऐशी देखा संत कृपा ॥३॥ नाहीं आणिकामें भेस । संत सदैव भेटतां ॥४॥ एकाजनार्दनीं संत । पुरविती हेत सर्वही ॥५॥

१४६७. संत भेटीचा आनंदु । सुखसागर परमानंदु । गातां जुरेचि भेदु । नामस्मरणें ॥१॥ कैवल्याचे अधिकारी । मोक्ष राबे त्यांचे

घरीं । रिद्धीसिद्धी कामारी । कोण त्यां पुसे ॥२॥ भुक्ती आणि मुक्ती । सदा तिष्ठे अहोरात्रीं । कैवल्यपदें येती । सामोरीं तयासी ॥३॥ नाम गाती जे आनंदें । हृदयीं नाहीं दुजा भेद । एकाजनार्दनीं छंद । तयांचा मज ॥४॥

१४६८. अभक्तां देव कंटाळती । परी सरते करती संत त्या ॥१॥ ह्मणोनी महिमा त्यांचा जगीं । वागविती अंगीं सामर्थ्य ॥२॥ मंत्र तंत्रा नोहे बळ । भक्ति प्रेमळ पाहिजे ॥३॥ आगमा निगमाचा पसारा । उगाचि भारा चिंध्याचा ॥४॥ वेद शास्त्रांची घोकणी । ती तों काहणी जुनाट ॥५॥ पुरातन वाटा असती बहु । त्या त्या न घेऊं यामाजी ॥६॥ एकाजनार्दनीं सोपा मार्ग । संतसंग चोखडा ॥७॥

१४६९. हृदयीं नांदे संदेह मूळ । तेथें फळ विरुद्ध केवीं ॥१॥ जैसें बीज तैसा अंकुर । दिसे निर्धार जाणावा ॥२॥ योगयाग शास्त्रपाठें । वाउगीं खटपटें तर्कांचीं ॥३॥ करितां कर्म धर्म नेहटीं । नोहे भेटी संतांची ॥४॥ एकाजनार्दनीं त्यांचा दास । सहज आस पुरतसे ॥५॥

१४७०. संतांचें चरणतीर्थ घेतां अनुदिनीं । पातकांची धुणी सहज होय ॥१॥ संतांचें उच्छिष्ट प्रसाद लाधतां । ब्रह्मज्ञान हातां सहज होय ॥२॥ संतांच्या दरुशनें साधती साधनें । तुटती बंधनें सहज तेथें ॥३॥ एकाजनार्दनीं संत कृपादृष्टी । पाहतां सुलभ सृष्टी सहज होय ॥४॥

१४७१. न होतां शुद्ध अंतःकरण । संत सेवा न घडे जाण ॥१॥ शुद्ध संकल्पावांचून । संत सेवा न घडेचि जाण ॥२॥ कामक्रोध दुराचार । यांचा करूं नये अंगिकार ॥३॥ आशा मनीशांचें जाळें । छेदुनी टाकीं विवेक बळें ४ एकाजनार्दनीं ध्यान । सहज तेणें संतपण ५

१४७२. उदार संत एक जगीं । वागविती अंगीं सामर्थ्य ॥१॥ काय महिमा वर्णूं दीन । पातकी पावन करती जगीं ॥२॥ अधम आणि पापराशी । दरुशनें त्यांसी उद्धार ॥३॥ लागतां त्यांच्या चरण कमळीं । पाप तापां होय होळी ॥४॥ एकाजनार्दनीं भेटतां । हरे संसाराची चिंता ॥५॥

१४७३. देवाचे सोइरे संत ते जाणावे । यावरतें जीवें नाठवी कोणा ॥१॥ पडतां संकट आठवितसे संतां । त्याहुनी वारिता नाहीं दुजा ॥२॥ ह्मणोनि घरटी फिरे तया गांवीं । सुदर्शनादि मिरवी आयुधें हातीं ॥३॥ ह्मणिके किंगर वैष्णव ते साचे । एकाजनार्दनीं त्यांचे वंदी पाय ॥४॥

१४७४. संतवचनें देव जोडे । सायुज्य मुक्ति पायां पडे । संतवचनें सांकडें । तुटेचि कांहीं ॥१॥ धन्य धन्य संतसंग । उभा तेथें श्रीरंग । लक्ष्मीसहित अभंग । तिष्ठे सदा ॥२॥ संतवचनें कर्म झडे । संतवचनें मोक्ष जोडे । संतवचनीं तीर्थ घडे । धन्य संग संतांचा ॥३॥ संतवचनें तुटे उपाधि । संतवचनें सरे आधिव्याधी । संतवचनें भवनदी । प्राणी तरती ॥४॥ संतवचनीं धरा भाव । तेणें सर्व निरसे भेव । एकाजनार्दनीं देव । प्रत्यक्ष भेटे ॥५॥

१४७५. संत मायबाप म्हणतां । लाज वाटे बहु चित्ता ॥१॥ मायबाप जन्म देती । संत चुकविती जन्मपंक्ती ॥२॥ मायबापांपरीस थोर । वेदशास्त्रीं हा निर्धार ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । संत शोभती मुकुटमणी ॥४॥

१४७६. संतवचनें साधे मुक्ति । संतवचनें ब्रह्मस्थिति । कर्माकर्मांची शांति । संतवचनें ॥१॥ संतवचनें याग । संतवचनें सांग योग । संतवचनें अनुराग । घडतां संग संतांचा ॥२॥ संतवचनें ब्रह्मप्राप्ति । संतवचनें सायुज्य मुक्ति । ब्रह्मादि पदें येती । संतवचनें समोर ॥३॥ संतवचनें सर्व सिद्धि । संतवचनें समाधि । संतवचनें उपाधि । एकाजनार्दनीं तुटतसे ॥४॥

१४७७. जयाचें चित्त संतांच्या चरणा । तेणें नारायणा जिंकियेलें ॥१॥ भावें देव मिळे भावें देव मिळे । संतचरणीं लोळे सर्वकाळ ॥२॥ संतांची आवडी म्हणोनी अवतार धरी । योग क्षेम भारी चालवी त्याचा ॥३॥ संतचरणीं सेवा आदर उपचार । एकाजनार्दनीं साचार करीतसे ॥४॥

१४७८. उद्धवा स्वमुखें सांगे श्रीकृष्ण । संतसेवा जाण सर्व श्रेष्ठ ॥१॥ ह्याची योग जाण उद्धवा स्वीकारीं । आणिक न करीं भरोवरी साधन

तें ॥२॥ तयाची संगती उद्धवा धरावी । सेवा ते करावी काया-वाचा ॥३॥ मज तयाचा वेध उद्धवा प्रसिद्ध । तूं सर्वभावें सद्‍गद नाम घेई ॥४॥ जयाची आवडी मजसी उद्धवा । जाई तया ठाया प्रेमभरित ॥५॥ उच्च नीच कांहीं न म्हणें उद्धवा । एकाजनार्दनीं तया शरण जावें ॥६॥

१४७९. उद्धव बोले कृष्णाप्रती । ऐकोनि संतांची कीर्ति । धन्य वैष्णव होती । कलीमाजी ॥१॥ तुह्मा जयाचा निजछंद । मानीतसा परमानंद । अखंड तयांचा वेध । तुमचें मनीं ॥२॥ ऐसि यांची संगती । मज घडो अहोरातीं । नये पुनरावृत्ती । पुनः जन्मासी ॥३॥ हर्षें देव सांगे आपण । उद्धवा तयाचें मज ध्यान । एकाजनार्दना शरण । ते मज आवडती ॥४॥

१४८०. मज तयांची आवड । पुरवणें लागे त्याचें कोड । गर्भवास सांकड । तयालागीं उद्धवा ॥१॥ घेऊनि अवतार । करीं दुष्टांचा संहार । माझा हा बडिवार । तयांचेनि उद्धवा ॥२॥ माझें जप तप अनुष्ठान । देव पूजा मंत्र पठन । नाना नेमादि साधन । संत माझे उद्धवा ॥३॥ मज आणिलें नामरूपा । त्यांची मजवर कृपा । दाविला हो सोपा । मार्ग मज उद्धवा ॥४॥ माझा योगयाग सर्व । संत माझें वैभव । वैकुंठादि राणीव । तयाचेनि मज उद्धवा ॥५॥ ऐसे वरिष्ठ पावन । पुनीत केलें मज लागून । एकाजनार्दनीं शरण । तयासीच उद्धवा ॥६॥

१४८१. ऐकरे उद्धवा तुज सांगतों गुज । संत चरणरज वंदीं तूं सहज । तेणें कार्य कारण होईल तुज । अंतर दृष्टी करुनी परीस निज ॥१॥ घालीं लोटांगण वंदीं चरण । कायावाचा मनें धरुनी जीवीं ॥ध्रु०॥ आलीया संतजन आलिंगन देईं । पूजा ती बरवी समर्पावी । ज्ञान ध्यान त्याचें करावें जीवीं । हेतु सर्व भावीं मनीं धरीं उद्धवा ॥२॥ कायिक वाचिक मानसिक भाव । अर्पी तेथें जीव देहभाव । एकाजनार्दनीं तयाचें वैभव । सांगितलें तुज उद्धवा ॥३॥

१४८२. उद्धवा तूं धरीं संतसमागम । तेणें तुटे भवश्रम रे उद्धवा ॥१॥ सांगतसें गुज मनीं धरीं रे उद्धवा । आणिक श्रम वांयां न करीं रे

उद्धवा ॥२॥ योगयाग पतंजत कसवटी। न करीं आन गोष्टी रे उद्धवा ॥३॥ कीर्तन भजन सर्वभावें करीं। जाई संतद्वारीं शरणागत रे उद्धवा ४ मनींचें निजगुज सांगितलें तुज। एकाजनार्दनीं निज साधे रे उद्धवा ५

१४८३. मीही संतचरण वंदितसें माथां। वेदादि सामर्थ्यता थोडी तेथें ॥१॥ पुराणासी वाड पडेल सांकडें। शास्त्रांचें तें कोडें उगवेल ॥२॥ अहंब्रह्म ऐसा श्रुति वेदवादती। नेति त्या म्हणती तटस्थ ठेल्या ॥३॥ उपासना मार्ग परंपरा जाला। तो बोध तुला सांगितला ॥४॥ एकाजनार्दनीं संतांचा सांगात। न चुकों देऊं हित आपुलें तूं ॥५॥

१४८४. संतां द्यावें आलिंगन। सांडूनियां थोरपण ॥१॥ अंगें देव करी सेवा। इतरांचा कोण केवा ॥२॥ ब्रह्मज्ञानी वंदिती माथा। मुक्तांची सहज मुक्तता ३ शरण एकाजनार्दनीं। यमकाळ वंदिती दोन्ही ४

१४८५. जाणिव नेणिवांच्या वाटा। खटपटा पडूं नका ॥१॥ संतां शरण जारे आधीं। तुटे उपाधी तत्काळ ॥२॥ तेणें तुटे भव-बंधन। आत्मज्ञान प्रगटे ३ एकाजनार्दनीं शरण। संत परिपूर्ण उदार ४

१४८६. विचारावें विवेक दृष्टीं। संतचरणीं घावी मिठी ॥१॥ तेणें चुके जन्मजरा। चुकवी चौऱ्यांशींचा फेरा ॥२॥ संतचरण अनुदिन। दृढ राखावें तेथें मन ॥३॥ एकाजनार्दनीं शरण। सहज निवारे जन्ममरण ॥४॥

१४८७. देवाचे ते आप्त जाणावे ते संत। त्यांचे चरणीं रत व्हावें सर्वदा ॥१॥ श्रीहरीची भेटी सहजची होय। भ्रमलीया जाय क्षणमात्रें २ पापाचे पर्वत भस्म नामामृतें। अभक्ता न कळे हित नाम न घेती ३ एकाजनार्दनीं संतांचिया कृपे। नाम होय सोपें कृपें त्यांच्या ४

१४८८. ज्ञान ध्यान जप तप तें साधन। ते हे संत निधान सखे माझे ॥१॥ संतांपायीं आधीं जावें वो शरण। संसार बोळवण होय तेणें ॥२॥ तयाचें हें मूळ संतांचे पाय। आणीक उपाय नाहीं नाहीं ॥३॥ द्वैत अद्वैताचा नसरेचि कोंभ। तो ज्ञानि स्वयंभ संत-संग ॥४॥ एकाजनार्दनीं परब्रह्म नाम। द्वैत क्रियाकर्म तेथें नाहीं ५

१४८९. संतांवांचोनियां नाम नये हातां। साधनें साधितां

कोटी जाणा ॥१॥ जैसें कांतेविण करणें संसार । साधन विचार व्यर्थ ठेला ॥२॥ संत समागम धरलिया वांचुनी । संसार सांडणी नोहे बापा ॥३॥ एकाजनार्दनीं संतांसी शरण । रिघालिया जाण देव जोडे ॥४॥

१४९०. बहु मार्ग बहु प्रकार । तेथें निर्धार न बैसे ॥१॥ उलट सुलट कासया करणें । जप तप अव्हाणें दैवतें ॥२॥ योगयाग तप तीर्थ । साधन कष्ट ते पसारा ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । घडे निशीदिनीं संतसेवा ॥४॥

१४९१. संतचरणीं सेवा घडे । भाग्य पाहा हो केव्हढें ॥१॥ व्यर्थ शिणती बापुडे । योगयाग करुनी गाढे ॥२॥ संतचरणीं जे विन्मुख । स्वप्नीं न देखती सुख ॥३॥ संतचरणीं नाहीं थारा । भरले तपांच्या डोंगरा ॥४॥ नाम न म्हणती कोडें । धूम्रपान करती तोंडें ॥५॥ एकाजनार्दनीं राचें । मन नाहीं सुख कैंचें ॥६॥

१४९२. पुंडलिक संत भला । तेणें उद्धार जगाचा केला ॥१॥ तयाचे वंदावे चरण । कायावाचामनें करून ॥२॥ उपाधिसंग तुटती व्याधि । एकाजनार्दनीं समाधि ॥३॥

१४९३. संत पोटीं देव वसे । देवा पोटीं संत असे ॥१॥ ऐसा परस्परें मेळा । देव संतांचा अंकिला ॥२॥ संतांठाईं देव तिष्ठे । देव तेथें संत वसे ॥३॥ एकाजनार्दनीं संत । देव तयाचा अंकित ४

१४९४. संतांसी आवडे तो देवाचाही देव । कळिकाळाचें भेव पायातळीं ॥१॥ आणिकाची चाड नसेचि वासना । संतांचिया चरणा वांचूनियां ॥२॥ ऐसें ज्याचें प्रेम ऐशी ज्याची भक्ति । एकाजनार्दनीं मुक्ति तेथें राबे ॥३॥

१४९५. संत आधीं देव मग । हाचि उमग आणा मना ॥१॥ देव निर्गुण संत सगुण । म्हणोनी महिमान देवासी ॥२॥ नाम रूप अचिंत्य जाण । संतीं सगुण वार्णिलें ॥३॥ मुळीं अलक्ष लक्षा नये । संतीं सोय दाविली ॥४॥ एकाजनार्दनीं संत थोर । देव निर्धार धाकुला ॥५॥

१४९६. संत ते देव देव ते संत । ऐसा हेत दोघांचा ॥१॥

देव ते संत संत ते देव । ह्याचि भाव दोघांचा ॥२॥ संतांविण देवा कोण । संत ते जाण देवासी ॥३॥ फळपुष्प एका पाठीं । एकाजनार्दनीं राहाटी ॥४॥

१४९७. संतांचा महिमा देवचि जाणे । देवाची गोडी संतांसी पुसणें ॥१॥ ऐसी आवडी एकमेकां । परस्परें नोहे सुटिका ॥२॥ बहुत रंग उदक एक । थापरी देव संत दोन्ही देख ॥३॥ संतांविण देवा न कंठे घडी । उभयतां गोडी एक असे ॥४॥ मागें पुढें नाहीं कोण्ही । शरण एकाजनार्दनीं ॥५॥

१४९८. वैकुंठींचें वैभव । संतांपायीं वसे सर्व ॥१॥ संत उदार उदार । देती मोक्षाचें भांडार ॥२॥ अनन्य भावें धरा चाड । मग सुरवाड सुख पुढें ॥३॥ एकाजनार्दनीं ठाव । नोहे भाव पालट ॥४॥

१४९९. स्वर्ग जयाची पायरी । मोक्ष ज्यांचा आज्ञाधारी ॥१॥ ऐसा संतांचा महिमा । पायवणी शे शिवब्रह्मा ॥२॥ भाग्यवानाची ती मात । कोण त्यांचा तेथें पुरात ॥३॥ भुक्ति मुक्ति लोटांगणीं । शरण एकाजनार्दनीं ॥४॥

१५००. ज्या सुखाकारणें देव वेडावला । वैकुंठ सांडुनी संत सदनीं राहिला ॥१॥ धन्य धन्य संतांचें सदन । जेथें लक्ष्मीसहित शोभे नारायण ॥२॥ सर्व सुखांची सुखराशी । संतचरणीं भुक्ति मुक्ति दासी ॥३॥ एकाजनार्दनीं पार नाहीं सुखा । म्हणोनी देव भुलले देखा ॥४॥

१५०१. मोक्ष मुक्तीचें ठेवणें । देती पेणें संत ते ॥१॥ नाहीं सायासाचें कोड । न लगे अवघड साधन ॥२॥ नका वनवनांतरीं जाणें । संत दरुशनें लाभ होतो ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । संत-सन्मान देवाच्या ॥४॥

१५०२. अमृता उणें आणिती संतजन । मारा अमृत म्हणून पाजिताती ॥१॥ नाशिवंत यासी अमृत उपकार । अनाशिवंता नामामृतसार ॥२॥ नाशिवंत देह नाशिवंत जीव । नाशिवंत ठाव जगडंबर ॥३॥ एकाजनार्दनीं संतांचिये दृष्टी । नाशिवंत सृष्टि सजीव होती ॥४॥

१५०३. घालितां संतांपायीं मिठी । पूर्वज वैकुंठीं उद्धरती ॥१॥

ऐसा संतांचा महिमा । वानूं न शके शिवब्रह्मा ॥२॥ इच्छिलें तें फळ । जन पावती सकळ ॥३॥ एकाजनार्दनीं विश्वास । संत दासांचा मी दास ॥४॥

१५०४. पहातां संत समुदाय । भुक्ति मुक्ति तेथें देव ॥१॥ जातां लोटांगणीं भावें । ब्रह्मज्ञान अंगें पावे ॥२॥ तयाचे उच्छिष्टाचा कण । शरण एका जनार्दन ॥३॥

१५०५. संतचरणींचा महिमा । कांहीं न कळे आगमां निगमां ॥१॥ ब्रह्मा घाली लोटांगण । विष्णु वंदितो आपण ॥२॥ शिव ध्यातो पायवणी । धन्य धन्य संतजनीं ॥३॥ तया संतांचा सांगात । एकाजनार्दन निवांत ॥४॥

१५०६. संत सांगात घडे । ब्रह्म सायुज्यता जोडे ॥१॥ मुक्ति लागती चरणीं । ब्रह्मज्ञान लोटांगणीं ॥२॥ एकाजनार्दनीं सांगात । घडतां होय देहातीत ॥३॥

१५०७. संतचरणीं आलिंगन । ब्रह्मज्ञानी होती पावन ॥१॥ इतर सहज उद्धरती । वाचे गातां ज्यांची कीर्ति ॥२॥ लाभें लाभ संतचरणीं । मोक्ष सुख वंदी पायवणी ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । उदार संत त्रिभुवनीं ॥४॥

१५०८. न्याय मीमांसा सांख्य पातंजली । व्याकरण वेदांत बोली सर्व एक ॥१॥ ते माझे सोइरे जीवलग जीवाचे । जे अधिकारी साचे संतजन ॥२॥ एकाजनार्दनीं मन तया ठायीं । होऊनियां पायीं उतराई ॥३॥

१५०९. ऐसें जाणोनि वेदमत । संत सेवा सदोदित ॥१॥ पुराणें शास्त्रें अनुवादती । संतसेवन दिनरातीं ॥२॥ संतचरणीं ज्यांचें मन । तयां सुखा काय उणें ॥३॥ एकाजनार्दनीं भावें । संतचरणीं लीन व्हावें ॥४॥

१५१०. संतमहिमा न वदतां वाचा । नोहे साचा उपरम ॥१॥ वेदशास्त्रें देती ग्वाही । संतमहिमा न कळे कांहीं ॥२॥ पुराणासी वाड । श्रुती ह्मणती न कळे कोड ॥३॥ योगयाग बोवाळणी । शरण एकाजनार्दनीं ॥४॥

१५११. सुख अनुपम्य संतसमागमें । अखंड दुणावतें नामें । दहन होती सकळ कर्में । आणीक वर्म दुजें नाहीं ॥१॥ वाचे म्हणे कृष्णहरी । तेणें पापा होय बोहरी । संसारासी तुरे उरी । हा महिमा सत्संगाचा ॥२॥ काशी प्रयागादी तीर्थें बरीं । बहुत असतीं महीवरी । परी संतसमागमाची थोरी । तीर्थें न पवती सर्वदा ॥३॥ असतीं दैवतें अनंत कोटी । परी संतसमागम भेटी । दैवतीं सामर्थ्य हिंपुटी । हा महिमा संतांचा ॥४॥ एकाजनार्दनीं मन । संतचरणीं दृढ ध्यान । तेणें प्राप्त सच्चिदानंदघन । विठ्ठल देव न विसंबे ५

१५१२. जें सुख संतसज्जनाचे पायीं । तें सुख नाहीं आणिके ठाईं ॥१॥ तुकितां या सुखाचेनी तुकें । मैं वैकुंठ जालें फिकें ॥२॥ पाहों जातां लोकीं तिहीं । ऐसें न देखों आणिके ठाईं ॥३॥ नवल या सुखाची गोडी । हरिहर ब्रह्मा घालिती उडी ॥४॥ क्षीरसागर सांडोनी पाहीं । अंगें धांवे शेषशाई ॥५॥ एकाजनार्दनीं जाली भेटी । सुख संतोषा पडली मिठी ॥६॥

१५१३. संत दरुशनें लाभ होय । ऐसा आहे अनुभव ॥१॥ पुराणीं महिमा सांगे व्यास । संतदया सर्वांसी सारखी ॥२॥ यातिकुळ हो कां भलतें । करिती सरतें सर्वांसी ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । संतमहिमान वेगळें ॥४॥

१५१४. संत उपाधिरहित । नाहीं तयां दुसरा हेत ॥१॥ सदा मुखीं नाम वाचे । तेणें जन्माचें सार्थक ॥२॥ संग न वडे तयां कांहीं । सदा कीर्तन प्रवाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं चित्त । ध्यानीं मनीं संत आठवित ॥४॥

१५१५. कामक्रोधलोभ नाहीं संतां अंगीं । वर्तताती जगीं जगरूप ॥१॥ नातळोनी संसारा दाविती पसारा । भाव एक खरा विठ्ठलपायीं ॥२॥ आणिकांची स्तुति नायकती कानीं । न बोलती वचनीं वांयां बोला ॥३॥ एकाजनार्दनीं तेचि संत तारू । भवाचा सागरू उतारिती ॥४॥

१५१६. पालटे भावना संतांचे संगती । अभाविकांही भक्ति प्रगटतसे ॥१॥ ऐसा ज्याचा उपकार । मानिती निर्धार वेदशास्त्रें २ तारिती आणिकां देऊनि विठ्ठल मंत्र । एकाजनार्दनीं पवित्र नाम गाती ३

१५१७. संत ते सोयरे जीवलग सांगाती । भेटतां पुरती सर्व-काम ॥१॥ कामधेनु कल्पतरु चिंतामणी । उदार चूडामणी याहुनी संत ॥२॥ देऊं परिसाची यांसी उपमा । परी ते नये समा संतांचिये ३ एकाजनार्दनीं संतांचा सांगात । पुरती सर्व आर्त जीवींचे जें ॥४॥

१५१८. यातिहीन असो भला । जो या गेला शरण संतां १ त्याचें जन्ममरण चुकलें । पावन जाहलें तिहीं लोकीं ॥२॥ उत्तम अधम न म्हणती । रामचि देती सर्वांसी ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । केलें पावन दीना लागुनी ॥४॥

१५१९. जे या गेले संतां शरण । जन्ममरण चुकलें त्या ॥१॥ मागां बहुतां अनुभव आला । पुढेंही देखिला प्रत्यय ॥२॥ महा पापी मूढ जन । जाहले पावन दरुशनें ॥३॥ एकाजनार्दनीं संत । कृपावंत दयाळु ॥४॥

१५२०. मागें संतीं उपकार । केला फार न वर्णवे ॥१॥ पाप ताप दैन्य गेलें । सिद्धचि जाहले सर्व मार्ग ॥२॥ दुणा थाव आला पोटीं । संत भेटी होतांचि ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । पावन जनीं संत ते ॥४॥

१५२१. सुख अपार संतसंगीं । दुजें अंगीं न दिसे कोठें ॥१॥ बहु सुख बहूता परीं । येथेंची सरी नरोनि ॥२॥ स्त्रिया पुत्रधन सुख । नाशिवंत देख शेवटीं ॥३॥ एकाजनार्दनीं संत सुखा । नोहे लेखा ब्रह्मांडीं ॥४॥

१५२२. संतसुखा नाहीं पार । तेणें आनंद पैं थोर ॥१॥ ऐशी सुखाची वसती । सनकादीक जया गाती ॥२॥ सुखें सुख अनुभव । सुखें नाचतसे देव ॥३॥ तया सुखाची वसती । एका-जनार्दनीं ध्यातसे चित्तीं ॥४॥

१५२३. भाग्यवंत संत होती । दीन पतीत तारिती ॥१॥ नाहीं तया भाग्या पार । काय पामर मी वाहूं ॥२॥ चुकविती जन्मजरा । संसारा या पासोनी ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । पतित पावन संत ते ॥४॥

१५२४. बाळकाची बोबडी वाणी । ऐकोनि जननी संतोषे ॥१॥

तैसे तुम्हीं कृपाबळें । पाळिले लळे संतजनीं ॥१॥ माळाचे जे जे अपराध । माता न करी तयासी क्रोध ॥२॥ शरण एकाजनार्दनीं । मिळविलें गुणीं आपुलिया ॥४॥

१५२५. संतांचे संगतीं । पाप जुरे तें कल्पांतीं ॥१॥ ऐसा संतांचा महिमा । नाहीं वावया उपमा ॥२॥ तीर्थ व्रत जप दान । अवघें टाका वोवाळून ॥३॥ संत चरणींचे रजःकण । वंदी एकाजनार्दन ४

१५२६. संतचरणींचे रजःकण । तेणें तिन्ही देव पावन ॥१॥ ऐसा महिमा ज्याची थोरी । वेद गर्जे परोपरी ॥२॥ शास्त्रें पुराणें सांगत । दरुशनें प्राणी होती मुक्त ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । ठाव यावा संतचरणीं ॥४॥

१५२७. संतांचे चरण ध्यातां । हारपली जन्म व्यथा ॥१॥ पुळती मरणाचें येणें । चुकती जन्मजरा तेणें ॥२॥ संत समुदाय दृष्टी । पडतां लाभ होय कोटी ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । काया कुर्वंडी संतचरणीं ॥४॥

१५२८. संतांच्या दरुशनें । तुटे जन्ममरण येणें ॥१॥ ऐसा संतांचा महिमा । बोलतां नाहीं वो उपमा ॥२॥ तीर्थ पर्वकाळ यज्ञ दान । संतचरणीं होती पावन ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । संत पावन इये जनीं ॥४॥

१५२९. संत कृपाळु उदार । ब्रह्मादिकां न कळे पार ॥१॥ काय वानूं मी पामर । थकले सहा अठरा चार ॥२॥ नेति नेति शब्दें । श्रुती विरालिया आनंदें ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । धरा माझी आठवण ॥४॥

१५३०. संतांचा उपकार । सांगावया नाहीं थार ॥१॥ आपणा सारिखें करिती । यातिकुळ नाहीं चिती ॥२॥ दया अंतरांत वसे । दुजेपणा तेथें नसे ॥३॥ उदारपणें उदार । एकाजनार्दनीं निर्धार ॥४॥

१५३१. अपार महिमा संतांचा । काय बोलूं मी वाचा ॥१॥ मागें तरलें पुढें तरती । जडजीवा उद्धरती ॥२॥ नाम मात्रा रसायन । देउनी तारिली संतजन ॥३॥ ऐशा संतां शरण जाऊं । एकाजनार्दनीं ध्याऊं ॥४॥

१५३२. संत दयाळ दयाळ । अंतरीं होताती प्रेमळ ॥१॥ शरण आलियासी पाठीं । पाहताती कृपादृष्टी ॥२॥ देऊनियां रसायना । तारिताती भवार्णव जाणा ॥३॥ संतांसी शरण जावें । एकाजनार्दनीं त्यांसी गावें ॥४॥

१५३३. सर्वांगीं सुवास परि तो उगला न राहे । सभोंवतें तरुवर चंदन करीताचि जाये ॥१॥ धणी धाय परी त्याची भुक्ति न धाये । सागर भरिता परि त्या सरिता समाये ॥२॥ वैरागर मणी पूर्ण तेजाचा होय । सभोवतें हारळ हिरे करीताचि जाय ॥३॥ एकाजनार्दनीं पूर्ण जालासे निज । आपणासारिखें परी तें करितसे दुजें ४

१५३४. संत श्रेष्ठ संत श्रेष्ठ । पातकी नष्ट तारिती ॥१॥ ऐसा आहे अनुभव । पुराणीं पहाहो निर्वाहो ॥२॥ वेदशास्त्र देती ग्वाही । संत श्रेष्ठ सर्वांठायीं ३ एकाजनार्दनीं संत । ब्रह्मादिकां न कळे अंत ४

१५३५. धन्य धन्य जगीं संत । कृपावंत दीनबंधु ॥१॥ कृपादृष्टीं अवलोकितां । परिपूर्णता समदृष्टी॥२॥ अगाध देणें ऐसें आहे । कल्पांतीं हें न सरेचि ३ एकाजनार्दनीं चित्त । जडो हेत त्या ठायीं ४

१५३६. धन्य धन्य तेचि संत । नाहीं मात दुसरी ॥१॥ वाचे सदा नारायण । तें वदन मंगळ ॥२॥ सांडोनी घरदार । जाती पंढरपुरा आवडी ॥३॥ एकाजनार्दनीं नेम । पुरुषोत्तम न विसंबे त्यां ४

१५३७. संत केवळ घातकी पाहीं । परी तयासी पातक नाहीं ॥१॥ निजबोधाचे करुनी फांसे । दोघे गोंसावी मारिले कैसे ॥२॥ अती खाणोरिया कर्म करी । दिवसा जाळिले गांव चारी ॥३॥ एकाजनार्दनीं घातकी मोठे । त्यांसी अंतक केवीं भेटे ॥४॥

१५३८. दरुशनें तरती प्राणी । ऐशी आयणी जयाची ॥१॥ ठेवितांचि मस्तकीं हात । देवचि करित तयासी ॥२॥ देउनी नाममात्रा रस । भवरोगास छेदिती ॥३॥ एकाजनार्दनीं ते संत । कृपावंत दीनालागीं ॥४॥

१५३९. भाग्यवंत होती संत । दीन पतित तारिती ॥१॥ उपदेश विठ्ठल मंत्र । देती सर्वत्र सारिखा ॥२॥ स्त्रिया शूद्र अथवा बाळें । कृपा कळोळें एकाचि ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । पतितपावन संत होती ॥४॥

१५४०. भाग्य उजळलें आतां । संत सभाग्यता भेटले ॥१॥ पाप ताप दैन्य गेलें। संत पाउलें देखतां ॥२॥ तुटली बंधनाची गांठी। पाय पोटीं आठवितां ॥३॥ एकाजनार्दनीं शरण। संतचरण दुर्लभ ४

१५४१. ज्यांचें देणें न सरे कधीं । नाहीं उपाधी जन्मांची ॥१॥ कायावाचा आणि मनें। धरितां चरण लाभ बहु ॥२॥ चौऱ्यांशींचें नाहीं कोंडें । निवारे सांकडें पैं जाण ॥३॥ एकाजनार्दनीं शरण। संतपूजनें लाभ बहु ॥४॥

१५४२. जन्मजरा तुटे कर्म । संत समागम घडतांचि ॥१॥ उपदेश धरितां पोटीं । दैन्यें दाही वाटीं पळताती ॥२॥ खंडे फेरा चौऱ्याऐशीं । धरितां जीवेंशी पाउलें ॥३॥ शरण एका-जनार्दनीं । ते दिनमणी प्रत्यक्ष ॥४॥

१५४३. तुटतीं बंधनें संतांच्या दरुशनें । केले ते पावन जगीं बहु ॥१॥ महा पापराशी तारिले अपार। न कळे त्यांचा पार. वेद-शास्त्रां ॥२॥ वाल्मिकादी दोषी तारिले अनुग्रहीं। पाप तेथें नाहीं संत जेथें ३ पापताप दैन्य गेलें देशांतरीं। एकाजनार्दनीं निर्धारीं सत्य सत्य ४

१५४४. संतांचा दास तो देवाचा भक्त। तरती पतित दरुशनें त्याच्या ॥१॥ त्याचिया योगें घडती सर्व तीर्थें। तीर्थ तें पवित्र होतीं तीर्थें ॥२॥ तयाचिया पदें धरा धन्य ह्मणे। ऐसे जे भेद-रहित मनें तेचि संत ॥३॥ एकाजनार्दनीं तयांच्या प्रसादें । कर्म-अकर्मी दोंदें निघताती ॥४॥

१५४५. उदारपणें संत भले। पापी उद्धरिले तात्काळ ॥१॥ एका भावें येतां शरण। देणें घेणें वैकुंठ ॥२॥ ऐसे उदार त्रिभुवनीं । संतां वांचुनी कोण दुजे ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । संत पतितपावन ४

१५४६. पतितपावन केलें असे संतीं। पुराणीं ती ख्याती वर्णि-येली ॥१॥ सदोषी अदोषी तारिले अपार। ह्याचि बाडिवार धन्य जगीं ॥२॥ नानावर्ण याती उत्तम चांडाळ । उद्धरिले सकळ नाम-मात्रें ॥३॥ एकाजनार्दनीं दयेचे सागर । संतकृपा धीर समुद्र ते ४

१५४७. संतसंगें तरला वाल्हा । पशु तरला गजेंद्र ॥१॥ ऐसा संत समागम । धरतां उत्तम सुख लाभ ॥२॥ तुटती जन्मजरा

व्याधी। आणीक उपाधी नातळती ॥३॥ संसाराचा तुटे कंद। निरसे भेद अंतरींचा ॥४॥ परमार्थाचें फळ ये हातां। हा जोडतां संतसंग ॥५॥ घडती तीर्थादिक सर्व। सकळपर्व साधती ॥६॥ एकाजनार्दनीं संत। धन्य समर्थ तिहीं लोकीं ॥७॥

१५४८. तरले संगती अपार। वाल्मिकादि हा निर्धार। पापी दुराचार। अजामेळ तरला ॥१॥ ऐसा संतांचा महिमा। नाहीं आणीक उपमा। अनुसरलीया प्रेमा। तरताती निःसंदेह ॥२॥ वेदशास्त्रें देती ग्वाही। पुराणें ही सांगती ठायीं। सत्संगावांचुनी नाहीं। प्राणियांसी उद्धार ॥३॥ श्रुति हेंचि पैं बोलती। धरावी संतांची संगती। एकाजनार्दनीं प्रचीती। संतसंगाची सर्वदा ॥४॥

१५४९. अभागी असोत चांडाळ। संत दरुशनें तात्काळ उद्धरती ॥१॥ हा तों आहे अनुभव। स्वयमेव संत होती ॥२॥ पाप तापा महामारी। कामक्रोधची नुरे उरी ॥३॥ एकाजनार्दनीं लीन। संत पावन तिहीं लोकीं ॥४॥

१५५०. संतांअंकीं देव वसे। देवांअंकीं संत बैसे ॥१॥ ऐशा-परस्परें मिळणी। समुद्र तरंग तैसे दोन्ही ॥२॥ हेम अलंकारवत। तैसे देव भक्त भासत ॥३॥ पुष्पीं तो परिमळ असे। एकाजनार्दनीं देव दिसे ॥४॥

१५५१. सुख दुःखांचिया कोडी। संत दरुशनें तोडी बेडी ॥१॥ थोर मायेचा खटाटोप। संत दरुशनें नुरे ताप ॥२॥ चार देहांची पैं वार्ता। संत दरुशनें तुटे तत्त्वतां ॥३॥ एकाजनार्दनीं संत। सबाह्य अभ्यंतर देहातीत ॥४॥

१५५२. संतसेवा केल्यापाठीं। कैंची संसाराची गोष्टी ॥१॥ तेथें कैंचें कर्माकर्म। अवघा देह परब्रह्म ॥२॥ कैंचें ध्येय ध्याता ध्यान। एक संतचरणीं मन ॥३॥ कैंचा भेद कैंचें भान। एकाजनार्दनीं ध्यान ॥४॥

१५५३. मेघा परिस उदार संत। मनोगत पुरविती ॥१॥ आलिया शरण मनें वाचा। चालविती त्याचा भार सर्व ॥२॥ लिङ्गाड उपाधि तोडिती। सरते करती आपणामाजी ॥३॥ काळाचा

तो चुकविती घाव । येऊं न देती डाव अंगासी ॥४॥ शरण एका-जनार्दनीं । तारिले जनीं मूढ सर्व ॥५॥

१५५४. आदि अंत नाहीं जयाचे रूपासी । तोचि संतांपाशीं तिष्ठतसे ॥१॥ गातां गीतीं सावडे भावें तें कीर्तन । तेथें नारा-यण नाचतसे ॥२॥ योगियाचीं ध्यानें कुंठित राहिलीं । संत नामा-मृत वल्ली गोड वाटे ॥३॥ एकाजनार्दनीं संतसेवा जाण । घडती कोटी यज्ञ स्मरण मात्रें ॥४॥

१५५५. भवरोगियासी उपाय । धरावे ते संत पाय ॥१॥ तेणें तुटे जन्म जराकंद । वांयां छंद मना नये ॥२॥ उपासना जे जे मार्ग । दाविती अव्यंग भाविकां ॥३॥ निवटोनी काम-क्रोध । देती बोध नाम मुद्रा ॥४॥ शरण एकाजनार्दनीं । धन्य धन्य संत जनीं ॥५॥

१५५६. कृपासिंधु ते संत । तारिती पतीत अन्याई ॥१॥ न पहाती गुणदोष । देती समरस नाममात्रा ॥२॥ तारिती भव-सिंधूचा पार । एक उच्चार स्मरणें ॥३॥ एकाजनार्दनीं धन्य संत । अनाथ पतीत तारिती ॥४॥

१५५७. मान देखोनि सहसा । संतां असंतोष होय जैसा ॥१॥ नाम ऐकुनी वागुलातें । बाळ सांडू पाहे प्राणातें ॥२॥ चंड-वातें ते कर्दळी । समूळ कांपे चळचळी ॥३॥ सन्मानें नामरूप जाय । एकाजनार्दनीं सत्य पाहे ॥४॥

१५५८. ब्रह्मांडाचा धनी । तो संतीं केला ऋणी ॥१॥ म्हणोनी नाचे मागें मागें । वाहे अंगें भार त्याचा ॥२॥ सांकडें पडूं नेदी कांहीं व्यथा । आपणचि माथां वोढवी ॥३॥ एकाजनार्दनीं संत । त्रैलोक्यांत मुकुटमणी ॥४॥

१५५९. संत देवाचा लाडका । देव तेणें केला बोडका ॥१॥ अर्थ पहातां सखोल असे । बोडका देव पंढरीं वसे ॥२॥ संत लाडका देव बोडका । म्हणे जनार्दन लाडका एका ॥३॥

१५६०. छळणें करुनी बोलतां । तात्काळ जाली समाधि अव-स्था । सद्भावें विनटतां संतां । न कळे तत्त्वतां काय देती ॥१॥ जाणा

जाणते सकळ । ज्यांसी निजप्राप्तीची कळवळ । तिहीं सांडोनी स्थळ । संतजन वंदावे ॥२॥ एकाजनार्दनाचें तान्हें । भुकाळु परी मागूं नेणे । कुर्वाळूनियां स्तनें । जनार्दनें लाविलें ॥३॥

१५६१. भांबावला देव संतांमागें धांवे । उघडाचि प्रभवे पंढरीये ॥१॥ युगें अठ्ठाविस पुंडलीकासाठीं । उभा जगजेठी विटेवरी ॥२॥ यावें तया यावें क्षेमालिंगन । पुसावा तो शीणभाग त्यासी ॥३॥ कुर्वाळुनी करें धरी हनुवटी । म्हणे मजसी भेटी तुमची झाली ॥४॥ लाघव तयासी दावी आपुले बळें । पुरवावे ळळे सर्व त्याचे ॥५॥ जैशी ज्याची भावना आपण पुरवी । एकाजनार्दनीं गोंवी आपणाकडे ॥६॥

१५६२. धर्म अर्थ काम मोक्ष । संतचरणीं ठेवी दक्ष ॥१॥ परापश्यंती मध्यमा वैखरी । चरणीं निर्धारीं संतांच्या ॥२॥ योगयागादी साधनें । संतचरणीं असो ध्यानें ॥३॥ आणीक नको त्या उपाधी । तोडा देहीं आधिव्याधी ॥४॥ एकाजनार्दनीं मन । एकपणें जनार्दन ॥५॥

१५६३. परलोकींचे सखे । संत जाणावे ते देखें ॥१॥ तोडिती दरुशनें बंधन । करिती खंडन कर्मांचें ॥२॥ उत्तम जें नामामृत । पाजिती त्वरित मुखामाजी ॥३॥ एकाजनार्दनीं संत पाय । निरंतर हृदयीं ध्याय ॥४॥

१५६४. सांडोनियां संतसेवा । कोण हेवा मग जोडी ॥१॥ नानापरींचें साधन । अष्टांग योग धूम्रपान ॥२॥ यज्ञ योग तीर्थकोटी । संतांचिया चरणांगुष्ठीं ॥३॥ एकाजनार्दनीं मन । संतचरणीं समाधान ॥४॥

१५६५. भुक्ति मुक्तीचें माहेर । संत उदार असती ॥१॥ देव ज्यांचें करी काम । देतो धाम आपुलें ॥२॥ तया वचनांची पाहे वास । पुरवी सौरस मनींचा ॥३॥ एकाजनार्दनीं विनित । संत चरणरज वंदीत ॥४॥

१५६६. जया जैसा हेत । तैसा संत पुरविती ॥१॥ उदारपणें समदेणें । नाहीं उणें कोणासी ॥२॥ भलतिया भावें संतसेवा । करितां देवा पाविजे तें ॥३॥ एकाजनार्दनीं त्यांचा दास । पूर्ण ओरस कृपेचा ॥४॥

१५६७. संतांचें सुख जिहीं अनुभविलें । ते जीवन्मुक्त जाहले जन्मोजन्मीं ॥१॥ संतांचा संग जयासी हो जहाला । प्रत्यक्ष घडला सत्य लोक ॥२॥ एकाजनार्दनीं संतांचा अनुभव । धाला माझा जीव परमानंदें ॥३॥

१५६८. संतांचे ठायीं नाहीं द्वैतभाव । रंक आणि राव सारिखाची ॥१॥ संतांचें देणें अरिमित्रां सम । कैवल्याचें धाम उघड तें ॥२॥ संतांची थोरीव वैभव गौरव । न कळे अभिप्राव देवासी तो ॥३॥ एकाजनार्दनीं करी संतसेवा । परब्रह्म ठेवा प्राप्त झाला ॥४॥

१५६९. तीर्थाटन गुहावास । शरीरा नाश न करणें ॥१॥ समागम संतसेवा । होंचि देवा आवडतें ॥२॥ करितां रामनाम लाहो । घडती पहाहो धर्म त्या ॥३॥ सकळ कर्में जाती वांयां । संत पायां देखतां ॥४॥ एकाजनार्दनीं होतां दास । पुरे आस सर्वही ॥५॥

१५७०. संतचरणीं सावधान । ज्याचें जडलेंसें मन ॥१॥ तया नाहीं जन्ममरण । मुक्ती उभ्या कर जोडोन २ ब्रह्मज्ञान हात जोडी । संतांघरीं घाली उडी ३ शरण एकाजनार्दनीं । वंदितसे अनुदिनीं ४

१५७१. भाविक हे संत कृपेचे सागर । उतरती पार भवनदी ॥१॥ तयांचिया नामें तरताती दोषी । नासती त्या राशी पातकांच्या २ दयेचें भांडार शांतीचें घर । एकाजनार्दनीं माहेर भाविकांचें ३

१५७२. संतपूजनें देव । तुष्टतसे वासुदेव ॥१॥ संतपूजेचें महिमान । वेदां न कळे प्रमाण ॥२॥ संतचरण तीर्थ माथा । वंदिती तीर्थें पैं सर्वथा ॥३॥ एकाजनार्दनीं करी पूजा । पूज्य पूज्यक नाहीं दुजा ॥४॥

१५७३. मुखीं नाहीं निंदा स्तुति । साधु वर्ते आत्मस्थिति ॥१॥ राग द्वेष समूळ गेले । द्वैताद्वैत हारपले ॥२॥ घेणें देणें हा पसारा । नाहीं जयासी दुसरा ॥३॥ एकाजनार्दनीं संत । ज्याचे हृदयीं भगवंत ॥४॥

१५७४. धन्य तेचि संत भक्तभागवत । हृदयीं अनंत नित्य ज्यांच्या ॥१॥ धन्य त्यांची भक्ति धन्य त्यांचें ज्ञान । चित्त समाधान सर्वकाळ ॥२॥ धन्य तें वैराग्य धन्य उपासना । जयाची

वासना पांडुरंगीं ॥३॥ एकाजनार्दनीं धन्य तेचि संत । नित्य ज्यांचें आर्त नारायणीं ॥४॥

१५७५. संतां निंदी जो पामर । तो दुराचार जन्मोजन्मीं ॥१॥ त्यांसी करितां संभाषण । करावें सचैल तें स्नान ॥२॥ तयासी येऊं न द्यावें घरा । आपण जाऊं नये द्वारा ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । त्याचें न पहावें वदन ॥४॥

१५७६. संतांची जो निंदा करितो चांडाळ । प्रत्यक्ष अमंगळ हीन याती ॥१॥ तयाच्या विटाळा घ्यावें प्रायश्चित्त । आणिक दुजी मात नाहीं नाहीं ॥२॥ तयाचें वचन नायकावें कानीं । हो कां ब्रह्मज्ञानी पूर्ण ज्ञाता ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसे जे पामर । भोगिती अघोर रवरव नरक ॥४॥

१५७७. संतांचा करी जो अपमान । तोचि जाणावा दुर्जन ॥१॥ जन्मोनियां पापराशी । जातो पतना नरकासी ॥२॥ सोडवावया नाहीं कोणी । पडतो चौऱ्यायंशीं पतनीं ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । ऐसा अभागी खळ जाण ॥४॥

१५७८. जया संतचरणीं नाहीं विश्वास । धिक् त्यास वास यमपुरीं ॥१॥ संतचरणीं मन ठेवा रे निश्चळ । करुणा उतावेळ भाका त्यासी ॥२॥ घाला लोटांगण वंदूं पां चरण । तेणें समाधान होईल मना ॥३॥ एकाजनार्दनीं सत्संगावांचुनी । तरला तो कोण्ही मज सांगा ॥४॥

१५७९. असोनी उत्तम न करी भजन । संतसेवा दानधर्म नेणे ॥१॥ काय त्याचें कुळ चांडाळ चांडाळ । मानी तो विटाळ यमधर्म ॥२॥ सदा सर्वकाळ संतांची करी निंदा । पापाची आपदा भोगी नरक ॥३॥ स्वमुखें आपण सांगे जनार्दन । एकाजनार्दन पूजन करी सुखें ॥४॥

१५८०. नांदतसे नाम आकाश पाताळीं । सर्व भूमंडळीं व्यापत असे ॥१॥ पाताळ भेदोनी व्यापक ठेलें पुढें । नाहीं त्यासी आड कोठें कांहीं ॥२॥ चौऱ्यांशीं भोगिती दुर्मती पामर । संतांसी साचार शरण न जाती ॥३॥ एकाजनार्दनीं नाम अविनाश । संतसंगें दोष सर्व जाती ॥४॥

१५८१. **नरदेह श्रेष्ठ परमपावन** । पावोन न करी संतसेवन १ ऐसिया नराप्रती जाण । यम यातना करीतसे ॥२॥ अपरोक्ष ज्ञान कसवटी । संतांविण नये पोटीं ॥३॥ जैसा अंधारीं खद्योत । तैसा संतांविण नरदेह प्राप्त ॥४॥ मनीं विषयाचा अभिलाष । कोण सोडवी तयास ५ जनार्दनाचा एका ह्मणे । संतांपायीं देह ठेवणें ॥६॥

१५८२. **संतांसी जो निंदी देवासी जो वंदी** । तो नर आपदीं आपदा पावे १ देवासी जो निंदी संतांसी जो वंदी । तो नर गोविंदीं सरता होय ॥२॥ कृष्णा कंस द्वेषी नारदा सन्मानी । सायुज्यसदनीं पदवी पावे ३ एकाजनार्दनीं गूज सांगे कानीं । रहा अनुदिनीं संतसंगें ४

१५८३. **शरण गेलिया संतांसी** । तेणें चुकती चौऱ्यायंशीं ॥१॥ द्यावें संतां आलिंगन । तेणें तुटे भवबंधन ॥२॥ वंदितां चरणरज । पावन देह होती सहज ॥३॥ घालितां चरणीं मिठी । लाभ होय उठाउठी ॥४॥ प्रेमें दर्शन घेतां । मोक्ष सायुज्य ये हातां ॥५॥ ह्मणे जनार्दन । एका लाधलीसे खूण ॥६॥

१५८४. **कर्म उपासना न कळे जयासी** । तेणें संतांसी शरण जावें ॥१॥ सर्व कर्मभावें विठ्ठलनाम गावें । जाणिवेनेणिवेचे हावें पडूं नये ॥२॥ अभिमान झटा वेदाचा पसारा । शास्त्रांचा तो थारा वहातां अंगीं ॥३॥ एकाजनार्दनीं सर्व कर्म पाही । विठ्ठल म्हणतां देहीं घडतसे ॥४॥

१५८५. **संतांवाचोनियां सुख कोठें नाहीं** । अमृत त्यांचे पायीं नित्य वसे ॥१॥ संतांचे संगती होय मोक्षप्राप्ति । नको पा संगती दुर्जनाची २ दुर्जनाचे संगें दुःख प्राप्त होय । तेथें कैंची सोय तरावया ३ एकाजनार्दनीं हेंचि सत्य साचा । नको अभक्तांचा संग देवा ४

१५८६. **वाट पिकली संतांसी** । अवघें स्वरूप मुद्दलची ॥१॥ उकल करा लवड सवडीं । मुद्दल देव घडोघडीं ॥२॥ द्वैताची दाटणी सोडीं । वासनेची वासना फेडीं ॥३॥ आळ करितां सरळ सात । मन पडेल विचारांत ॥४॥ अखिल गुरुनामाचे । स्थापिले सुरंग भक्तीचे ॥५॥ अंगलु मंगलु नंद भाषा । द्वैत दळणीं वटील घसा ६॥ आंत बाहेर एकचि सुत । मुद्दल देतां सुखी होत ॥७॥ एकाजनार्दनीं एकची भेटी । सरिसी साठीं संसारा ॥८॥

१५८७. हरिप्राप्तीसी उपाय । धरावे संतांचे ते पाय ॥१॥ तेणें साधती साधनें । तुटती भवाचीं बंधनें ॥२॥ संतांविण प्राप्ति नाहीं । ऐसी वेद देती ग्वाही ॥३॥ एकाजनार्दनीं संत । पूर्ण करिती मनोरथ ॥४॥

१५८८. सकळ संकल्पांचा त्याग । करितां संतसंग जोडला ॥१॥ मूळ पाहिजे हेंचि शुद्ध । भेदाभेद न यावे ॥२॥ संकल्पाचें दृढ बळ । विकल्पाचें छेदी मूळ ॥३॥ संकल्प दृढ धरितां पोटीं । एकाजनार्दनीं होय भेटी ॥४॥

१५८९. आह्मांसी तों एक संतांचे चरण । दुजें अनुमान नेणों कांहीं ॥१॥ सर्वभावें त्याचें करितां सेवन । आमुचें हितकल्याण जन्मोजन्मीं ॥२॥ एकाजनार्दनीं संतांचे चरणीं । जाईन लोटांगणीं जीवेंभावें ॥३॥

१५९०. संतसमागमें सुखाची ते रासी । ह्मणोनि पायांपाशीं सलगी केली ॥१॥ वंदूं चरणरज घालूं लोटांगण । अभय तें दान संत देती ॥२॥ पंच महा पातकी विश्वासघातकी । ऐसी यासी निकी संतसेवा ॥३॥ एकाजनार्दनीं संतांचा मी दास । अनन्य पायांस न विसंबें ॥४॥

१५९१. आजी सुदिन आह्मासी । संतसंग कैवल्यरासी ॥१॥ हेंचि आमुचें साधन । आणिक नको आह्मां पठन ॥२॥ वेदश्रुती पुराण मत । संत सेवातें सांगत ॥३॥ जाणोनी विश्वासलों मनीं । शरण एकाजनार्दनीं ॥४॥

१५९२. सायासाचा न करीं सोस । एक आस संतचरणीं ॥१॥ नावडे वैभव विलास मनीं । अनुदिनीं संतसेवा ॥२॥ प्रेमें प्रेम दुणावलें । सुख जाहलें सुखासी ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । संतचरण वंदी माथां ॥४॥

१५९३. होईन मी दास कामारी संतांचा । संकल्प हा साचा जीवभावें ॥१॥ घालीन लोटांगण करीन पूजन । भावें वोवाळिन प्राण माझा ॥२॥ आणिक सायास न करीं कांहीं आस । होईन निजदास संतचरणीं ॥३॥ एकाजनार्दनीं हेंचि वाटे बरें । आणिक दुसरें नको कांहीं ॥४॥



१५९४. जाहली भाग्याची उजरी । संतसेवा निरंतरीं ॥१॥ होंचि मज वाटे गोमटें । येणें भवभ्रम फिटे ॥२॥ करितां सावकाश ध्यान । होय मनाचें उन्मन ३ एका जनार्दनीं संत । सदा शांत अंतरीं ४

१५९५. संतसुखसागरीं । बुडी दिधली निर्धारीं । भवदुःख हरी । संतनामें ॥१॥ ऐसा संतांचा महिमा । नाहीं द्यावया उपमा । ब्रह्म-सुखधामा । पुढें नाचे ॥२॥ बोलती तें वचन साचें । नाहीं बोलणें असत्याचें । नामीं प्रेम जयाचें । जडोनि ठेलें ॥३॥ कृपावंत संत । दीन तारिले त्वरित । एकाजनार्दनीं मात । श्रवण मज झाली ॥४॥

१५९६. देऊनियां अभयदान । संतीं केलें मज पावन । निर-सोनी भवबंधन । तारिलें मज ॥१॥ ऐसा संतसमागम । नाहीं आणीक विश्राम । योगियाचें धाम । कुंठित पैं झाले ॥२॥ आणीक एक वर्म । मुख्य इंद्रियांचा धर्म । मन ठेवुनी विश्राम । नामचिंतन करावें ॥३॥ एकाजनार्दनीं जाण । संत आमुचें निजध्यान । काया-वाचा मन । दृढ पायीं ॥४॥

१५९७. संतचरणरज वंदुनी तत्त्वतां । सायुज्य मुक्ती माथां पाय देऊं ॥१॥ थोरीव थोरीव संतांची थोरीव । आणिक वैभव कांहीं नेणें ॥२॥ संतांपरतें दैवत नाहीं जया चित्तीं । तोचि एक पूर्ण स्थिति ब्रह्मज्ञानी ॥३॥ संत तेचि देव जयांची वासना । एका-जनार्दनीं भावना नाहीं दुजी ॥४॥

१५९८. संत सज्जन जिवलग माझे । त्यांचे चरण चुरीन वोजें ॥१॥ त्यांचेसंगें सुख मना होय । आनंदीं आनंद पहातां होय ॥२॥ त्यांचे पिसें मजलागीं मोठें । ऐसे भाविक केवीं भेटे ॥३॥ त्यांचे नामाची घेऊं धणी । तया जाऊं लोटांगणीं ॥४॥ तया शेजार करितां बरा । चुके जन्ममरण फेरा ॥५॥ तया जीव करूं कुर्वंडी पाहीं । एकाजनार्दनीं लागतसे पायीं ॥६॥

१५९९. जनीं जनार्दन मुख्य हाचि भाव । संत तेचि देववृत्ती ऐसी ॥१॥ समाधि साधन माझें संतजन । विश्रांतीचें स्थान संतपायीं ॥२॥ योगयाग धारणा पंचाग्नि साधन । तें हें माझें ध्यान संतापायीं ॥३॥ एकाजनार्दनीं तयाचा सांगात । घडो मज निश्चित सर्वकाळ ४

१६००. अंकिला देव संतद्वारीं । भिक्षा मागे तो निर्धारीं ॥१॥ मज द्यावी प्रेमभिक्षा । देव बोले तया प्रत्यक्षा ॥२॥ नाम गाणें हेंची दक्ष । एकाजनार्दनीं प्रत्यक्ष ॥३॥

१६०१. मोक्षमुक्ती काकुलती । संतांप्रती येताती ॥१॥ करा माझा अंगिकार । नाहीं थार तुह्मांविण ॥२॥ हेंचि द्यावें आह्मा-लागुनी । तुमचे चरणीं वास सदा ॥३॥ एकाजनार्दनीं करी विनंती । कींव भाकिती संतांप्रती ॥४॥

१६०२. मायबाप तुह्मी संत । मी पतित कींव भाकीं ॥१॥ करा माझें समाधान । अभय वचन देउनी ॥२॥ मागें तारिलें सकळ । उत्तम अधम चांडाळ ॥३॥ तोचि आहे अनुभव । म्हणोनी कींव भाकीतसों ॥४॥ एकाजनार्दनीं शरण । मज पावन करावें ॥५॥

१६०३. संतांचिये द्वारीं होईन द्वारपाळ । न सांगतां सकळ करीन काम ॥१॥ तेणें माझ्या जीवा होईल समाधान । यापरतें साधन आणीक नाहीं ॥२॥ शेष उष्टावळी काढीन पत्रावळी । पूर्व-कर्मा होळी सहज होय ॥३॥ एकाजनार्दनीं हेंचि पैं मागत । नाहीं दुजा हेत सेवेविण ॥४॥

१६०४. संतांचिये पायीं । भावें ठेविली म्यां डोई ॥१॥ करा माझें समाधान । आलों पतित शरण ॥२॥ आपुलीया सेवे । माझे संकल्प वेंचावे ३ एकाजनार्दनीं तुमचा दास । पुरवा आस माझी ते ४

१६०५. संतांचिये परिवरीं । लोळेन मी निर्धारीं ॥१॥ जीवा होईल महालाभ । ऐसा घडतां उद्योग ॥२॥ सांडोनियां थोरपण । शिव घाली लोटांगण ॥३॥ आपुलें महत्त्व । तेथें मिरवूं नये सत्य ॥४॥ शरण एकाजनार्दनीं । वोवाळावा जीव चरणीं ॥५॥

१६०६. संतांचे चरणीं । सुख घेईन मी धणी ॥१॥ करीन नीच-वृत्ति काम । मना होईल विश्राम ॥२॥ बंधनाची बेडी । तुटेल तयाचीये जोडी ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । वासना जाईल करपोन ॥४॥

१६०७. संतांचिये घरीं होईन श्वानयाती । उच्छिष्ट तें प्रीति मिळेल मज ॥१॥ तेणें या देहाची होईल शुद्धता । भ्रम मोह ममता निवारेल ॥२॥ आशा पाश सर्व जातील तुटोनी । जीव

हा बंधनीं मुक्त होय ॥३॥ एकाजनार्दनीं भाकीन करुणा । श्रीसंत चरणा वारंवार ॥४॥

१६०८. तुमच्या चरणीं मिठी । आतां तुटी न करावी ॥१॥ थोरांचें जें थोरपण । तुह्मा करणें सहजचि ॥२॥ मी पतित दीन हीन । ह्मणोनि शरण तुह्मासी ॥३॥ पतितपावन तुह्मी संत । एवढें आर्त पुरवा ॥४॥ एकाजनार्दनीं शरण । त्याचें चुकवा जन्ममरण ५

१६०९. ऐकोनी कीर्ति उदार संत । आलों धांवत शरण ॥१॥ सांभाळावें सांभाळावें । सांभाळावें अनाथा ॥२॥ धरूनियां हातीं हात । ठेवा मस्तकीं निवांत ॥३॥ एकाजनार्दनीं एकपण । एका भावें आलों शरण ॥४॥

१६१०. संतचरणीं जीवभाव । ठेविला देह विसार ॥१॥ आतां तुह्मीं उपेक्षिल्या वरी । कोण वानील तुमची थोरी ॥२॥ बहु जाहलों कासाविस । धरली कास आदरें ॥३॥ एकाजनार्दनीं परता । करितां लाज येई माथां ॥४॥

१६११. संतांचियां माथां चरणांवरी माझा । देहीं भाव दुजा नाहीं नाहीं ॥१॥ नामाचें चिंतन करती सर्वकाळ । ते माझे केवळ मायबाप ॥२॥ मायबाप ह्मणों तरी लाजिरवाणें । चुकविलें पेणें संतजनीं ॥३॥ ज्या ज्या जन्मा जावें मायबाप दोन्ही । परी संतजन निर्वाणीं मिळतीना ॥४॥ येचि देहीं डोळां संतांसी देखिलें । एकाजनार्दनीं वंदिले चरण त्यांचे ॥५॥

१६१२. माझ्या मना धरीं गोडी । संत जोडी करीं तूं ॥१॥ मग सुखा काय उणें । देवचि ठाणें तुणावे ॥२॥ कळिकाळ वंदी माथां । नाहीं चिंता संसार ३ एकाजनार्दनीं दास । हेचि आस पुरवावी ४

१६१३. करीं कांहीं मना एक विचारणा । संतांच्या चरणा न विसंबें ॥१॥ तयाचा मी दास कामारी दुर्बळ । तेचि माझें सकळ हित करती ॥२॥ देउनी प्रेमपान्हा लडीवाळपणें । कृपेचें पोसणें तुमचें मी ॥३॥ जनार्दनाचा एका तुमचा तो दास । तयासी उदास धरूं नये ॥४॥

१६१४. माझ्या मनाचा संदेह । फेटला देखितांचि पाय ॥१॥

तुह्मी कृपा केली संतीं । निरसली भय खंती ॥२॥ माझें मज दिलें हातीं । जाहली समाधान वृत्ती ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । निरसला भवशीण ॥४॥

१६१५. पाहूनियां मनोगत । पुरवा हेत तुह्मी माझा ॥१॥ मग मी न सोडीं चरणां । संत सुजाणा तुमचीया ॥२॥ दंडवत घालीन पायां । करा छाया कृपेची ३ शरण एकाजनार्दनीं । मुकुटमणी तुह्मी संत ४

१६१६. मनाचेनि मनें जहालों शरणागत । कृपावंत संत मायबाप ॥१॥ धरूनियां आस घातली लोळणी । मस्तक चरणीं माझा तुमच्या ॥२॥ तुमचा मी दास कामारी त्रिवाचा । आणीक मनाचा संकल्प नाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं तुह्मी तों पावन । काय हा मी दीन वानूं महिमा ॥४॥

१६१७. मनाची नखी न लगे जयां ठाया । तेणें उणी पायां भेटवी संत ॥१॥ संत उदार उदार । नामामृतें भरले सागर ॥२॥ एकाजनार्दनीं संत । कोण जाणे त्यांचा अंत ॥३॥

१६१८. उघड बोलती संत । जैसा हेत पुरविती ॥१॥ मनींचें जाणती ते सदा । होऊं नेदी विषयबाधा ॥२॥ अज्ञान सज्ञान । तारिती कृपें करून ॥३॥ संतांपायीं ज्याचा भाव । तेथें प्रगटेची देव ॥४॥ एकाजनार्दनीं बरा । द्यावा मज तेथें थारा ॥५॥

१६१९. संतचरणीं विश्वास । धरुनी राहिलों रात्रंदिवस ॥१॥ मज दिना सांभाळावें । हेंचि मागें जीवेंभावें ॥२॥ धनवित्ता चाड नाहीं । सेवा सुखें मज द्यावी ॥३॥ एकाजनार्दनीं आपुला । एकाएकपणें अंकिला ॥४॥

१६२०. आलिंगन संत पायां । पावली काया विश्रांति ॥१॥ सुखें सुख अपार झालें । संत पाउलें देखतां ॥२॥ अवघा श्रम फळा आला । काळ गेला देशधडी ॥३॥ एकाजनार्दनीं संत । मज भेटोत अखंडित ॥४॥

१६२१. देहतापें तापलों भारी । संतां घरीं मागतसें ॥१॥ मज द्या कांहो जीवन । जेणें जीवाचें समाधान ॥२॥ एकाजनार्दना सर्वे । सुख सागराची घातली पोहे ॥३॥

१६२२. पुरवा माझी येवढी आस । करा निजदास संतांचा ॥१॥ इच्छा पुरवा मनींचा हेत । सभाग्य संत दाखवा ॥२॥ आणिक मागणें तें नाहीं । दुजा देहीं आठव नको ॥३॥ घालीन लोळणी । संतचरणा निशिदिनीं ॥४॥ परलोकींचें तारूं । एका निर्धारु जनार्दनीं ॥५॥

१६२३. धन्य आज दिन संतदरुशनाचा । अनंत जन्मांचा शीण गेला ॥१॥ मज वाटे त्यासी आलिंगन द्यावें । कदा न सोडावे चरण त्याचे ॥२॥ त्रिविधतापांची जाहली बोळवण । देखिल्या चरण वैष्णवांचे ॥३॥ एकाजनार्दनीं घडो त्याचा संग । न व्हावा वियोग माझ्या चित्ता ॥४॥

१६२४. अनुपम्य सुख संतांचिया पायीं । राहीन तये ठाईं अखंडित ॥१॥ अखंडित गोडी सेवीन आवडी । ब्रह्मादिकां जोडी ऐशी नाहीं ॥२॥ सर्व पर्वकाळ आले तया ठायां । विश्रांति घ्यावया इच्छिताती ३ एकाजनार्दनीं सुखाचें माहेर । भवसिंधुपार तारक हें ४

१६२५. एकविध भाव संतांच्या चरणीं । घेईन पायवणी धणीवरी ॥१॥ आनंदें चरण धरीन आवडी । हीच माझी जोडी सर्व जाणा ॥२॥ उतराई तयांच्या नोहे उपकारा । धाडिती माहेरा निजाचिया ३ एकाजनार्दनीं घडतां त्यांचा संग । जन्ममरण पांग तुटे मग ४

१६२६. तुह्मी तंव उदार मायबाप संत । करावें कृतार्थ मजलागीं ॥१॥ ठेवा माथां हात वंदूं पायवणी । आणिक दुजें मनीं नाहीं कांहीं २ गुणदोष याती न पहा कारण । करितों भजन निशिदिनीं ३ एकाजनार्दनीं तयांचा मी दास । येवढीच आस पायीं मिठी ४

१६२७. संतीं केला उपकार । मज निर्धार बांणला ॥१॥ चुकविलें जन्माचें सांकडें । उगविलें कोडें बहुतांचें ॥२॥ गुण अवगुण नाणितां मनीं । देती दरुशनीं मुक्ति त्या ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । करूं वोवाळणी देहाची ॥४॥

१६२८. फार बोलूं काय वांयां । जाणवेल पायां चित्त माझें ॥१॥ धन्य धन्य तुह्मी संत । कृपावंत संसारीं ॥२॥ उत्तीर्णपणें मज दासा । पुरवा इच्छा कृपाळुवा ॥३॥ शरण एकाजनार्दना । कृपा करुणा तुह्मी संत ॥४॥

१६२९. रवि न लपेचि अंधारीं । तैशी तुमची जगीं थोरी ॥१॥ कृपावंत तुह्मी संत । यावरी हेत दुजा नाहीं ॥२॥ एकाजनार्दनीं शरण । संत परिपूर्ण दयाळु ॥३॥

१६३०. कृपाळ उदार तुह्मी संत । दीन अनाथ तारिले ॥१॥ हाचि महिमा ऐकिला । जीव गुंतला चरणीं ॥२॥ करा माझें समाधान । देउनी वचन अभयाचें ॥३॥ यावरी फार बोलूं नेणें । उचित करणें तुह्मासी ॥४॥ एकाजनार्दनीं शरण । आहें मी दीन पामर ॥५॥

१६३१. तुह्मी संतजन । माझें ऐका हो वचन ॥१॥ करा कृपा मजवरी । एकदां दाखवा तो हरी ॥२॥ आहे तुमचे हातीं । ह्मणोनी येतों काकुलती ॥३॥ एकाजनार्दनीं ह्मणे थारा । संतीं द्यावा मज पामरा ॥४॥

१६३२. संतांचा महिमा । नाहीं द्यावया उपमा ॥१॥ मज तारिलें तारिलें । भवजळीं उद्धरिलें ॥२॥ पावन केलें संतीं । अवघी निसरली गुंती ॥३॥ संतचरण वंदीन माथा । एकाजनार्दनीं तत्त्वतां ॥४॥

१६३३. संतांच्या विभूती जगासी उपदेश । देताती सौरस सर्वभावें ॥१॥ परीसाचे परी करिती उपकार । कामधेनु कल्पतरूवर त्यासी वंद्य ॥२॥ एकाजनार्दनीं सर्वांमाजी श्रेष्ठ । संत ते वरिष्ठ वंदूं आह्मी ॥३॥

१६३४. सोनीयाचा दिवस आजी झाला । संत समागम पावला ॥१॥ तेणें फिटलें अवघें कोडें । झालें परब्रह्म उघडें ॥२॥ एकाजनार्दनीं सेवा । करीन मी त्यांची भावा ॥३॥

१६३५. संतसंगतीनें झालें माझें काज । अंतरीं तें निज प्रगटलें ॥१॥ बरवा झाला समागम । अवघा निवारला श्रम ॥२॥ दैन्य दरिद्र दूर गेलें । संत पाउलें देखतां ॥३॥ एकाजनार्दनीं सेवा । करीन मी आपुल्या भावा ॥४॥

१६३६. अखंडित संतसंग । तेथें काय सुखा उणें मग ॥१॥ माझे आलें अनुभवा । संतसेवा घडावी ॥२॥ हेंचि मार्गे आणीक नाहीं । संतसंग देईं सर्वकाळ ॥३॥ एकाजनार्दनीं मन । संतपायीं मी ठेवीन ॥४॥

१६३७. जन्मजन्मांतरींचें सुकृत जोडलें । संतचरण पावले तेणें भाग्यें ॥१॥ हा माझा विश्वास संतचरण सेवा । दुजा नाहीं देवा

प्रपंचाचा ॥२॥ मागणें तें नाहीं आणिक तयासी । संत हे सेवेसी झिजवी अंग ॥३॥ एकाजनार्दनीं सेवेसी मन । रात्रंदिवस ध्यान लागो त्याचें ॥४॥

१६३८. संत भलते यातीं असो । परी विठ्ठल मनीं वसो ॥१॥ तया घालीन लोळणी । घेईन मी पायवणी ॥२॥ ज्ञाती कुळासी संबंध । मज नाहीं भेदाभेद ॥३॥ भलते ज्ञातीचा । विठ्ठल उच्चारी वाचा ॥४॥ तेणें पावन देह चारी । एकाजनार्दनीं निर्धारीं ॥५॥

१६३९. भाग्याचा उदय झाला । संतसंग मज घडला ॥१॥ तेणें आनंदाचे पूर । लोटताती निरंतर ॥२॥ प्रेम सप्रेम भरतें । अंगीं उतार चढतें ३ आली आनंदलहरी । एकाजनार्दनीं निर्धारीं ॥४॥

१६४०. संत आमुचे देव संत आमुचे भाव । आमुचें गौरव संत सर्व ॥१॥ वेदशास्त्र पुराण मंत्रादि साधन । संतसेवा ध्यान आह्मा धन्य ॥२॥ योगयाग व्रत साधन पसर । संतांठाईं आदर हेंचि बरें ३ जनीं जनार्दन संतसेवा जाण । एकाजनार्दन तोचि धन्य ४

१६४१. आजि उत्तम सुदीन । झालें दर्शन संतांचें ॥१॥ पापताप दैन्य गेलें । संत पाउलें पहातां ॥२॥ अवघा यत्न फळा आला । अवघा झाला आनंद ॥३॥ अवघें कर्म सुकर्म झालें । अवघे भेटले संतजन ४ एकाजनार्दनीं बरा । संतसमागम खरा ॥५॥

१६४२. संत जाती हरिकीर्तना । त्यांच्या वाहीन मोजे वाहाणा ॥१॥ हेंचि भवसिंधूचें तारूं । तेणें उतरूं पैल पारु ॥२॥ जन्मोजन्मींचें भेषज । ते हे संतचरण रज ॥३॥ संतचरणींच्या पादुका । जाहला जनार्दन एका ॥४॥

१६४३. मनासी निर्धार केलासे देखा । संतसंग सुखा आतुडलों ॥१॥ इच्छिलें पावलों इच्छिलें पावलों । इच्छिलें पावलों संतसंग २ एकाजनार्दनीं सांगात तयाचा । अनुभवें अनुभवाचा बोध लाहे ३

१६४४. मस्तक माझें संतपायीं । ठेउनी होऊं उतराई ॥१॥ वारंवार क्षणक्षणा । नामघोष करिती जाणा ॥२॥ देउनी अभयदान । करिती पतितपावन ॥३॥ एकाजनार्दनीं पाहीं । संतपायीं ठेवीं डोई ॥४॥

१६४५. आजि दिवस धन्य झाला । संत समागम पावला ॥१॥ बरवा फळला शकून । अवघा निवारला शीण ॥२॥ सुस्नात झालों । संत सागरीं नाहालों ॥३॥ एकाजनार्दनीं भावें । संतचरणीं लीन व्हावें ॥४॥

१६४६. घटिका पळ न वचे वांयां । संतपायां सांडोनी ॥१॥ मनोरथ पुरले मनींचे । झालें देहाचें सार्थक २ जन्मा आलियाचें काज । संतसंग घडला निज ३ एकाजनार्दनीं मिठी । संतसंग जडला पोटीं ४

१६४७. जाणते संत जाणते संत । जाणते संत अंतरींचें ॥१॥ जे जे इच्छा देती फळ । काळ वेळ चुकवोनी ॥२॥ मनोरथ पुरले वो माझे । एकाजनार्दनीं वोझें ॥३॥

१६४८. जयाच्या चरणां मिठी घाली भावें । धन्य ते जाणावे सदैव संत ॥१॥ प्रेमाचे सागर भक्तीचे उदधि । तोडिती उपाधि नाममाळें ॥२॥ जडजीवां तारक सत्य सत्य वाचे । आणीक तें न वचे उपमे त्याच्या ॥३॥ एकाजनार्दनीं कृपाळु संतजन । तेणें मज पावन केलें जगीं ॥४॥

१६४९. जाणती हे हातवटी । संत पोटीं दयाळु ॥१॥ न म्हणती अधम जन । करिती कृपेनें पोषण ॥२॥ शुचि अशुचि न ह्मणे कांहीं । एकरूप वर्ते देहीं ॥३॥ एकाजनार्दनीं मज । तारियेलें तेणें सहज ॥४॥

१६५०. देवतांचे अंगीं असतां विपरीत । परी संतकृपा त्वरित करिती जगीं ॥१॥ जैसी भक्ति देखती तैसे ते पावती । परी संतांची गती विचित्रची ॥२॥ वादक निंदक भेदक न पाहाती । एकरूप चिंती मन ज्याचें ॥३॥ भक्ति केल्या देव तुष्टे सर्वकाळ । न करितां खळ म्हणवी वैर ॥४॥ संतांचें तों ठायीं ही भावना नाहीं । एकाजनार्दनीं पायीं विनटला ॥५॥

१६५१. कैवल्य निधान तुम्ही संतजन । कायावाचा मन जडलें पायीं ॥१॥ सर्वभावें दास अंकित आंकिला । पूर्णपणें जाहला बोध देहीं ॥२॥ जें जें दृष्टी दिसे तें तें ब्रह्मरूप । एकाजनार्दनीं दीप प्रज्वाळिला ॥३॥

१६५२. दुजा नाहीं जया भाव। अवघा देव विठ्ठल ॥१॥ आणिक कांहीं नाहीं छंद। नाम गोविंद सर्वदा ॥२॥ नाना मतां करती खंड। छेदिती पाखांड अंतरींचें ॥३॥ एकाजनार्दनीं तेचि संत। उदार कृपावंत दयाळु ॥४॥

१६५३. धन्य दिवस जाहला। संत समुदाव भेटला ॥१॥ कोडें फिटलें जन्मांचें। सार्थक जाहलें पैं साचें ॥२॥ आज दिवाळी दसरा। संतपाय आले घरा ३ एकाजनार्दनीं जाहला। धन्य दिवस तो भला ४

१६५४. संतांचिये पायीं मज पैं विश्रांति। नाहीं माया भ्रांति तये ठाईं ॥१॥ सांगतों तें मनीं धरावें वचन। संतांसी शरण जावें सुखें ॥२॥ संत तुष्टलीया देवा आनंद होय। मागें मागें धांवे तया पाठीं ॥३॥ एकाजनार्दनीं माहेर सुखाचें। घेतलीया वाचे संतनाम ४

१६५५. संतजनाची मिळाली मिळवणी। रामनामाची भरली भरणी ॥१॥ रामनाम सेवा हा राम सांठवा। परमानंदाचा लाभ जाला जीवा ॥२॥ कीर्तनाचें तारूं लाधलें। रामनाम केणें सवंगलें ॥३॥ एकाजनार्दनीं रामनाम सेवा। परमानंदाचा लाभ जाला जीवा ॥४॥

१६५६. अंगीं जया पूर्ण शांति। वाचा रामनाम वदती। अनुसरले चित्तवृत्तीं। संत चरणींसर्वदा ॥१॥ घडो तयांचा मज संग। जन्ममरणाचा फिटतसे पांग। आधिव्याधि निरसे सांग। घडतां संग वैष्णवांचा ॥२॥ जें दुर्लभ तिहीं लोकां। आह्मां सांपडलें फुका। एकाजनार्दनीं घोका। नाम त्याचें आवडी ॥३॥

१६५७. संतांच्या विभूति। धर्मालागीं अवतरती ॥१॥ धर्मरक्षणाकारणें। साधु होताती अवतीर्ण ॥२॥ जगा लावावें सत्पथीं। होचि साधुची पैं कृती ॥३॥ एकाजनार्दनीं साधु। हृदयीं वसे ब्रह्मानंदु ॥४॥

१६५८. कोणता उपाय। जोडे जेणें संतपाय ॥१॥ ह्माचि आठव दिवसरात्रीं। घडो संतांची संगती ॥२॥ न करूं जप तप ध्यान। संतांपायीं ठेवूं मन ॥३॥ न जाऊं तीर्थ प्रदक्षणा। आठवूं संतांचे चरणां ॥४॥ होतां ऐसा निजध्यास। एकाजनार्दनीं दास ॥५॥

१६५९. बहुतांच्या मता । आह्मी न लागूं सर्वथा ॥१॥ धरूं संतांचा सांगात । तेणें होय आमुचें हित ॥२॥ जाऊं पंढरीसी । नाम गाऊं अहर्निशीं ॥३॥ करूं हाचि नित्य नेम । आणीक नको निजधाम ॥४॥ एकाजनार्दनीं ■म । गाऊं आवडीनें राम ॥५॥

१६६०. केला संतीं उपकार । दिधलें घर दावुनी ॥१॥ नये ध्यानीं मनीं लक्षीं । तो प्रत्यक्षीं दाविला ॥२॥ संकल्पाचें तोडिलें मूळ । आलें समूळ प्रत्यया ३ एकाजनार्दनीं कृपावंत । होती संत सारखे ४

१६६१. ज्यासी नाहीं संतसंग । ते अभंग दुःख भोगिती ॥१॥ तैसा नको विचार देवा । देईं सेवा संतसंग ॥२॥ अखंड नाम वाचे कीर्ति । संतसंग विश्रांति मज देईं ॥३॥ मागणें तें हेंचि द्यावें । आणिक मागणें जीवीं नाहीं ॥४॥ ह्मणे जनार्दनाचा एका । सुलभ सोपा उपाय ॥५॥

१६६२. अर्ध क्षण घडतां संतांची संगती । तेणें होय शांती महत्पापा ॥१॥ संतसंग देईं संतसंग देईं । आणिक प्रवाहीं घालूं नको ॥२॥ संसार मज न करणें सर्वथा । परमार्थ पुरता हातीं देईं ३ जनार्दनाचा एका करुणावचनीं । करी विनवणी पायांपाशीं ॥४॥

१६६३. एक आहे मज आस । संत दासांचा मी दास ॥१॥ कैं पुरती मनोरथ । संत सनाथ करतील ॥२॥ मनचिं साच होईल कई । क्षेम मी देईं संतांसी ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । माझा मनीं नवस पुरे ॥४॥

१६६४. सोइरे धाइरे आह्मां संतजन । तयांविण चिंतन आम्हा नाहीं ॥१॥ हाचि माझा भाव हीच माझी भक्ति । आणिक विश्रांति दुजी नाहीं ॥२॥ हेंचि माझें कर्म हाचि माझा धर्म । वाउगाचि श्रम न करीं दुजा ॥३॥ हेंचि माझें ज्ञान हेंचि माझें विज्ञान ॥ संतांविण शरण न जाय कोणा ॥४॥ एकाजनार्दनीं हा माझा निश्चय ॥ वंदीन मी पाय सर्वभावें ॥५॥

१६६५. मती लागो संतचरणीं । तेणें उन्मनी साधली ॥१॥ तुच्छ वाटे स्वर्ग लोक ॥ जैसा रंक इंद्रासी ॥२॥ आंधार तो जैसा पळे । किरण उजाळे देखतां ३ एकाजनार्दना शरण ॥ मनचि जालें कृष्णार्पण ४

१६६६. मोकळें तें मन ठेविलें बांधोनी । जनार्दनचरणीं सर्व- भावें ॥१॥ स्थिरमति जाली व्रार्ता तीही गेली । द्वैताची फिटली सर्वसत्ता ॥२॥ मोह आशाबद्ध कर्मा निवारलों । पावन तो जालों संतचरणीं ३ एकाजनार्दनीं धन्य संतसेवा । उगविला गोवागुंती सर्व ४

१६६७. पाजी प्रेमपान्हा लाऊनियां सोई । पुन्हां तो न गोंवी येरझारीं ॥१॥ येरझार दारीं घातलासे चिरा । ठेविलेंसे स्थिराचरणा- जवळीं २ एकाजनार्दनीं केलोंसे मोकळा । संतपायीं लळा लाऊनियां ३

१६६८. संतद्वारीं कुतरा जालों । प्रेमरसासी सोकलों ॥१॥ भुंकत भुंकत द्वारा आलों । ज्ञान थारुळ्या बैसलों ॥२॥ कुतरा भुंकत आला हिता । संतीं हात ठेविला माथां ॥३॥ कुतऱ्या गळ्याची सांखळी । केली संतांनीं मोकळी ॥४॥ एकाजनार्दनीं कुतरा । दांत पाडुनी केला बोथरा ॥५॥

१६६९. मनाची तों खुंटली गती । संत संगती घडतांचि ॥१॥ बहु जन्मांचा तो लाग । फिटला पांग जन्मोजन्मीं ॥२॥ कृतकृत्य थोर जाहलों । सुखें पावलों इच्छित ॥३॥ एकाजनार्दनीं चित्त । जाहलें निवांत ते ठायीं ॥४॥

१६७०. जीवेंभावें जाहलों दास । नाहीं आस संसारा ॥१॥ नाशिवंता पाठीं धांवे । कोण हावे भोगील ॥२॥ जन्मजरामरण फेरा । या संसारा आंचवलों ॥३॥ जाहला संत समागम । भवभ्रम फिटला ॥४॥ एकाजनार्दनीं काम । मन जाहलें तें निष्काम ॥५॥

१६७१. माझे मनीं आनंद जाहला । बोलतां बोला नवजाये ॥१॥ एक संत जाणती खूण । येरा महिमान न कळे ॥२॥ हृदयींच उदय दिसे । लाविलें पिसें देवानें ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । करी विनवणी सलगीनें ॥४॥

१६७२. बहुत मारग बहुत प्रकार । नागवले थोर थोर मार्गें ॥१॥ म्हणोनियां जीवें मानिला विश्वास । नाहीं दुजी आस संतां- विण ॥२॥ मार्गाची आशा सांडिला बोभाट । धरली एक वाट संतसंग ३ एकाजनार्दनीं जातां तयांमार्गें । हित लागवेगें जाहलें माझें ४

१६७३. चालतां मारगीं फुटतसे वाट । मागतो बोभाट सहजीं

होय ॥१॥ तैसें नोहे संतमार्गाचें लक्षण । चालत मागून आले सर्व ॥२॥ नोहे गुंतागुंती चुकीचा बोभाट । मार्ग आहे नीट संतसंग ॥३॥ एकाजनार्दनीं सांपडलें सहज । तेणें जाहलें काज सरतें माझें ॥४॥

१६७४. संत ते सोईरे सांगाती आमुचे । तेणें कळिकाळाचें भय नाहीं ॥१॥ जयाची आवडी धरी नारायण । ह्मणोनि चरण धरूं त्यांचे ॥२॥ परलोकींचे सखे सोईरे सांगाती । मज ते आदीं-अंतीं सांभाळिती ॥३॥ एकाजनार्दनीं धरूनि विश्वास । होईन त्यांचा दास जन्मोजन्मीं ॥४॥

१६७५. ब्रह्मांडभरी कीर्ति संतांचा महिमा । वर्णावया आम्हां मति थोडी ॥१॥ एक मुखें वानूं चतुरानन शीणु । सहस्र मुखें गुणु वानितां नये ॥२॥ एकाजनार्दनीं वर्णीन पवाडे । उभा वाडेंकोडें पंढरीये ॥३॥

१६७६. गर्भवासा भीती ते अंधळे जन । मुक्तीसी कारण नाहीं आह्मां ॥१॥ गर्भवास झालिया संतसेवा घडती । मुक्त जालिया न कळे भगवद्भक्ती ॥२॥ आह्मी सुखें गर्भवास घेऊं देखा । मुक्तीचिया मस्तकां पाय देऊं ॥३॥ एकाजनार्दनीं गर्भवास सोसूं । संतांचा सौरसु हातीं लागे ॥४॥

१६७७. आजी नवल झालें वो माय । पाहण्या पाहणें दृष्टी धाये ॥१॥ ऐसा लाघवी सुखकर मूर्ति । संतसंगें जाली मज विश्रांती ॥२॥ योगीश्वर जया चिंतिती । सनकादिक जया ध्याती ॥३॥ योगसाधनें नातुडे जो माये । एकाजनार्दनीं कीर्तनीं नाचतु आहे ॥४॥

१६७८. संगतीं बावनाचे रातलों सर्वभावें । चंदन होउनी सर्वे ठेलों मी वो ॥१॥ वेधिला जीव माझा संतचरणीं । आन दुजें मना नाठवेचि स्वप्नीं ॥२॥ जाग्रती स्वप्न सुषुप्तीचा ठाव । अवघा देखे देवाधि देव ॥३॥ पहात पहातां मन नाहींसें जालें । एकाजनार्दनीं केलें मज ऐसें ॥४॥

१६७९. आह्मासी ती मुख्य संतसेवा प्रमाण । विठ्ठलकीर्तन वाचे गाऊं ॥१॥ दुजें नेणों स्वप्नीं विठ्ठलावांचुनी । जनीं वनीं निरंजनीं देखों हेंचि ॥२॥ संतांचिया पायीं मस्तक ठेवून । आवडी

चरणा विठ्ठलाच्या ॥३॥ एकाजनार्दनीं जनार्दन एकपणीं । विठ्ठलावांचुनी दुजें नेणों ॥४॥

१६८०. माझी मुख्य उपासना । लागेन चरणा संतांच्या ॥१॥ भांडवल तें हेंची देख । भक्तियुक्त उपासना ॥२॥ मन वसो संतांपायीं । आर्त ठाईं कीर्तनीं ३ एकाजनार्दनीं । विनवणी करीतसे ४

१६८१. दुजेपणीं दृष्टि न घालूं । सर्वां चालूं एकसत्ता ॥१॥ हाचि पूर्वींचा संकल्प । निर्विकल्प नाम जपूं ॥२॥ नाहीं कांहीं वांटावांटी । करूं एकवटी मनाची ॥३॥ एकाजनार्दनीं उदास । जाहलों दास संतचरणीं ॥४॥

१६८२. भुक्ति मुक्ति करणें तुज न घालीं सांकडें । संतांसी रोकडे शरण जाऊं ॥१॥ हाचि माझा नेम उपासना भक्ति । आणिक विश्रांति मज नाहीं ॥२॥ एकाजनार्दनीं सेवेवांचून । आन नेणें जाण दुजें कांहीं ॥३॥

१६८३. कायावाचा आणि मन । संतचरण प्रमाण ॥१॥ ऐसें चालत आलें मागें । तया वाउगें कोण करी ॥२॥ उपासना मार्ग आधीं । भाविकांसी ती समाधि ॥३॥ एकाजनार्दनीं आस । आहे पायांस दास्यत्व ॥४॥

१६८४. सम असे सुखदुःख । संत त्यासी म्हणती देख ॥१॥ पापपुण्य मावळलें । द्वैत सर्व दुरावलें २ हर्ष शोक नाहीं देहीं । संत जाणावे विदेही ॥३॥ एकाजनार्दनीं संत । जनालागीं कृपावंत ॥४॥

१६८५. वैष्णवां भूषण मुद्रांचे शृंगार । तुळशी परिकर वाहती कंठीं ॥१ तयांचिया पायीं माझा दंडवत । सदा जे जपत नाम मुखीं ॥२॥ आसनीं शयनीं भोजनीं नित्यता । स्मरती जे तत्त्वतां रामनाम ॥३॥ पुण्यपावन देह जन्माचें सार्थक । एकाजनार्दनीं कौतुक त्यांचें मज ॥४॥

१६८६. धन्य धन्य भूमंडळीं । वैष्णव बळी वीर गाढे ॥१॥ कळिकाळाचें न चले बळ । नामें सबळ वज्र कवची ॥२॥ विठ्ठल देव पाठीं उभा । तेथें लाभा काय उणें ॥३॥ एकाजनार्दनीं मुक्ती । तेथें दास्यत्व करिती ॥४॥

१६८७. पैल नामें गर्जती वीर । हरीचे डिंगर लाडके ॥१॥ धन्य धन्य ते वैष्णव । सदा नामस्मरणीं जीव ॥२॥ महाविष्णव निवृत्ती । नाम जपतां होय शांती ॥३॥ धन्य धन्य ज्ञानदेव । पातकी तारियेले जीव ॥४॥ धन्य सोपानदेव । ह्मणतां कळिकाळाचें नाहीं भेव ॥५॥ धन्य धन्य मुक्ताबाई । एकाजनार्दनीं वंदी पायीं ॥६॥

१६८८. जयाचिये द्वारीं तुळशीवृंदावन । धन्य तें सदन वैष्णवांचें ॥१॥ उत्तम चांडाळ अथवा सुशीळ । पावन सकळ वैकुंठीं होती ॥२॥ जयाचिया गळां तुळशीची माळा । यम पदकमळा वंदी त्याच्या ॥३॥ गोपीचंदन उटी जयाचिया अंगीं । प्रत्यक्ष देव जगीं तोचि धन्य ॥४॥ एकाजनार्दनीं तयाचा सांगात । जन्मोजन्मीं प्राप्त हो का मज ॥५॥

१६८९. बाळका देखोनी संकटीं । माता कार्य टाकुनी उठी ॥१॥ ऐसें दयेचे ठायीं जाण । आपुलें नाणावें पारिखेपण ॥२॥ महापुरीं बुडे तयातें । उडी घाली कृपाळु तेथें ३ दीनाचिये लाभीं । जो निघे जळतीये अंगीं ४ ऐसे दयेचे पाळी लळे । एकाजनार्दनीं चरणीं लोळे ५

१६९०. देह गेह चिंता । बाळासी नाठवे सर्वथा ॥१॥ न देखे तो दुजें स्थान । बाळका आपुले अंगीं जाण २ माझें तुझें न ह्मणे । उंच नीच कांहीं नेणे ३ एकाजनार्दनीं अखंड । नाहीं तया वांयां खंड ॥४॥

१६९१. आधीं घेईं निरपेक्षता । त्याचे चरण वंदीन माथां ॥१॥ निरपेक्ष जेथें घडे । यमकाळ पायीं जोडे ॥२॥ निरपेक्षाची आवडी । ब्रह्मज्ञान घाली उडी ॥३॥ निरपेक्षेवांचून । नाहींनाहीं रे साधन ॥४॥ एकाजनार्दनीं शरण । निरपेक्ष पाविजे ज्ञान ॥५॥

१६९२. हेंचि एक खरें । सदा वाचे नाम स्मरे ॥१॥ धन्य त्याची जननी । प्रसवली त्या लागोनी ॥२॥ हरुषें नाचे कीर्तनांत । प्रेम न खंडे शुद्ध चित्त ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । वंदीन तयाचे चरण ॥४॥

१६९३. सदा सर्वकाळ वाचे । नाम जया श्रीहरीचें ॥१॥ धन्य जन्मोनी संसारीं । सदा मनीं धरी हरी ॥२॥ रात्रंदिवस ध्यानीं मनीं । शरण एकाजनार्दनीं ॥३॥

१६९४. आसनीं भोजनीं शयनीं । जो चिंती रूप मनीं ॥१॥ जागृति स्वप्न आणि सुषुप्ति । सदा ध्याय रूप चित्तीं ॥२॥ नसे आणिके ठायीं मन । एका शरण जनार्दन ॥३॥

१६९५. जीवा शिवा एकपण । तुमच्या चरणांचें महिमान ॥१॥ गेलें अज्ञान हारपोनी । लाविलें तें आपुले ध्यानीं ॥२॥ कर्म धर्म पारुषले । अवघें जाहलें परब्रह्म ॥३॥ उगविली गोवागुंती । एकाजनार्दनीं प्रचीति ॥४॥

१६९६. छळितां न येती रागावरी । तदाकारीं वृत्ति मुराली ॥१॥ आपपर नाहीं जेथें । भेद तेथें नसेचि ॥२॥ याती असो भलते परी । एकसरी जयासी ॥३॥ एकाजनार्दनीं भाव । अवघिया ठाव एकचि ॥४॥

१६९७. देहींची वासना अद्वैत निमालें । साधन साधिलें तोचि धन्य ॥१॥ द्वैताचा भाव अद्वैताचा ठाव । आठवा स्वयमेव नेणे कांहीं ॥२॥ एकाजनार्दनीं अद्वैता वेगळा । राहिला निराळा सुखरूप ॥३॥

१६९८. सहज सहज ऐसा करितातीं गोष्टी । परि सहजाची भेटी विरळा जाणे ॥१॥ सहजाच्या आवडीं विद्या अविद्या तोडी । जाणीव नेणीवेची राहूं नेदी वेडी ॥२॥ जाणीवा जाणपण नेणिवा नेणपण । दोहींच्या विंदानें सहजाचें दर्शन ॥३॥ एकाजनार्दनीं जाणीव नेणीव । सहज चैतन्यासी देउनी ठेला खेव ॥४॥

१६९९. कार्यकर्ता आणि कारण । त्रिगुणेशीं त्रिपुटी शून्य ॥१॥ अंगीं आदळतां तिन्ही गुण । जया चित्तवृत्ति नोहे भिन्न ॥२॥ ऐसा त्रिगुणां वेगळा । एकाजनार्दनीं पाहे डोळां ॥३॥

१७००. जागापरी निजला दिसे । कर्म करी स्फुरण नसे ॥१॥ सकळ शरीराचा गोळा । होये आळसाचा मोदळा ॥२॥ संकल्पविकल्पाची ख्याति । उपजेचि ना सदा चित्तीं ॥३॥ यापरी जनीं असोनी वेगळा । एकाजनार्दनीं पाहे डोळां ॥४॥

१७०१. आपुलीच दारा जरीं टेके व्यभिचारा । क्रोधाचा थारा अंतरीं नये ॥१॥ आपुलेंच धन तस्करें नेतां जाण । जयाचें मन

उद्विग्न नव्हे ॥२॥ आपुलाची पुत्र वधोनी जाय शत्रु । परी मोहाचा पाझर नेत्रीं नये ॥३॥ आपुलें शरीर गांजितां परनरें । परी शांतीचें घर चळों नेदी ॥४॥ एकाजनार्दनीं जया पूर्ण बोधू । तोचि येक साधु जगामाजी ॥५॥

१७०२. असोनी संसारीं आपदा । वाचे वदे विठ्ठल सदा ॥१॥ नाहीं मानसीं तळमळ । सदा शांत गंगाजळ ॥२॥ असोनियां अकिंचन । जयाची वृत्ति समाधान ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसे थोडे । लक्षांमध्यें एक निवडे ॥४॥

१७०३. इहलोकीं बरा तो परलोकीं वंद्य । त्यासी भेदत्व निंद्य उरलें नाहीं ॥१॥ परस्त्री देखतां नपूंसक वागे । परधन पाहतां अंधापरी निघे ॥२॥ वाद वेवादा नोहे त्याची मती । हृदयीं भगवद्भक्ति सदा वाहे ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसे विरळे प्राणी । कोटीमाजी जनीं येक देखों ॥४॥

१७०४. विठ्ठलनाम वेती वाहाती टाळिया । ब्रह्मादिक येऊनियां वंदिती पायां ॥१॥ धन्य धन्य हरिभक्त जगीं । वहाताती टाळी नाचताती रंगीं ॥२॥ प्रेमभरित सदा करिती कीर्तन । एकाजनार्दनीं वंदूं तयांचे चरण ॥३॥

१७०५. न मानी सन्मानाचें कोडें । नाहीं चाड विषयाची १ ऐसे मज शरण येती । तयांचें उणें न पडे कल्पांतीं ॥२॥ नाहीं संसाराची चाड । नाहीं भीड कवणाची ॥३॥ एका त्याचा ह्मणवी दास । धरूनि आस जनार्दनीं ॥४॥

१७०६. देह पाहतां दोषाची दिठी । वृत्ती दिसे तैं स्वरूपीं मिठी ॥१॥ कैसेनी हरिदास भासती । देहीं असे तंव दोष दिसती ॥२॥ देह दिसतां न दिसे भावो । वृत्ती दिसे तंव समाधान पहा हो ॥३॥ एकाजनार्दनाच्या पायीं । वृत्ती दिसे तैं दोष नाहीं ॥४॥

१७०७. सदा वसे अंगीं शांती । चारी मुक्ती होती दासी ॥१॥ तेची सखे हरीचे दास । सदा सोंवळे उदास ॥२॥ कामक्रोधाची वार्ता । अंगीं नाहीं पैं सर्वथा ॥३॥ एकाजनार्दनीं निष्काम । सदा परिपूर्ण मंगळधाम ॥४॥

१७०८. मुक्तीची तों नाहीं चाड । ऐसे वाड हरिदास ॥१॥ मोक्षमुक्तींसी कोण पुसे । हें तों सरसें भांडवल ॥२॥ लक्ष्मीसहित देव नांदे । येरा विनोदें कायचाड ॥३॥ एकाजनार्दनीं दास्य करी । मुक्ति तेथें फुका वरी ॥४॥

१७०९. जयाचेनी चरणीं तीर्थां तीर्थपण । तो हृदयीं केला सांठवण ॥१॥ नवल महिमा हरिदासाची । तीर्थें उपजती त्यांचे कुशीं ॥२॥ काशीं मरणें होय मुक्ति। येथें वचनें न मरतां होये मुक्ती ॥३॥ एकाजनार्दनाचे भेटी । सकळ तीर्थें वोळंगती दिठीं ॥४॥

१७१०. आले आले हरीचे दास । मुखीं रामनाम घोष । तो-डोनियां भवपाश । जीवन्मुक्त ते ॥१॥ वैराग्याचें कवच अंगीं । नाचताती प्रेमरंगीं । ज्ञान शस्त्र ते निसंगीं । छेदिती संग ॥२॥ अनुभव तीक्ष्ण शर । सोडिताती निरंतर । वर्मीं खोचले ते वीर । क्रोधादि असुर ॥३॥ सांडोनि देहाभिमान । तेचि जीवन्मुक्त जाण । एकाजनार्दना शरण । रामकृष्ण जपताती ॥४॥

१७११. भाग्यवंत श्रीहरीचे दास । धरितां कास तारिती ॥१॥ धन्य त्यांचा उपकार । पावविले पार बहूत ॥२॥ वर्णितां त्यांचे उत्तम गुण । होय जन्माचें खंडन ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । धन्य धन्य तुमची वाणी ॥४॥

१७१२. धन जयासी मृत्तिका । जगीं तोचि साधु देखा ॥१॥ ज्यासी नाहीं लोभ आशा । तोचि प्रिय जगदीशा ॥२॥ निवारले क्रोधकाम । तोचि जाणा आत्माराम ॥३॥ एकाजनार्दन पाय धरी । भुक्ति मुक्ति नांदे घरीं ॥४॥

१७१३. साधु ह्मणावें तयासी । दया क्षमा ज्याच्या द ॥१॥ जयापाशीं नित्य शांति । संत जाणा आत्मस्थिती ॥ रिद्धिसिद्धी त्याच्या दासी । भुक्ति मुक्ति पायांपाशीं ॥३॥ ए जनार्दनीं साधु । जयापाशीं आत्म बोधु ॥४॥

१७१४. सर्वांभूतीं दया । साधु ह्मणावें ऐशिया ॥१॥ जग ब्रह्मरूप जाण । हेंचि साधूचें लक्षण ॥२॥ सर्वांभूतीं समदृष्टी । तोचि साधु इये सृष्टी ॥३॥ एकाजनार्दनीं संत । नित्य साधी आत्महित ॥४॥

१७१५. ज्याचे गेले कामक्रोध । तोचि साधु जगीं सिद्ध ॥१॥ लोभ मोह नाहीं ज्याशी । तोचि साधु निश्चयेंसी ॥२॥ गेले मद आणि मत्सर । साधु तोचि निर्विकार ॥३॥ एकाजनार्दनीं साधु । त्याचे चरण नित्य वंदू ॥४॥

१७१६. समुद्रवलयांकित तीर्थ । स्नानें करती जे पवित्र । परी तेथें नसतां भाव । निर्फळ वाव होतसे ॥१॥ ऐसा निर्णय शास्त्रीं । पुराणीं सांगतसे व्यक्ती । तेंचि उघड सर्वांप्रती । सांगतसें परियेसा ॥२॥ जे शुचिर्भूत शुद्धमती । ईश्वर मानिती सर्वांभूतीं । ते सर्वदा वसती तीर्थीं । तीर्थें वसती त्यांच्यासंगें ॥३॥ तीर्थीं नसतां तीर्थवास । सत्यनिष्ठा नित्य निर्दोष । तीर्थीं वसतां पुण्यलेश । न पावे तीर्थ निंदितां ॥४॥ मत्सर निष्ठुर भूतद्वेष । भजनमार्गींचा उपहास । तीर्थें घेती त्यांचा त्रास । कीटक द्वेष त्या करिती ॥५॥ कामक्रोध लोभ माया । स्पर्श न करी जयाची काया । तो तीर्थवासी जाणे राया । तीर्थें पायां वंदिती ॥६॥ विष्णुस्मरण शिवस्मरण । नित्य वसत्री ज्याचें वदन । तोचि तीर्थवासी जाण । तीर्थें चरण वंदिती ॥७॥ इंद्रिय नियमाचें आसनीं । नित्य माधुर्य बोलली वाणी । अहंकार ज्याचिये ज्ञानीं । संतचरणा सर्वथा ॥८॥ तो सकळ शिष्टांचा धात्रा । तीर्थें करिती त्याची यात्रा । पादोदकालागीं पवित्रा । तीर्थें माथां वोढविती ॥९॥ तीर्थीं असोनी इच्छारहित । प्रतिग्रहा न वोडवी हात । यथालाभें संतोषत । तो तीर्थरूप जाणावा ॥१०॥ परधनीं अंधत्व जयाचे नयना । परस्त्री पाहतां क्लीबत्व जयाचे मना । परापवादीं मूकत्व जयाचे वदना । तो जनक जाणा तीर्थांचा ॥११॥ मनें इंद्रियांनिग्रह करी । तो गृहीं असतां जान्हवीतीरीं । तीर्थीं असो अनाचारी । तो कीटकवासी जाणावा १२ सत्यशील दृढव्रती । आत्मभावना सर्वांभूतीं । क्रोधकंटका नातळे चित्तीं । तो सर्व तीर्थीं सेविजे १३ शुद्धशीळ विद्यातीर्थीं । साधु सुस्नात सत्यतीर्थीं । कुलांगना लज्जातीर्थीं । पवित्र होती जाण पां १४ धनाढ्य निर्दोष दानतीर्थीं । पापी निःपाप गंगातीर्थीं । क्षत्रिय राजे धारातीर्थीं । प्रक्षाळिती अघातें ॥१५॥ योगी आत्मध्यान तीर्थीं ।

आत्मस्वरूप स्वयें होती । श्रवणादिक नवही तीर्थी । भक्त होती हरिरूप ॥१६॥ असो या निरोपणाच्या युक्ति । जाणते अथवा हो नेणती । शरीर प्रक्षालितां तीर्थं । मोक्षप्राप्ति निर्धारें ॥१७॥ ऋषीश्वरीं वेदवचनीं । महा फलें कल्पी यज्ञीं । तीं यज्ञफळें तीर्थस्नानीं । वेदवाणी अनुवादे ॥१८॥ शरण एकाजनार्दनीं । सकळ तीर्थें नामस्मरणीं । घडती संतसंघटनीं । येथें संशय नाहीं ॥१९॥

१७१७. ऐसे ह्मणशील कोण । ज्यांचें गातां नामाभिधान । देवाधि देव आपण । स्वमुखें सांगे उद्धवा ॥१॥ नारद पराशर पुंडरीक । व्यास शुक वाल्मिकादिक । ध्रुव उपमन्यु भीष्मादिक । वंद्य जाण उद्धवा ॥२॥ वसिष्ठ वामदेव विश्वामित्र । अत्रि दत्तात्रेय पवित्र । ऐसे पुण्यश्लोक सर्वत्र । ते तुज वंद्य उद्धवा ॥३॥ रघुदिलीप हरिश्चंद्र । शिभ्रीराज बली थोर । जयाचा अंकित मी निर्धार । हें तूं जाणें उद्धवा ॥४॥ पांडव माझे पंचप्राण । कायावाचा वेंचिलें मन । मज निर्धारितां पूर्ण । जीव वेंचिला उद्धवा ॥५॥ निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान । मुक्ताबाई ज्ञानकळा आपण । इहीं अवतार धरून । जग तारिलें उद्धवा ॥६॥ गोरा सांवता जगमिल । चोखा रोहिदास कबीर । हे माझे प्राणमित्र । आहेत जाण उद्धवा ॥७॥ दामा नामा जनाबाई । राजाई आणि गोणाई । येशि आणी साकराई । जिवलग माझे उद्धवा ॥८॥ कान्हुपात्रा जन जसवंत । हनुमंतादि समस्त । पाठक कान्हा आनंदभरित । तयाचेनी उद्धवा ॥९॥ परसा भागवत सूरदास । वत्सरा आणि कूर्मदास । एकाजनार्दनीं निजदास । संतांचा मी उद्धवा ॥१०॥

१७१८. स्मरतां निवृत्ति पावलों विश्रांती । संसाराची शांती जाली माझ्या ॥१॥ नमितां ज्ञानदेवा पावलों विसांवा । अंतरींचा हेवा विसरलों ॥२॥ सुखाचा निधान तो माझा सोपान । विश्रांतीचें स्थान मुक्ताबाई ॥३॥ चांगदेव माझा आनंदाचा ठाव । सुखाचा सागर वटेश्वर ॥४॥ सुखाचा सागर विसोबा खेचर । नरहरि सोनार प्राण माझा ॥५॥ आठवितां नामा पावलों विश्रामा । मोक्षमार्गीं आह्मां वाट जाली ॥६॥ परसा भागवत जीवा आवडता ।

गोरा आणि सांवता सखे माझे ॥७॥ जनजसवंत सूरदास संत । नित्य प्रणिपात वैष्णवांसी ॥८॥ वंदूं भानुदास वैष्णवांचे कुळीं । ज्यासी वनमाळी मागें पुढें ॥९॥ बाळपणीं जेणें भानु आराधिला । वंश निवारिला देवराया ॥१०॥ धन्य त्याचा वंश धन्य त्याचें कुळ । परब्रह्म केवळ त्याचे वंशीं ॥११॥ एकाजनार्दनीं संतांचें स्तवन । जनीं जनार्दन नमीयेला ॥१२॥

१७१९. निवृत्ति शोभे मुगुटाकार । ज्ञान सोपान वटेश्वर ॥१॥ विठू पंढरीचे राणे । त्याले भक्तांचीं भूषणें ॥२॥ खेचर विसा जगमित्र नागा । कुंडलें जोडा विठोबा जोगा ॥३॥ बाहु शोभे बाहुवट । गोरा सांवता दिग्पाट ॥४॥ कंठीं जाणा येकविंद । तो हा जोगा परमानंद ॥५॥ गळां शोभे वैजयंती । तीरी मुक्ताई ह्मणती ॥६॥ अखंड शोभे माझ्या बापा । पदकीं शोभे नामा शिंपा ॥७॥ कटी सूत्र कटावरी । तो हा सोनार नरहरि ॥८॥ कांसे कसिला पीतांबर । तो हा जाणावा कबीर ॥९॥ जानु जघन सरळ । तेहि कान्हूपात्रा विशाळ ॥१०॥ दंतपंक्तीचा झळाळ । तो हा कान्हया रसाळ ॥११॥ चरणींच्या क्षुद्र घंटा । नामयाचा नारा विठा १२ वाम चरणीं तोडर । परसा रुळतो किंकर ॥१३॥ चरणीं वीट निर्मळ । तो हा जाला चोखामेळ १४ चरणातळील ऊर्ध्वरेखा । जाला जनार्दन एका १५

१७२०. आला आषाढीपर्वकाळ । भक्त मिळाले सकळ ॥१॥ निवृत्तिनाथ ज्ञानदेव । मुक्ताबाई सोपानदेव ॥२॥ चांगदेव विसोबा खेचर । सांवता माळी गोरा कुंभार ॥३॥ रोहिदास कबीर सुरदास । नरहरी आणि भानुदास ॥४॥ नामदेव नाचे कीर्तनीं । एका शरण जनार्दनीं ॥५॥

१७२१. ऐशी शांति ज्यासी आहे । त्याचे घरीं देव राहे ॥१॥ हा अनुभव मनीं । पहा प्रत्यक्ष पुराणीं ॥२॥ धर्माघरीं बसे । अर्जुनाचे रथीं बैसे ॥३॥ अंकित दासाचा होय । एकाजनार्दनीं देव ॥४॥

१७२२. देहीं असोनी विदेही । चाले बोले सदा पाही ॥१॥ असे अखंड समाधी । नसे कांहीं आधिव्याधी ॥२॥ उपाधीचे तोडोनी लाग । देहीं देहपणें भरिलें जग ॥३॥ एकाजनार्दनीं संग । सदा समाधान सर्वांग ॥४॥

१७२३. कामक्रोध नाहीं अंगीं । तोचि नर जन्मला जगीं ॥१॥ तयाचें होतां दरुशन । तुटे देहाचें बंधन ॥२॥ अरुणोदयीं जाण । तम निरसे सहज आपण ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । नोहे एकपणावांचून ॥४॥

१७२४. तुह्मीं कृपा केलियावरी । पात्र होईन निर्धारीं ॥१॥ आतां नका धरूं दुजें । मीतूंपणाचें उतरा वोझें ॥२॥ एकाजनार्दनीं शरण । जीवींची निजखूण त्या द्यावी ॥३॥

१७२५. संकल्पाचा आन ठाव । नाहीं भाव दुसरा ॥१॥ तुमच्या चरणांसी शरण । कायावाचा आणि मन ॥२॥ आलों दीन होउनी हीन । तुह्मी तंव पतितपावन ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । करा खंडन जन्ममृत्यु ॥४॥

१७२६. जें जें बोले तैसा चाले । तोचि वाहिलें निवांत ॥१॥ अंगीं असोनी जाणपण । सदा सर्वदा तो लीन ॥२॥ निंदा अथवा वंदा । नाहीं विषम ती बाधा ॥३॥ शांतीची मांदूस । भरला असे सदोदित ॥४॥ एकाजनार्दनीं धन्य । त्याचें दरुशन जगमान्य ॥५॥

१७२७. वेधलें ज्याचें मन सदा नामस्मरणीं । रामनाम ध्वनी मुखीं सदा ॥१॥ प्रपंच परमार्थ त्यासी पैं सारखा । अद्वैतीं तों देखा भेद नाहीं ॥२॥ एकाजनार्दनीं एकरूप भाव । नाहीं भेदा ठाव तये ठायीं ॥३॥

१७२८. पवित्र तो देह सदा ज्याचा नेम । वाचे गाय राम सर्वभावें ॥१॥ धन्य तो भाग्याचा तरला संसार । परमार्थाचें घर नाम मुखीं ॥२॥ करितसे कथा कीर्तन आवडीं । ब्रह्मज्ञान जोडी तया लाभे ॥३॥ एकाजनार्दनीं धन्य तें शरीर । परमार्थ संसार एकरूप ॥४॥

१७२९. सर्वकाळ सुख रामनामीं आहे । ऐसा ज्याचा देह धन्य तोचि ॥१॥ जागृतीं सुषुप्तीं रामनाम ध्यान । कार्य आणि कारण रामनामें ॥२॥ एकाजनार्दनीं ध्यानीं आणि मनीं । श्रीरामावांचुनी आन नेणे ॥३॥

१७३०. सुखरूप धन्य जाणावा संसारीं । सदा वाचे हरी उच्चारी जो ॥१॥ रामकृष्णनाम वदे वेळोवेळां । हृदयीं कळवळा संत भेटी ॥२॥ एकाजनार्दनीं प्रेमाचा कल्लोळ । भुक्तिमुक्ति सकळ वसे देव ॥३॥

१७३१. तुमचें कृपेचें पोसणें । त्याचें धांवणें करा तुह्मी ॥१॥ गुंतलोंसे मायाजाळीं । बुडतों जळीं भवाच्या ॥२॥ कामक्रोध हे

मगर । वोढिताती निरंतर ॥३॥ आशा तृष्णा या सुसरी । वोढि-
ताती या संसारीं ॥४॥ ह्मणोनी येतों काकुळती । एकाजनार्दनीं विनंती ५

१७३२. आवडे देवासी तो ऐका प्रकार । नामाचा उच्चार रात्रं-
दिन ॥१॥ तुळसीमाळ गळां गोपीचंदन टिळा । हृदयीं कळवळा
वैष्णवांचा ॥२॥ आषाढी कार्तिकी पंढरीची वारी । साधन निर्धारीं
आन नाहीं ३ एकाजनार्दनीं ऐसा ज्याचा नेम । तो देवा परमपूज्य जगीं ४

१७३३. पायांसी घालीन मिठी । दाटेन कंठीं सद्गद ॥१॥ वाहेन
टाळी नाचेन रंगीं । दुजें संगीं नका कांहीं ॥२॥ पायवणी वंदीन माथां
निवारेल चिंता मग सर्व ३ एकाजनार्दनीं दान । द्यावें दोष गुण न पहा ४

१७३४. ऐसी प्राप्ति कैं लाहीन । संत संगतीं राहीन । त्यांचे
संगती मी ध्याईन । नाम गाईन अहर्निशीं ॥१॥ भावें धरलिया
संतसंग । सकळ संगा होय भंग । नाभ्यासितां आगळे योग । पळे
भवरोग आपभयें ॥२॥ सेविलिया संतचरणतीर्था । तीर्थें पायवणी
वोढविती माथां । सुरनर असुर वंदिती तत्त्वतां । ब्रह्म सायुज्यता
घर रिघे ॥३॥ संतचरणरज मस्तकीं पडे । देह संदेह समूळ उडे ।
उघडलीं मुक्तिचीं कवाडें । कोंदाटे पुढें परब्रह्म ॥४॥ दृढ धर-
लिया सत्संगति । अलभ्य लाभ आतुडे हातीं । चारी पुरुषार्थ
चारी मुक्ति । पायां लागती निजदास्य ॥५॥ जैं कृपा करिती संत-
जन । जन विजन होय जनार्दन । एकाजनार्दनीं शरण । ब्रह्म
परिपूर्ण तो लाहे ॥६॥

१७३५. गोल्हाट उल्हाट कासया आटाआटी । घेतां संत भेटी
पुरे हेंचि ॥१॥ गुद ते पीडन नागिणी दमन । संत दरुशन घडतां
जोडे ॥२॥ ओहं सोहं यातायाती कोहं जाण । टाकूनि संतचरण
धरा आधीं ३ एकाजनार्दनीं मानावा विश्वास । होय देवदास आपोआप ४

१७३६. वाउगाचि सोस न करीं सायास । भजें श्रीसंतांस
एकाभावें ॥१॥ जाणोनि नेणता कां होसी रे मूर्ख । सुखाचें निज-
सुख विटेवरी ॥२॥ एकाजनार्दनीं धरूनि विश्वास । होईं कारे
दास संतचरणीं ॥३॥

१७३७. बकाचिये परी ध्यान नको धरूं । जीवेंभावें धरूं

संतचरण ॥१॥ मग ते तात्काळ करती पावन । ऐसें अनुमोदन आहे शास्त्रीं ॥२॥ ध्यानाचें ध्यान संतांचे चरण । कायावाचा मन दृढ ठेवी ॥३॥ वाच्य तें वाचक संत ते व्यापक । एकाजनार्दनीं देख अंतर्यामीं ॥४॥

१७३८. तापलीया तापत्रयें संतां शरण जावें । जीवेंभावें धरावे चरण त्यांचें ॥१॥ करूनि विनवणी वंदूं पायवणी । घालूं लोटांगणीं मस्तक हें ॥२॥ उपासनामार्ग सांगती ते खूण । देती मंत्र निर्वाण विठ्ठल हरी ॥३॥ एकाजनार्दनीं संतांसी शरण । रात्र आणि दिन चिंतूं त्यांसी ॥४॥

१७३९. मनुष्यदेहें हित होय । शरण तूं जाय श्रीसंतां ॥१॥ काय महिमा कीर्ति जगीं । नाहीं सामर्थ्य दुजिया अंगीं ॥२॥ एकाजनार्दनीं संत । उदार पतित तारिती ॥३॥

१७४०. समदृष्टीसमान । म्हणों नये थोर सान । ऐसें उपदेशी ज्ञान । आपणाही गोष्टी ॥१॥ कायावाचा मनें भावें । संतांशीं शरण जावें । सांगती ते जीवेंभावें । अंतरींची गोष्टी ॥२॥ पूर्ण बुद्धीचाची रांवो । पापपुण्या नाहीं ठावो । साधुसंतांसी भजावो । मुख्यही गोष्टी ॥३॥ ऐशिया संतांसीं जाण । शरण एकाजनार्दन । घालीतसे लोटांगण । मुख्य ही गोष्टी ॥४॥

१७४१. वैष्णवा घरीं देव सुखावला । बाहीर नवजे दवडोनी घातिला ॥१॥ देव म्हणे माझें पुरतसे कोड । संगती गोड या वैष्णवांची ॥२॥ जरी देव नेउनी घातिला दुरी । परतोनी पाहें तंव घरा भीतरीं ॥३॥ कीर्तनाची देवा आवडी मोठी । एकाजनार्दनीं पडली मिठी ॥४॥

१७४२. सकळ तीर्थें उत्तम । घडती करितां नामस्मरण । देवाधि देव उत्तम । तोही धांवे सामोरा ॥१॥ पाहाहो वैष्णवांचे घरीं । सकळ तीर्थें कामारी । रिद्धीसिद्धी मोक्ष चारी । दास्यत्व करिती सर्वदा ॥२॥ शरण एकाजनार्दनीं । तीर्थांचा तो अधिष्ठानी । नामस्मरण अनुदिनीं । तया तीर्थें वंदिती ॥३॥

१७४३. भुक्ति मुक्तीचें सांकडें नाहीं विष्णुदासां । प्रपंचाची आशा मा तेथें कैंची ॥१॥ वैकुंठ कैलास अमरपदें तिन्हीं । तुच्छ-

वत् मनीं मानिताती ॥२॥ राज्य भोग संतती संपत्ति धन मान। विष्ठे ते समान श्वानसूकर ॥३॥ मा ब्रह्मज्ञाना तेथें कोण पुसे तत्त्वतां। घर रिघोनी सायुज्यता येत असे ॥४॥ एकाजनार्दनीं नामाची प्रौढी। रिद्धिसिद्धी दडी घरीं देती ॥५॥

१७४४. वारंवार जन्म घेऊं। परी पाहूं पंढरपूर ॥१॥ दुजें मागणें नाहीं देवा। करूं सेवा वैष्णवांची ॥२॥ न मागों भुक्ति आणि मुक्ति। ती फजिती कोण सोसी ॥३॥ एकाजनार्दनीं मागें। कीर्तन रंगीं रंगला वेगें ॥४॥

१७४५. भय नाहीं हरीच्या दासां। शुभ काळ सर्व दिशा ॥१॥ नाहीं तयां गोंवागुंती। न लगे पुराण व्युत्पत्ती ॥२॥ नाहीं शास्त्रांचें कारण। वेदाभ्यासाचें नको मनन ॥३॥ एकाजनार्दनीं शरण। परंपरा हेचि पूर्ण ॥४॥

१७४६. कळिकाळाचें न चले बळ। ऐसे सबळ हरिदास ॥१॥ सेवेचें तों कवच अंगीं। धीर प्रसंगीं कामक्रोधा ॥२॥ रामनाम हाचि बाण। शस्त्र निर्वाण सांगाती ॥३॥ एकाजनार्दनीं यमाचे भार। देखतां समोर पळती ते ॥४॥

१७४७. दास होईन मी कामारी दासीचा। परि छंद सायासाचा नाहीं मनीं ॥१॥ गाईन तुमचें नाम संतांचा सांगात। यापरती मात दुजी नाहीं ॥२॥ निर्लज्ज कीर्तनीं नाचेन मी देवा। एकाजनार्दनीं भावा पालट नको ॥३॥

१७४८. पंढरीये देव आला। संतभारें तो वेष्टिला ॥१॥ गुळासवें गोडी जैसी। देवासंगें दाटी तैसी ॥२॥ झालें दोघां एकचित्त। म्हणोनी उभाचि तिष्ठत ३ एकाजनार्दनीं भाव। संतांपायीं ठेविला जीव ४

१७४९. जाईल तरी जावो प्राण। परी न सोडा चरण संतांचे ॥१॥ होणार तें हो कां सुखें। परी मुखें रामनाम न सोडा २ कर्मधर्म होतु कां हानी। परी प्रेमकीर्तनीं न सोडा ॥३॥ एकाजनार्दनीं वर्म। सोपा धर्म सर्वांसी ॥४॥

१७५०. परमार्थाचा हाचि भाव। वाचे देव स्मरावा ॥१॥ नाहीं दुजा छंद मनीं। संत चरणीं विश्वास ॥२॥ न धांवे कोठें वांयां मन। संतचरणावांचुनी ॥३॥ एकाजनार्दनीं नेम। सर्वोत्तम हृदयीं वसे ४

१८७०. बहुत दाविती खुणा । आमुच्या नये त्या मना । आजी आला पाहुणा । गुरुराव ॥१॥ सांगे बोधाचिया गोष्टी । म्हणे कां रे होतां कष्टी । या संसाराची तुटी । करा करा लवलाहें ॥२॥ कां रे होतां उगेच उदास । आशा मोह तोडा पाश । कां रे कासाविस । होतां वाउगे परदेशीं ॥३॥ धरा धरा मंत्रमुखीं । जेणें शिवादिक जाहले सुखी । तुमचें तुम्हां न कळे शेखीं । वाउगे कां शिणतां ॥४॥ अरे नको येरझारा । चुकवा जन्ममरण सारा । एकाजनार्दनीं म्हणे धरा । विश्वास संतवचनीं ॥५॥

१८७१. ऐसे जे धाले पूर्ण निमाले । ते नाहीं आले परतोनियां ॥१॥ घडीनें घडी चढतसे गोडी । अखंड आवडी संतपायीं ॥२॥ सांडोनियां काम स्मरें रामनाम । अंतरीं तें प्रेम धरूनियां ॥३॥ एकाजनार्दनीं रंगले नामीं । तया वंदू आम्ही सर्वभावें ॥४॥

१८७२. चंचळत्व मनाचें मोडे । दृष्टीचें स्थिरत्व जोडे । सहज समाधी घडे । सरी कृपेनें पाहे पां ॥१॥ पवन पवनाची आटणी । आसनीं दृढ दृष्टी ठेउनी । गोल्हाट भेदोनी । त्रिकुटाचल मस्तकीं ॥२॥ निरालंबीं विश्रांति । पूर्ण एकाजनार्दन स्थिति । अखंड भोगिताती । जनार्दन कृपें ॥३॥

१८७३. गोडी वेगळा ऊंस वाढे । हें तों न जोडे कल्पांतीं ॥१॥ जों जों वाढे तों तों गोड । ऐशी चाड भावाची ॥२॥ जों जों धरशील भाव । तों तों देव दिसे पुढें ॥३॥ ही तों प्रचीति घ्या अंगीं । नाचा रंगीं संतांच्या ॥४॥ रूपावेगळी ती छाया । एकाजनार्दनीं लागे पायां ॥५॥

## गुरुपरंपरा.

१८७४. ध्यानीं बैसोनी शंकर । जपे रामनाम सार ॥१॥ पार्वती पुसे आवडी । काय जपतां तांतडी ॥२॥ मंत्र तो मज सांगा । ऐशी बोलतसे दुर्गा ॥३॥ एकांती नेऊन । उपदेशी राम अभिधान ॥४॥ तेंचि मच्छिंद्रा लाधलें । पुढें परंपरा चालिलें ॥५॥ तोचि बोध जनार्दनीं । एका लागतसे चरणीं ॥६॥

१८७५. वंदुनी श्रीगुरुचरण । संतमहिमा वर्णू ध्यान ॥१॥ आदिनाथगुरु । तया पासोनी विस्तारु ॥२॥ आदिनाथें उपदेश। केला मत्स्येंद्रा तो शिष्य ॥३॥ मत्स्येंद्र तो बोळला । गोरक्षासी बोध केला ॥४॥ गोरक्ष अनुग्रहित । गहिनी सांप्रदाययुक्त ॥५॥ गहिनी दातारें । निवृत्ति बोधिलासे त्वरें ॥६॥ निवृत्ति प्रसाद । ज्ञानदेवा दिला बोध ७ ज्ञानदेव कृपें करून । शरण एकाजनार्दन ८

१८७६. सांबें बोधियेला कृपावंत विष्णु । परब्रह्म पूर्ण सांब माझा ॥१॥ सांब उपदेशी उमा मछिंद्रासी । ब्रह्मरूप त्यासी केलें तेणें २ मछिंद्रापासुनी चौरंगी गोरक्ष । एकाजनार्दनीं अलक्ष दाखविलें ३

१८७७. गोरक्षनाथें उपदेश केला। ब्रह्मरूप झाला गहिनीनाथा ॥१॥ गहिनीनें निवृत्तीनाथासी । उपदेश त्यासी आत्मबोध ॥२॥ निवृत्तिनाथानें ज्ञानदेवा पाहीं । एकाजनार्दनीं तेंही बोधियेलें ॥३॥

१८७८. मछिंद्रानें मंत्र गोरक्षासी दिला । गोरक्ष बोळला गहिनीराजा ॥१॥ गहिनीनें खूण निवृत्ति दिधली । पूर्ण कृपा केली ज्ञानराजा ॥२॥ ज्ञानदेवें बोध जगासी पैं केला । एकाजनार्दनीं धाला पूर्ण बोधें ॥३॥

१८७९. ज्ञानदेवें उपदेश करूनियां पाहीं । सोपान मुक्ताई बोधियेली ॥१॥ मुक्ताईनें बोध खेचरासी केला । तेणें नामियाला बोधियेलें ॥२॥ नाम्याचें कुटुंब चांगा वटेश्वर । एकाजनार्दनीं विस्तार मुक्ताईचा ॥३॥

१८८०. ज्ञानराजें बोध केला सत्यबळा । रेडा बोलाविला प्रतिष्ठानीं ॥१॥ भोजलिंग ज्याची समाधी आळंदी । ज्ञानराज बोधी तिघाजणां ॥२॥ सत्यबळें बोध गैबीराया केला । स्वयें ब्रह्म झाला सिद्धरूप ३ एकाजनार्दनीं ऐसी परंपरा । दाविलें निर्धारा कथूनियां ४

---

१८८१. परेचें जें सुख पश्यंती भोगी । तोचि राजयोगी मुगुटमणी ॥१॥ सिद्धाची ही खूण साधक सुख जाण । सद्गुरूसी शरण रिघोनियां ॥२॥ वैखरी व्यापारी मध्यमेच्या घरीं । ओंकाराच्या शिरीं वृत्ती ठेवी ॥३॥ आदिनाथ ठेवणें, सिद्ध परंपरा । जनार्दनीं वेव्हारा एकनाथी ॥४॥

१८८२. आदि गुरु शंकर ब्रह्मज्ञान खूण। बाणली पैं पूर्ण मत्स्येंद्र नाथीं ॥१॥ मत्स्येंद्र बोळला गोरक्ष बोधिला। ब्रह्मज्ञान त्याला कथियेलें ॥२॥ गोरक्ष संपूर्ण निवेदिलें गहिनी। तेणें निवृत्ति लागुनी उपदेशिलें ॥३॥ निवृत्तिनाथें ज्ञानदेवासी दिधलें। परंपरा आलें ऐशापरी ॥४॥ एकाजनार्दनीं तयाचा मी दास। उच्छिष्ट कवळास भक्षीतसें ॥५॥

१८८३. जो निर्गुण निराभास। जेथून उद्भव शबल ब्रह्मास। आदिनारायण ह्मणती ज्यास। तो सर्वांस आदिगुरु ॥१॥ तयाचा ब्रह्मा अनुग्रहीत। ब्रह्मा अत्रीस उपदेशीत। अत्री पाद प्रसादीत। श्रीअवधूत दत्तात्रय ॥२॥ दत्तात्रय परंपरा। सहस्रार्जुन यदु दुसरा। जनार्दन शिष्य तिसरा। केला खरा कलियुगीं ॥३॥ जनार्दन। कृपेस्तव जाण। समूळ निरसलें भवबंधन। एकाजनार्दना शरण। झाली संपूर्ण परंपरा ॥४॥

१८८४. करी जो सृष्टीचें रचन। तया न कळे ब्रह्मज्ञान। तो श्रीनारायणा। शरण रिघे ॥१॥ न कळे न कळे ब्रह्मज्ञान। म्हणोनी धरितसे चरण। नारायण परिपूर्ण। उपदेशी ब्रम्हा ॥२॥ ब्रह्मा अत्रीतें सांगत। ब्रह्मज्ञान हृदयीं भरित। अशी पूर्ण कृपेस्थित। दत्तात्रया सांगतसें ॥३॥ दत्तात्रय कृपें पूर्ण। जनार्दनीं पूर्णज्ञान। जगन्वि संपूर्ण। एकरूप तयांसी ॥४॥ एकाजनार्दनीं पूर्ण। ब्रम्हज्ञानाची खूण। बोधोनियां संपूर्ण। मेळविलें आपणीया ॥५॥

---

## चिंतनमहिमा.

१८८५. चिंतनें नासतसे चिंता। चिंतनें सर्व कार्य हो होतां। चिंतनें मोक्ष सायुज्यता। घर शोधितसे ॥१॥ ऐसें चिंतनाचें महिमान। तारिले अधम खळ जन। चिंतनें समाधान। प्राणीमात्रा होतसे ॥२॥ चिंतनें तुटे आधिव्याधी। चिंतनें तुटतसे उपाधि। चिंतनें होय सर्व सिद्धी। एकाजनार्दनाचे चरणीं ॥३॥

१८८६. चिंतनें कंसासुर तरला। चिंतनें पूतनेचा उद्धार केला। चिंतनें आनंद जाहला। अर्जुनादिकांसी ॥१॥ म्हणोनि करावें

चिंतन । कायावाचा आणि मन । संतांचे चरण । नित्य काळ चिंतावे ॥२॥ चिंतन आसनीं शयनीं । भोजनीं आणि गमनागमनीं । सर्वकाळ निजध्यानीं । चिंतन रामकृष्णाचें ॥३॥ चिंतन हेंचि तप थोर । चिंतनें साधे सर्व संसार । एकाजनार्दनीं निर्धार । नामस्मरण चिंतनीं ॥४॥

१८८७. हरे भवभय व्यथा चिंतनें । दूर पळती नानाविघ्नें । कलीकल्मष बंधनें । न बाधती चिंतनें ॥१॥ करा करा म्हणोनि लाहो । चिंतनाचा निर्वाहो । काळाचा तो बिहो । दूर पळे चिंतनें ॥२॥ हीच माझी विनवणी । चिंतन करा रात्रंदिनीं । शरण एकाजनार्दनीं । रामनाम चिंतावें ॥३॥

१८८८. चिंतन तें सोपें जगीं । रामकृष्ण म्हणा सत्संगीं । उणें पडों नेदी व्यंगीं । देव धांवे चिंतनें ॥१॥ चिंतन करितां द्रौपदी । पावलासे भलते संधीं । ऋषीश्वरांची मांदी । तृप्त केली क्षणमात्रें ॥२॥ चिंतनें रक्षिलें अर्जुना । लागों नेदी शक्तिबाणा । होउनी अंकणा । रथारूढ बैसला ॥३॥ चिंतनें प्रल्हाद तारिला । जळीं स्थळीं सांभाळिला । एकाजनार्दनीं भला । चिंतनाचा अंकित ॥४॥

१८८९. चिंतनें बळीद्वारीं बंधन । चिंतनें होय समाधान । न म्हणे उच्छिष्ट अथवा पूर्ण । चिंतनेंचि मुख पसरी ॥१॥ चिंतनें भोळे भाविक जन । तयांचें वारी नाना विघ्न । धर्माघरीं उच्छिष्ट जाण । चिंतनासाठीं काढीतसे ॥२॥ चिंतनासाठीं सारथी जाहला । चिंतनासाठीं उभा ठेला । चिंतनेंचि गोंविला । पुंडलिकें अद्यापि ॥३॥ चिंतनें उभा विटेवरी । न बैसे अद्यापि वरी । एकाजनार्दनीं निर्धारीं । चिंतन सोपें सर्वांत ॥४॥

१८९०. चिंतनें धांवे भक्तांपाठीं । धरी कांबळी हातीं काठी । चिंतनें उठाउठीं । बांधवितो आपणिया ॥१॥ ऐसा भुकेला चिंतनाचा । न पाहे यातीहीन उंचाचा । काय अधिकार शबरीचा । फळें काय प्रिय तीं ॥२॥ एकाजनार्दनीं चिंतन । तेणें जोडे नारायण । आणिक न लगे साधन । कलीमाजी सर्वथा ॥३॥

१८९१. चिंतनें गणिका निजपदा । चिंतनें अजामेळ तोही सदा । बैसविला आपुले पदा । चिंतनेंचि सर्वथा ॥१॥ चिंतनें उद्धरी सर्वत्रा । न म्हणे यातिकुळ कुपात्रा । चिंतनें तारी सर्वत्रा । प्राणीमात्रा जगासी ॥२॥ पुराणें डांगोरा पिटिती । चिंतनें उद्धार सर्व गती । न लगे नेम नानायुक्ती । नाम चिंता श्रीरामाचें ॥३॥ येवढें चिंतनाचें बळ । एकाजनार्दनीं कृपाळ । यम काळ वंदी सकळ । नाम चिंतनीं सर्वदा ॥४॥

१८९२. चिंतनासी न लगे वेळ । कांहीं न लगे तया मोल । वाचे वदा सर्वकाळ । राम हरी गोविंद ॥१॥ हाचि पुरे मंत्र सोपा । तेणें चुके जन्म खेपा । आणिक तें पापा । कधीं नुरे कल्पांतीं ॥२॥ चौऱ्यांशींची नये फेरी । येवढी चिंतनाचीही थोरी । सांडोनि वेरझारी । कां रे शिणतां बापुडीं ॥३॥ एकाजनार्दनीं चिंतन । वाचे वदा परिपूर्ण । तेणें घडे कोटी यज्ञ । नाम चिंतन जपतां ॥४॥

१८९३. चिंतनीं केला उद्धार । चिंतनें तरले नारीनर । पशुपक्ष्यादी साचार । चिंतनेंचि तारिले ॥१॥ येवढी चिंतनाची थोरी । महा पापा होय बोहरी । यातीकुळाची वारी । कोण पुसे थोरिवा ॥२॥ भुक्तिमुक्तींचें सांकडें । तयां न पडेचि बापुडें । चिंतनेंचि कोडें । सर्व हरे तयांचें ॥३॥ एकाजनार्दनीं मन । दृढ ठेवावें बांधून । चिंतनेंचि जाण । सर्व लाभ घडती ॥४॥

१८९४. चिंतनें पर्वकाळ रासी । येती अपैशा घरासी । चिंतन तें सार सर्वांसी । व्रतांतपांसी चिंतन ॥१॥ चिंतनें यज्ञदान धर्म । चिंतनें घडे नाना नेम । आणीक तें वर्म । चिंतन घडे सर्वथा ॥२॥ चिंतनें वेदशास्त्र पुराण । नाना मंत्र तंत्र पठन । नाना तीर्थांसी भ्रमण । चिंतनें होय ठायींच ॥३॥ ऐसा चिंतनमहिमा । नाहीं आणीक उपमा । एकाजनार्दनीं प्रेमा । चिंतनें चिंतितां ॥४॥

१८९५. चिंतनें उद्धरला पापी । महा दोषी केला निःपापी । तया म्हणती ऋषि तपी । पुराणीं ते सर्व ॥१॥ नारदें सांगोनियां मंत्र । केला जगीं तो पवित्र । चिंतनायेवढें पात्र । आन नाहीं सर्वथा ॥२॥ चिंतनें शुकादिक मुक्त । राजा जाहला परीक्षित । ऐसे अपार आहेत । चिंतनें मुक्त जाहले ते ॥३॥ चिंतनाची येवढी थोरी ।

गणिका नारी परद्वारीं। वाचे उच्चारितां हरी । मोक्षधामीं बैसविली ॥४॥ चिंतनें हनुमंता समाधि । तुटोनि गेली आधिव्याधि । एकाजनार्दनीं बुद्धि । चिंतनींच जडलीसे ॥५॥

१८९६. चिंतनें बिभीषण मुक्त । चिंतनें जाहला जनक जीवन्मुक्त । चिंतनें कुळ सरित । सर्व भावें हरी होय ॥१॥ आवडी चिंतावे चरण । दुजें नको मानधन । नाम स्मरणावांचून । चिंतनचि नसो ॥२॥ ऐसा एकविध भावें । चिंतन असो मनीं जीवें । एकाजनार्दनीं देव । तया पाठीं धांवतसे ॥३॥

१८९७. जाईन पंढरी । हेंचि चिंतन धरीं । मग तो श्रीहरी । नुपेक्षी भक्तातें ॥१॥ धरूनि पहा विश्वास । नका आणिक सायास । पहातसे वास । चिंतनाची सर्वथा ॥२॥ न धरीं माझें आणि तुझें । भार घाली पा रे वोझें । एकाजनार्दनीं दुजें । मग नाहीं तयातें ॥३॥

१८९८. पंढरीसी जावया । सदा हेत मानसीं जया । कळिकाळ वंदी पाया । तया हरिभक्तातें ॥१॥ दृढ मनींचें चिंतन । वाचे विठ्ठलाचि जाण । होतु कां कोटी विघ्न । परी नेम न टळे सर्वथा ॥२॥ एकाजनार्दनीं भाव । नुपेक्षी तया देव । करूनि संसार वाव । निजपदीं ठाव देतुसे ॥३॥

१८९९. देहीं न धरी जो आशा । चित्त पंढरी निवासा । स्मरणाचा ठसा । रात्रंदिवस जयातें ॥१॥ तोचि होय हरीचा दास । तेणें पुरती सर्व सायास । नाहीं आशापाश । चिंतनावांचुनी सर्वथा ॥२॥ ध्यानीं मनीं नारायण । सदा सर्वदा हें चिंतन । एकाजनार्दनीं मन । जडलेंसे हरिपायीं ॥३॥

१९००. चिंतन तें हरिचरण । हेंचि कलीमाजी प्रमाण । सर्व पुण्याचें फळ जाण । नामस्मरण विठ्ठल ॥१॥ मागें तरले पुढें तरती । याची पुराणीं प्रचीती । वेदशास्त्र जया गाती । श्रुतीही आनंदें ॥२॥ हेंचि सर्वांसीं माहेर । भूवैकुंठ पंढरपूर । एकाजनार्दनीं नर । धन्य जाणा तेथींचे ॥३॥

१९०१. चिंतन तें करी सदा। रामकृष्ण हरिगोविंदा ॥१॥ हेंचि एक सत्य सार । वांया व्युत्पत्तीचा भार २ नको जप तप अनुष्ठान। वाचे वदे नारायण ३ एकाजनार्दनीं भाव । अवघा देहीं पाहे देव ४

# भाग दुसरा.

## कलिप्रभाव.

१९०२. येऊनि नरदेहीं वांयां जाय । नेणे संतसंग कांहीं उपाय ॥१॥ कलीं वाढलासे अधम । ब्राह्मण सांडिती आपुलें कर्म ॥२॥ शुद्ध याति असोनि चित्त । सदा नीचाश्रय करीत ॥३॥ देवपूजा नेणे कर्म । न घडे स्नानसंध्या धर्म ॥४॥ ऐसा कलीचा महिमा । कोणी न करी कर्माकर्म ॥५॥ एकाजनार्दनीं शरण । घडो संतसेवा आण ॥६॥

१९०३ मंत्र तंत्रांची कथा कोण । गाइत्री मंत्र विकिती ब्राम्हण ॥१॥ ऐसा कलीमाजी अधर्म । करिताती नानाकर्में ॥२॥ वेदशास्त्रीं नाहीं चाड । वांयां करिती बडबड ॥३॥ एकाजनार्दनीं धर्म । अवघा कलीमाजी अधर्म ॥४॥

१९०४. कलीमाजी नोहे अनुष्ठान । कलीमाजी नोहे हवन । कलीमाजी नोहे पठण । नोहे साधन मंत्राचें ॥१॥ नोहे योगयागविधी । नसती अंगीं ये उपाधी । वाढतसे भेदबुद्धि । नोहे सिद्धी कोणती ॥२॥ न चले कर्माचें आचरण । विधिनिषेधाचें महिमान । लोपलीं तीर्थें जाण । देवप्रतिमा पाषाण ॥३॥ न ठाके कोणाचा कोठें भाव । अवघा लटिका वेवसाव । एकाजनार्दनीं भेव । जेथें तेथें वसतसे ॥४॥

१९०५. कोणासी न कळे अवघे जहाले मूढ । म्हणती हें गूढ वांयां शास्त्र ॥१॥ आपुलाला धर्म नाचरती जनीं । अपीक धरणी पीक न होय ॥२॥ अनावृष्टि मेघ न पडे निर्धार । ऐसा अनाचार कलीमाजी ॥३॥ एकाजनार्दनीं नविचा स्वभाव । न कळे तया भाव कोण कैसा ॥४॥

१९०६. पंडित शास्त्री होती नीच याती । त्यांचे ऐकताती नीति ते धर्म ॥१॥ स्वमुखें ब्राह्मण न करती अध्ययन । होती भ्रष्ट

जाण मद्यपी ते ॥२॥ नीचाचें सेवन करती घरोघरीं । श्वानाचिये परी पोट भरती ॥३॥ एकाजनार्दनीं आपुला स्वधर्म । सांडूनियां वर्म होती मूढ ॥४॥

१९०७. कलिमाजी दैवतें उघड दिसती फार । नारळ आणि शेंदूर यांचा भडिमार ॥१॥ लटिका देव लटिका भक्त लटिके सर्व वाव । सात धान्याचे घपाटे मागती काय त्याचा बडिवार ॥२॥ तेल रांधा मागती मलीदा वरती काजळ कुंकूं। फजीतखोर ऐसे देव तयाचे तोंडावर थुंकूं ॥३॥ एकाजनार्दनीं सर्वभावें सोपा पंढरीराव । तया सांडोनि कोण पुसे या देवांची कायसी माव ॥४॥

१९०८. कलियुगामाजी थोर जालें पाषांड । पोटासाठीं संत जाले उदंड ॥१॥ नाहीं विश्वास संतदर्या मानसीं । बोलती वांयां-विण सौरस अवघा उपहासी ॥२॥ वेद पठन शास्त्र संभाषे पुराण-मत । अवघें बोधोनि ठेविती बोलती वाचाळ मत्त ॥३॥ देव भजन संत पूजन तीर्थ महिमा न कळे मूढा । ऐसे कलियुगीं जाले जाणत जाणत दगडा ॥४॥ एकाजनार्दनीं कायावाचा राम जपा । सोपें हें साधन तेणें नोहे पुण्यपापा ॥५॥

१९०९. या पोटा कारणें न करावें तें करिती । वेद ते वि-किती थोर याती ॥१॥ नीचासी शब्दज्ञान सांगती ब्राह्मण । ऐकती ब्रह्मज्ञान त्यांचे मुखें ॥२॥ श्रेष्ठवर्ण होउनी नीचकर्म करिती । कांहीं न ते भिती पुण्यपापा ॥३॥ एकाजनार्दनीं सांडोनि आचार । करिती पामर नानामतें ॥४॥

१९१०. वंदूं श्रीभाविक जन । ऐकावें साधन पावन । कल-युगीं अज्ञान । अभाविक पैं होती ॥१॥ न कळे श्रुती वेदशास्त्र । पुराण न कळे पवित्र। ज्ञान ध्यान गायत्री मंत्र। जप तप राहिले ॥२॥ यज्ञ यागादिक दान । कोणां न कळे महिमान । अवघे जाहले अज्ञान । न कळे कांहीं ॥३॥ लोपेल मंत्र औषध । गाईस न निघे दुग्ध । पतिव्रता ज्या शुद्ध । व्यभिचार करिती ॥४॥ ऐशियानें करावें काय । तिहीं ध्यावे विठ्ठल पाय । एकाजनार्दनीं ध्याय । विठ्ठल नाम आवडीं ॥५॥

१९११. कोण मानील ह्या नामाचा विश्वास । कोण होईल उदास सर्वभावें ॥१॥ कलयुगामाजी आभाविक जन । करती उच्छेदन भक्तिपंथा ॥२॥ नानापरींचीं मतें नसतीं दाविती । नानामंत्र जपती अविधीनें ॥३॥ एकाजनार्दनीं पातकाची राशी । नाम अहर्निशीं न जपती ॥४॥

१९१२. अल्प तें आयुष्य अल्प धन कलीं । मर्यादा हे केली संतजनीं ॥१॥ अन्नमय प्राण न घडे साधन। नोहे तीर्थाटन व्रत तप ॥२॥ असत्याचें गृह भरलें भांडार । अवघा अनाचार शुद्धबुद्ध ॥३॥ एकाजनार्दनीं ह्मणोनि येते कींव । बुडताती सर्व महाडोहीं ॥४॥

## उपदेश.

भक्तिस्तोम माजविणाऱ्या बाह्य वेषधाऱ्यांस उपदेश.

१९१३. भजन चालिलें उफराटें । कोण जाणे खरें खोटें ॥१॥ अग्निहोत्राचा सुकाळ । वडा पिंपळासी काळ ॥२॥ तिन्ही देव पिंपळांत । अग्निहोत्रीं केला घात ॥३॥ ह्मणती सोमयाग करा । मुख धरूनि मेंढा मारा ॥४॥ शेंदूर माखूनियां धोंडा । चाळविती पोरें रांडा ॥५॥ एकाजनार्दनीं नेम । सर्वांठायीं पुरुषोत्तम ॥६॥

१९१४. भक्त रागेला तवकें । देव फोडोनि केले कुटके ॥१॥ कटकट मूर्ति मागुती करा । मेण लावुनि मूर्ति जडा ॥२॥ न तुटे न जळे कांहीं न मोडे । त्या देवाचे केले तुकडे ॥३॥ रांडवा ह्मणती आगे आई । कैसा देव फोडिला बाई ॥४॥ जवळींच शुद्ध असतां देवो । भक्तांसी पडिला संदेहो ॥५॥ शाळीग्राम शुद्ध शिळा । द्वारपळीया उपवास सोळा ॥६॥ चवदा गांठींचा बांधिला दोरा । तोही अनंत नेला चोरा ॥७॥ अनंतासी अंतु आला । भक्ता तेथें खेदु जाहला ॥८॥ एकाजनार्दनीं भावो । नाहीं तंव कैंचा देवो ॥९॥

१९१५. देव ह्मणती मेसाबाई । पूजा अर्चा करिती पाहीं ॥१॥ नैवेद्य वहाती नारळ । अवघा करिती गोंधळ ॥२॥ मेंढरें बोकड मारिती । सुकी रोटी तया म्हणती ॥३॥ बळेंचि आणिताती अंगा । नाचताती शिमगीं सोंगा ॥४॥ सकळ देवांचा हा

देव । विसरती तया अहंभाव ॥५॥ एकाजनार्दनीं ऐसा देव । येथें कैंचा आमुचा भाव ॥६॥

१९१६. फजितीचे देव मागती घुटीरोटी । आपणांसाठीं जग पीडिती काळ तोंडें मोठीं ॥१॥ नको तया देवा आठव मजसी । विठ्ठल मानसीं आह्मी ध्याऊं ॥२॥ अविचारी देव अविचारी भक्त । देवाकारणें मारिती पशुघात ॥३॥ एकाजनार्दनीं जळो ऐसा देव तो भोंड । विठ्ठल विठ्ठल न ह्मणे त्याचें काळें तोंड ॥४॥

१९१७. आलों ऐकोनि खंडोबाची थोरी । वाघा होउनी मज मागा ह्मणती वारी ॥१॥ ठकलों ठकलों वाउगा सीण । वारी मागतां पोट न भरे जाण ॥२॥ सदा वागवी कोटंबा आणि झेंडा । रांडापोरें त्यजिलीं जालों काळतोंडा ॥३॥ गेले दोनी ठाव आतां कोठें उरला वाव । एकाजनार्दनीं भेटवा मज पंढरीरावो ॥४॥

१९१८. पूजिती खंडेराव पतर भरिती । विठ्ठल विठ्ठल न ह्मणती अभागी ते ॥१॥ लाउनी भंडार दिवटी घेती हातीं । विठ्ठल म्हणतां लाजती पापमती ॥२॥ ऐसियासी भाव सांगावा तो कवण । एकाजनार्दनीं कायावाचा शरण ॥३॥

१९१९. सांडोनियां विठाबाई । कां रे पूजितां मेसाई ॥१॥ विठाबाई माझी माता । चरणीं लागो इचे आतां ॥२॥ अरे जोगाई तुकाई । इजपुढें बापुड्या काई ॥३॥ एकाजनार्दनीं माझी आई । तिहीं लोकीं तिची साई ॥४॥

१९२०. प्रेमें पूजी मेसाबाई । सांडोनियां विठाबाई ॥१॥ काय देईल ती वोंगळ । सदा खाय अमंगळ ॥२॥ आपुलीये इच्छेसाठीं । मारी जीव लक्ष कोटी ॥३॥ तैसी नोहे विठाबाई । सर्व दीनांची ती आई ॥४॥ न सांडीचि विठाबाई । एकाजनार्दन पायीं ५

१९२१. म्हणती देव मोठे मोठे । पूजिताती दगड गोटे ॥१॥ कष्ट नेणती भोगिती । वहा दवडातें म्हणती ॥२॥ जीत जीवा करूनि वध । दगडा दाविती नैवेद्य ॥३॥ रांडापोरें मेळ जाला । एक म्हणती देव आला ॥४॥ नाक घासुनी गव्हार । देवा म्हणती गुन्हेगार ॥५॥ एकाजनार्दनीं ह्मणे । जन भुललें मूर्खपणें ॥६॥

१९२२. पाषाणाची करूनि मूर्ति । स्थापना करती द्विजमुखें ॥१॥ तयां म्हणताती देव । विसरूनी देवाधिदेव ॥२॥ मारिती पशूंच्या दावणी । सुरापानीं आल्हाद जयां ॥३॥ आमुचा देव म्हणती भोळा । पद्दा सकळां पावतसे ॥४॥ ऐशा देवा देव म्हणेना कोण्ही । एका विनवी जनार्दनीं ॥५॥

१९२३. प्रतिमेचा देव केला । काय जाणे ती अबला ॥१॥ नवस करिती देवासी । म्हणती पुत्र देईं वो मजसी ॥२॥ न कळेचि मूढा वर्म । कैसें जाहलेंसे कर्म ॥३॥ प्रतिमा केलीसे आपण । तेथें कैंचें देवपण ॥४॥ देव खोटा नवस खोटा । एकाजनार्दनीं रडती पोटा ॥५॥

१९२४. देव दगडाचा भक्त तो मेणाचा। ऐका दोहींचा विचार कैसा ॥१॥ खरेपणा नाहीं देवाचे ते ठायीं । भक्त अभाविक पाहीं दोन्ही एक ॥२॥ एकाजनार्दनीं ऐसें देवभक्तपण । निलाजरे जाण उभयतां ॥३॥

१९२५. करुनी नवस मागती ते पुत्र । परी तो अपविघ्न होय पुढें ॥१॥ नासोनियां धर्म करी वेडेचार । भोगिती अघोर पापमति ॥२॥ सदा सर्वकाळ निंदावे सज्जन । कायावाचा मन परद्रव्यीं ॥३॥ परनारी देखतां सुख वाटे मनीं । भोगी वित्त हानी पाप जोडे ॥४॥ ऐशिया पामरा दंड तो कोण । तयाचें वदन कृष्णवर्ण ॥५॥ एकाजनार्दनीं नवसाचें फळ । कुळीं झाला बाळ बुडवणा ॥६॥

१९२६. जयाचेनी तुटे भवबंधन । तयासी जाण विसरती ॥१॥ करती आणिकाची सेवा । ऐसे ते अभागी निर्दैव ॥२॥ मुळींच नाहीं देवपण । तेथें करती जप ध्यान ॥३॥ विसरूनि खऱ्या देवासी । भुलले आपुल्या मानसीं ॥४॥ सत्य सत्य बुडती जनीं । एका शरण जनार्दनीं ॥५॥

१९२७. वोसघर वस्तीस काह्या । तैसें या देवा कोण पुसे ॥१॥ सांडोनियां पंढरीराणा । वोस राना कोण धांवे ॥२॥ घेती मांसाचें अवदान । देवपण कैंचें तेथें ॥३॥ ऐसिया देवासी पुजणें । एकाजनार्दनीं खोटें जिणें ॥४॥

१९२८. येउनी नरदेहा भूतांतें पूजिती । परमात्मा नेणती महामूर्ख ॥१॥ दगडाच्या देवा सेंदुराचा भार । दाविती बडिवार पूजनाचा ॥२॥ रांडापोरें घेती नवसाचें बगाड । जुगवे लिगाड तयाचेनी ॥३॥ आपण बुडती देवा बुडविती ॥३॥ अंतकाळीं होती दैन्यवाणे ॥४॥ एकाजनार्दनीं ऐसिया देवा । जो पूजी गाढवा सम होय ॥५॥

१९२९. प्रतिमा देव ऐसा ज्याचा भाव । न करी निर्वाहो आंगोअंगीं ॥१॥ असतां सर्वत्र बाहेरी अंतरीं । संपुष्टाभीतरीं ह्मणे देव ॥२॥ तेंचि हें द्वारका तेंचि हे पंढरी । सर्वत्र न धरी तोची भाव ॥३॥ तीर्थयात्रा करी देव असे क्षेत्रीं । येर काय सर्वत्रीं घोस पडलें ॥४॥ पुण्यक्षेत्रीं पुण्य अन्य क्षेत्रीं पाप । नवल संताप कल्पनेचा ॥५॥ एकाजनार्दनीं स्वतः सिद्ध असे । नाथिलेंचि पिसें मत वाद ॥६॥

१९३०. मी तेंचि माझी प्रतिमा । तेथें नाहीं आन धर्मा ॥१॥ तेथें असे माझा वास । नको भेद आणि सायास ॥२॥ कलियुगीं प्रतिमेपरतें । आसना साधन नाहीं निरुतें ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । दोन्ही रूपें देव आपण ॥४॥

१९३१. लावूनियां अंगा राख । ह्मणती सुख आह्मापाशीं ॥१॥ भोळे भाविका भोंदिती । भलते मंत्र तया देती ॥२॥ म्हणती आह्मां करा गुरु । उपचारु पूजेचा ॥३॥ एकाजनार्दनीं ते मैंद । नाहीं गोविंद तयांपाशीं ॥४॥

१९३२. अंगा लाऊनियां राख । करी भलतेंचि पाप ॥१॥ मेळवी शिष्यांचा मेळा । अवघा भांगेचा घोटाळा ॥२॥ नानापरी सांगे मंत्र । नेणे विधि अपवित्र ॥३॥ न कळे ज्ञानाची ह्रातवटी । सदा परदार राहाटी ॥४॥ एकाजनार्दनीं सोंग । तेथें नाहीं पांडुरंग ॥५॥

१९३३. आम्ही जाहलों गोसावी । आमची विभूत चालवावी ॥१॥ भांग भुरका हें साधन । शिष्य मिळाले चहुकोण ॥२॥ हें तों सोंगाचें साधन । राजी नाहीं जनार्दन ॥३॥ एकाजनार्दनीं भाव । भाव तेथें वसे देव ॥४॥

१९३४. आम्हीं योग साधियेला । भांग भुरका तो आणिला ॥१॥ योग न कळे तया मूढा । साधन काय तें दगडा ॥२॥ आंत काळा बाहेर काळा । नाम नाहीं अमंगळा ॥३॥ एकाजनार्दनीं तें पामर । साधन साधिती ते खर ॥४॥

१९३५. अंगासी राख ढुंगासी लंगोटी । गोसावी हातवटी मिरविती ॥१॥ अलख ह्मणोनि भिक्षा मागताती । अलखाची गती न कळे मूढां ॥२॥ भांगेचा सुकाळ चेले करी मूढ । तया यम दृढ दंड करी ॥३॥ अलक्ष अलक्ष आलख कळेना । जगीं विटंबना उगीच करती ४ एकाजनार्दनीं नका ऐसें सोंग । तेणें पांडुरंग अंतरेल ५

१९३६. संसाराचा धाक घेऊनियां पोटीं । जाहला हटतटीं गोसावी तो ॥१॥ पहिल्या परीस यातायाती मार्गें । शिणला उद्योगें भीक मागूं ॥२॥ उठोनियां पाहाटे अलख मागावें । परतोनी यावें झोंपडीसी ॥३॥ नाहीं तेथें कोण्ही दिसे केवीलवाणा । मग ह्मणे नारायणा व्यर्थ जिणें ॥४॥ जरी असतों घरबारी स्त्री पुत्र असती । आतां ही फजिती नको देवा ॥५॥ टाकूनियां वेष स्त्री करूं धांवे । तो आयुष्याचे ह्मवे ग्रासियेला ॥६॥ राहिली वासना संसार करणें । एकाजनार्दनीं ह्मणे जन्म घेती ॥७॥

१९३७. नवल दंभाचें कौतुक । अग्निहोत्री म्हणती याज्ञिक ॥१॥ मंत्र तंत्राची कथा कोण । मुख्य शास्त्री विकिती ब्राह्मण ॥२॥ आम्ही स्वधर्मनिष्ठ पावन । दंभें म्हणती आपणा जाण ॥३॥ दांभिकाची भक्ति वाव । एकाजनार्दनीं नाहीं ठाव ॥४॥

१९३८. स्नानसंध्या शौचाचार । स्वधर्म नावडे साचार ॥१॥ कनक फळ नाम गोमटें । बाहेर आंत दिसे कांटे ॥२॥ शरीर श्वेत निर्नासिक । तोंडाळ ओढाळ पति निंदक ॥३॥ ऐशी आचारहीन बापुडी । एकाजनार्दनीं न धरी गोडी ॥४॥

१९३९. वेदाचिया बोला कर्मातें गोंविला । परी नाहीं भजला संतांलागीं ॥१॥ घोकूनियां वेद द्वैत नव जाय । वाउगाचि होय श्रम तया ॥२॥ तया अद्वैताच्या वाटा जाय तो करंटा । शीण तो अव्हाटा आदि अंत ॥३॥ एकाजनार्दनीं संतांसी शरण । गेलिया पठन सर्व जोडे ॥४॥

१९४०. विद्या जालिया संपूर्ण । पंडित पंडिता हेळसन ॥१॥ धन जालिया परिपूर्ण । धनाढ्यासी हेळसन ॥२॥ कळतां आत्मज्ञान स्थिति । भलत्यासवें वाद घेती ॥३॥ वृश्चिका अंगीं विष थोडें । तैसा वादालागीं चढे ४ भुलोनि पामर । एकाजनार्दनीं बुडवी घर ॥५॥

१९४१. पतनाच्या भया नोळखे पामर । करी वेरझार नानापरी ॥१॥ नायके कीर्तन न पाहे पंढरी । वैष्णवांचे द्वारीं न जाये मूढ ॥२॥ नानापरींचे अर्थ दाखवी बोंगळ । सदा अमंगळ बोले जना ॥३॥ हिंडे दारोदारीं म्हणे पुराणीक । पोटासाठीं देख सोंग करी ॥४॥ वाचाळ आगळा बोलों नेदी लोकां । एकाजनार्दनीं देखा फजीत होय ॥५॥

१९४२. भांडाचें तोंड भांड पुराण । वरी शिमग्याचा सण ॥१॥ काय उणे मग भांडा । बोलती वाउगें तें तोंडा ॥२॥ वेद शास्त्र नीति नाहीं । सैरावैरा बोलणें पाही ॥३॥ एकाजनार्दनीं पाषांड । हाणोनि फोडा त्याचें तोंड ॥४॥

१९४३. शहाणा हो शहाणा म्हणविसी । हरीभक्ती कां रे वरवर करिसी ॥१॥ उगीच कासया करसील फड । जग हें बोधावया बापुडें ॥२॥ अंतर भक्ति न करिसी मूढा । कासया लौकिकीं मिरविसी बापुडा ॥३॥ एकाजनार्दनीं धरुनी कान । संतांपायीं नाचे सांडुनी अभिमान ॥४॥

१९४४. तीर्थी जाती उदंडें । त्याचे पाठीमागें तोंडें ॥१॥ मन वासना ठेउनी घरीं । तीर्थी नेली भाडखोरी ॥२॥ गंगेंत मारितां बुडी । मन लागलें बिऱ्हाडीं ॥३॥ नमस्कार करतां देवासी । मन पायपोसापासीं ॥४॥ लवकर करी प्रदक्षिणा । उशीर झालासे भोजना ॥५॥ एकाजनार्दनीं स्थिर मन । नाहीं तंव काय साधन ॥६॥

१९४५. आशा टाकुनी फकीर जाला । परी भिक्षा मागणें जन्म गेला ॥१॥ तैशी नोहे परमार्थ रहाटी । शुद्ध मन करीजे पोटीं ॥२॥ सर्वांभूतीं नांदे एक देव । वाउगा कां वाढावा अहंभाव ॥३॥ जे जे वाणी स्तुति केली । ती ती देवासी पावली ॥४॥ ऐसा धरी दृढभाव । एकाजनार्दनीं मागे ठाव ॥५॥

१९४६. ब्रह्मचारी म्हणती महंत । सदा विषयावरी चित्त ॥१॥ नेसोनियां कौपीन । अंतरीं तो विषय ध्यान ॥२॥ बोले जैसा रसाळ । भाव अंतरीं अमंगळ ॥३॥ एकाजनार्दनीं सोंग । तया न मिळे संतसंग ॥४॥

१९४७. आम्ही मुक्त म्हणोनि विचरती मही । मुक्त ही पदवी नाहीं अंगीं ॥१॥ सैर धांवे मन नाहीं पैं अटक । मुक्तज्ञान मौक्तिक वांयां जाय ॥२॥ भूतमात्रीं द्रोहो करिती नानापरी । वेदशास्त्र निर्धारीं ठाउकें नाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं कायसे ते मुक्त । जगीं जाणा फजीत निलाजिरे ॥४॥

१९४८. वेद विधि कांहीं न कळे पाठका । गुणदोष देखा मळीन सदा ॥१॥ दशग्रंथीं ज्ञान होतांचि जाण । निंदितो देखोन भलत्यासी ॥२॥ सर्व ब्रह्मरूप ऐसें बोले वेद । तेथें वादावाद उरला नाहीं ॥३॥ ओहं सोहं कोहं नाहीं ठाव । उगेचि गौरव मिरवी ज्ञान ॥४॥ एकाजनार्दनीं ब्रह्मज्ञानासाठीं । हिंडताती कोटी जन्म घेत ॥५॥

१९४९. वेद बोलिला जो जो गुण । तो तो नव्हेचि पठन ॥१॥ वेदें सांगितलें न करी । ब्रह्मद्वेषी दुराचारी ॥२॥ न करा सुरापान । कन्या गो विक्रय जाण ॥३॥ ऐसी वेदाची मर्यादा । न कळेचि मतिमंदा ॥४॥ निजमुखें स्वयें बोले वेदु । न करावा परापवादु ॥५॥ एकाजनार्दनीं शरण । वेदाचें नोहे आचरण ॥६॥

१९५०. कलीमाजी संत जाले । टिळा टोपी लाविती भले ॥१॥ नाहीं वर्माचें साधन । न कळे हृदयीं आत्मज्ञान ॥२॥ सदा सर्वदा गुरगुरी । द्वेष सर्वदा ते करी ॥३॥ भजनीं नाहीं चाड । सदा विषयीं कबाड ॥४॥ ऐसिया संतांचा सांगात । नको मजसी आदिअंत ॥५॥ भोळियाच्या पायीं । एकाजनार्दनीं ठाव देई ॥६॥

१९५१. होती पोटासाठीं संत । नाहीं हेत विठ्ठलीं ॥१॥ तयांचा उपदेश नये कामा । कोण धर्मा वाढवी ॥२॥ घालुनी माळा मुद्रा गळां । दाविती जिव्हाळा वरीवरी ॥३॥ एकाजनार्दनीं ते पामर । भोगिती अघोर यातना ॥४॥

१९५२. बैसोनि एकांतीं । सांगती कोरड्या त्या गोष्टी ॥१॥ ह्मणती करारे भजन । आपण नेणें जैसा श्वान ॥२॥ म्हणे करा पंढरीची वारी । आपण हिंडे दारोदारी ॥३॥ ऐशियाचा उपदेश । एकाजनार्दनीं ह्मणे नाश ॥४॥

१९५३. वेदशास्त्र वक्ता अति निःसीम पाहीं । सिद्धांत बोलतां उरी न ठेवी कांहीं । लयलक्ष ध्यान मुद्रा दावी आपुले ठायीं । वेडे वेडे चार करितां मोक्ष नये हातां ॥१॥ तो खूण वेगळी विरळा जाणे एक । जाणीव ग्रासोनि त्यासी बाणे देख ॥ध्रु०॥ अष्टांग योग जाणे मंत्र तंत्र कळा । प्रबोध भक्तीनें वश्य सिद्धी सकळा । वर्म चुकला भाग्यहीन अंधळा । मी कोण हेंचि नेणे कळा त्या विकळा ॥२॥ सिद्धांत एक निका सावध ऐका । सुखासी मेळवितें वर्म नातुडे फुका । भाव धरुनी संतांपायीं नाम वोळखा । तैंच एकाजनार्दनीं भेटी देखा ॥३॥

१९५४. शतावर्ती श्रवण अधिक पैं जालें । तेणें अंगा आलें जाणणेंपण ॥१॥ पुराण श्रवण लौकिक प्रतिष्ठा । विचार चोहटा जाणिवेचा ॥२॥ श्रवण तो लौकिक मनीं नाहीं विवेक । बुद्धीसी परीपाक कैसेनी होय ॥३॥ मी एक ज्ञाता मिरवी लौकिक । म्हणोनी आक्षेपक सभेमाजी ॥४॥ नानापरि व्यक्ति मिरवी लोकांप्रति । वाढवितो महंती मानालागीं ॥५॥ मी एक स्वयंपाकी मिरवी लौकिकीं । इतर कर्मासी शुद्धि नाहीं ॥६॥ कर्माकर्मी कांहीं न धरी कंटाळा । मानीतो विटाळा ब्राह्मणाच्या ॥७॥ मजहुनी ज्ञाता आणीक तो नाहीं । ऐसें जाणीवेचे डोहीं गर्वे गेला ॥८॥ नित्य पुढिलाचे गुण दोष आरोपितीं । श्रवणाची निष्पत्ति फळली ऐशी ॥९॥ लौकिक प्रतिष्ठा धनावरी आस्था । वरि वरी हरिकथा काय करसी ॥१०॥ एकाजनार्दनीं साच न रिघे मन । तंववरी समाधान केवि होय ॥११॥

१९५५. करितां हरिकथा श्रवण । स्वेद रोमांच नये दारुण । रुका वेंचितां प्राण । जाऊं पाहे ॥१॥ द्रव्यदारा लोभ अंतरीं । हरिकथा वरी वरी । बीज अग्नी माझारी । विरुढे कैसें ॥२॥ टाळी लावूनियां जाण । दृढ घालिती आसन । अंतरीं तों ध्यान । वल्लभेचें

॥३॥ धनलोभाचा वोणवा । तेणें जाळिलें जीवभावा । हरिकथेचा करी हेवा । लोकारुढी ॥४॥ धनलोभीं आसक्तता । हरिकथा करी वृथा । तयासी तो परमार्थ तत्त्वतां । न घडे जाणा ॥५॥ एकलीच कांता । नाश करी परमार्था । तेथें धनलोभ येतां । अनर्थचि होय ॥६॥ एकाजनार्दनीं । काम क्रोध लोभ तिन्ही । द्रव्यदारा त्यजोनी । नित्य तो मुक्त ॥७॥

१९५६. विसरुनी विठोबासी । भरले हव्यासीं साधन ॥१॥ काय त्यांचा फळे मंत्र । कोण पवित्र म्हणे तयां ॥२॥ दाविती वरी वरी भक्ति । अंतरीं युक्ति वेगळीच ॥३॥ एकाजनार्दनीं जप । वाउगें तप करती ते ॥४॥

१९५७. अष्टांग साधन मौनी जटाधारी । एक चरणावरी करती तप ॥१॥ वायु ते आहार असती दिगंवर । परी न कळे विचार देव कोठें ॥२॥ कैशी तया भ्रांती असोनी देव जवळा । रिघती साधन कळा हुडकिती ॥३॥ एकाजनार्दनीं तया नाहीं सुख । संतांवांचुनी देख मार्ग न लागे ॥४॥

१९५८. आहारे निदैवा काय करसी तप । वाउगाचि जप शांतीविण ॥१॥ आहारे पामरा नेणसी देवासी । वाउगा शिणसी काय काजा ॥२॥ आहारे तामसा कोण तुझी गती । संतांची प्रचीति नाहीं तुज ३ एकाजनार्दनीं ऐसा हीन भागी । भूभार जगीं वांयां जाहला ४

१९५९. कामक्रोध लागले मागें । तप करुनी काय सांगें ॥१॥ कासया जाशी वनांतरीं । कामक्रोध भरले अंतरीं ॥२॥ वनीं जाऊनियां चिंता । रात्रंदिवस घोकिशी कांता ॥३॥ योग अभ्यास न कळे वर्म । शिणतो मूढ धांवतें कर्म ॥४॥ कर्मी लिहिली न चुके रेखा । म्हणे जनार्दनीं एका ॥५॥

१९६०. सर्पं दर्दुर धरियेला मुखीं । तोही मक्षिका शेखीं धरीतसे ॥१॥ तैसे ते अभागी नेणतीच काळ । वाउगा सबळ करिती धंदा ॥२॥ नेणती नेणती रामनाम महिमा । व्यर्थ तप श्रमा शिणती वांयां ३ एकाजनार्दनीं तपाचें हें तप । तो हा सोपा जप श्रीरामनाम ४

१९६१. योग साधोनी पंचाग्नि साधिती । न कळे योगाची गती

फजीतखोरा ॥१॥ वाउगें साधन वाउगें साधन । तेणें विटंबन होत असे २ एकाजनार्दनीं योगाचा योग । भजे पांडुरंग एका भावें ॥३॥

१९६२. होउनी मानभाव । अवघा बुडविला ठाव ॥१॥ नाहीं चित्त शुद्ध गती । द्वेष देवाचा करती ॥२॥ धरती उफराटी काठी । रांडापोरें भोंदी वाटीं ॥३॥ नसेनियां काळेपण । अंगा लाविती दूषण ॥४॥ एकाजनार्दनीं देवा । जळो जळो त्यांची सेवा ॥५॥

१९६३. सांगती ते ज्ञान तैसें । श्वान सूकरासरिसें ॥१॥ अंगीं नसोनि वर्म । दाविताती गुण कर्म ॥२॥ द्वैताचीं दांवणी वाढ । भुलविती रांडा नाड ॥३॥ अभागी ते पामर । नर्क भोगिती अघोर ॥४॥ सांगती पुराणकथा । उभेबाजारीं सर्वथा ॥५॥ एकाजनार्दनीं नाहीं भाव । तेथें कैंचा उभा देव ॥६॥

१९६४. सुंदर विभूति लावी अंगीं । मिरवी जगीं भूषण ॥१॥ घालूनियां गळां माळा । वागवी गवाळा बोंगळ ॥२॥ नेणे कधीं योगयाग । दावी सोंग भाविकां ३ एकाजनार्दनीं भाव । नाहीं तेथें कदा देव४

१९६५. काय तें वैराग्य बोकडाचे परी । भलतिया भरीं पडतसे ॥१॥ काय ती समाधी कुक्कुटाचे परी । पुढोंचे उकरी लाभ नेणे ॥२॥ बैसोनी आसनीं वाउगें तें ध्यान । सदा लक्षी मान आपुलाचि ॥३॥ घालूनियां जेठा बैसतो करंटा । करितसे चेष्टा मर्कटा परी ॥४॥ नाहीं शुद्ध कर्म योगाचा विचार । सदा परद्वार लक्षितसे ॥५॥ ऐशिया पामरा कायसा तो बोध । एकाजनार्दनीं शुद्ध खडक जैसा ॥६॥

१९६६. करुनी वेदशास्त्र पठण । निर्धारितां निजज्ञान ॥१॥ करुनी वेदशास्त्र श्रवण । होय शिश्नोदर परायण ॥२॥ महा मोहो गिळिला ज्ञाना । शरण एकाजनार्दना ॥३॥

१९६७. सांगे ब्रह्मज्ञान गोष्टी । माते पाहतां होतो कष्टी ॥१॥ काय ज्ञान तें जाळावें । वदन तयाचें तें न पहावें ॥२॥ करी कथा सांगे पुराण । वांयां मिरवी थोरपण ॥३॥ जन्मला जिचे कुशीं । तिसी म्हणे अवदसा ऐसी ॥४॥ ऐसें नसो तें संतान । एका विनवी जनार्दन ॥५॥

१९६८. आवडीनें माता बोले बाळकासी । तंव तो म्हणे वि-वसी पाठीं लागे ॥१॥ सांगे लोकांपाशीं मुखें ब्रह्मज्ञान । झाला स्त्री आधीन स्वदेहें तो ॥२॥ बैसोनी बाजारीं सांगे ज्ञान गोष्टी । मातेसी करंटी ह्मणे नष्ट ॥३॥ एकाजनार्दनीं ते जन अधम । चौ-ऱ्यांशीं लक्ष जन्म भोगिताती ॥४॥

१९६९. सांगे बहु सोपया गोष्टी। करूं नेणे तो हातवटी ॥१॥ ऐसें याचें नको ज्ञान । ज्ञान नोहे तें पतन ॥२॥ सांगे लोकां उपदेश । आपण नेणे तो सायास ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । त्याची अमंगळ वाणी ॥४॥

१९७०. सांडोनी आचार करती अनाचार । ब्रह्माचा विचार न कळे ज्यांसी ॥१॥ वाहाती भार वेदाचा आधार । शास्त्रांचा संभार सांगताती ॥२॥ पुराण व्युत्पत्ती वाउग्या त्या कथा । सांगती सर्वथा हितपर ॥३॥ एकाजनार्दनीं अनुभवावांचुनी । कोरडी ती काहाणी ब्रह्मज्ञान ॥४॥

१९७१. येवढा मंत्र सोपा सांडोनी सायासीं । कां रे प्रपं-चासी गुंतुनी पडसी ॥१॥ वाचे ब्रह्मज्ञान गोष्टी ते फोल । अंतरींचें बोल सर्व वांयां ॥२॥ वृंदावनाचे परी वरवर रेखा । तैसे पढत-मूर्खा वेद गोष्टी ॥३॥ एकाजनार्दनीं प्रपंच टाकुनी । परमार्थ साधनीं रिघे वहिला ॥४॥

१९७२. रडती पोटासाठीं । झालों म्हणती संन्यासी ॥१॥ वर्म न कळेची मूढा । होतो फजित रोकडा ॥२॥ जनीं नारायण । अवघा भरला जनार्दन ॥३॥ तडातोडी करुनी वर्म । चुकला तो अधम ॥४॥ सर्वां ठाईं नारायण । एकाजनार्दनीं भजन ॥५॥

१९७३. त्यागूनियां स्त्री संन्यासी जे होती । पतना ते जाती अंतकाळीं ॥१॥ घेउनी संन्यास ध्यान पैं क्रियांचें । गुंतलासे आशे वांयां जाये ॥२॥ नारायण नामीं नाहीं पैं आचार । सर्व अना-चार त्रीतें लक्षी ॥३॥ एकाजनार्दनीं संन्यास लक्षण । गीतेमाजी कृष्ण बोलियेला ॥४॥

१९७४. त्यागून कर्म जाहला संन्यासी । ज्ञान ध्यान नाहीं

मानसीं ॥१॥ शिखा सूत्र त्यागून जाण । करी दंडासी ग्रहण ॥२॥ नित्य भिक्षा पुत्राघरीं । मठ बांधोनी राहे द्वारीं ॥३॥ एकाजनार्दनीं संन्यास । वांयांचि नाश कावेचा ॥४॥

१९७५. घालुनी आसन पोटीं भाव नाहीं । वांयां केली पाहीं विटंबना ॥१॥ देव सर्वांभूतीं तयासी न कळे । वाउगें गवाळें पसरिलें ॥२॥ अंतरीं तो हेत द्रव्य मिळेल कांहीं । वरपांग दावी वेषधारी ३ एकाजनार्दनीं ऐशिया सोंगासी । काय देवा त्यासी दंड करा ४

१९७६. डोई बोडोनी केली खोडी । काया विटंबिली बापुडी ॥१॥ ऐसें नोहे निर्मळपण । शुद्ध करी कां अंतःकरण ॥२॥ राख लाउनी वरच्यावरी । इंद्रियें पीडिलीं भरोवरी ॥३॥ संध्यास्नान द्वादश टिळे । फांसे घालुनी कापी गळे ॥४॥ बगळा लाऊनियां टाळी । ध्यान धरूनि मत्स्य गिळी ॥५॥ पाय घालुनी आडवा । काय जपतोसी गाढवा ॥६॥ कन्येसमान घरची दासी । तिशीं व्यभिचार करिसी ॥७॥ लोकांमध्यें मिरविसी थोरी । घरची स्त्री परद्वारीं ॥८॥ ज्ञान आलें बुद्धीपणा । चघळोनी सांडी तो बह्मणा ॥९॥ एकाजनार्दनीं निर्मळ भाव । तेथें द्वैता कैंचा ठाव ॥१०॥

१९७७. षड्वैरियांचा करावा आधीं नाश । मग सुखें संन्यास घ्यावा जगीं ॥१॥ आशा मनीशा यांचा तोडोनियां पाश । मग सुखें संन्यास घ्यावा आधीं ॥२॥ एकाजनार्दनीं संकल्पाचा त्याग । सुखें संन्यास मग घ्यावा आधीं ॥३॥

१९७८. संन्यासी करी गृहस्थाश्रम । तेणें तया अधर्म घोडचला ॥१॥ कर पात्रीं भिक्षा हाचि त्याचा धर्म । न करितां अधर्म स्वयें जोडे ॥२॥ नाश करावे षड्वैरी नेमें । तथा संन्यास नामें म्हाणिजेती ॥३॥ एकाजनार्दनीं गृहस्थची बरा । फजिती बाजारा उभ्या होय ॥४॥

१९७९. नुपजे अनुताप ज्ञान । काय घेउनी विज्ञान ॥१॥ अनुतापाविण । व्यर्थ संन्यास ग्रहण ॥२॥ संन्यास घेतलिथापाठीं । काम नुपजावा पोटीं ॥३॥ ऐसें संन्यास लक्षण । एकाजनार्दनीं खूण ॥४॥

१९८०. वासनेचें वसन समूळ फाडी । त्रिगुण जानवें तथा-

वरी तोडी ॥१॥ यापरी जाणोनी संन्यासु घेई । गुरुवचनें सुखें विचरतु जाई ॥२॥ मन दंडिजे तोचि घेई सुदंडु । जीवनेंविण कमंडलु अखंडु ॥३॥ एकाक्षर जप करी । क्षराक्षरातीत धारणा धरी ॥४॥ स्वानंदाचें करीं करपात्र । सहजीं सहज सेवी नारायण वक्त्र५एकाजनार्दनीं सहज संन्यासु। सहजीं सहज तेथें न लगे आयासु६

१९८१. वासना विषयीं सदा बसे । तेथें देवा कोण पुसे ॥१॥ सदा तळमळी मन । करी ध्यान विषयाचें ॥२॥ रात्रंदिवस करी चिंता । नाठवी सर्वथा रामनाम ॥३॥ एकाजनार्दनीं नाहीं भाव । तंव कैंचा भेटे देव ॥४॥

१९८२. वरीवरी दाविती आचार । अंतरीं तो अनाचार ॥१॥ मुखीं नाहीं कधीं नाम । सदा काम विषयाचा ॥२॥ नेणें कधीं संतसेवा । न करी देवा पूजन ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । ऐसा जन्मला तो जनीं ॥४॥

१९८३. नाहीं ध्यान तें अंतरीं । सदा विषयीं दुराचारी ॥१॥ स्वप्नीं नेणे नामस्मरण । करी विषय सेवन ॥२॥ अतीत अभ्यागत । जया नावडे चित्तांत ३ एका शरण जनार्दनीं । ऐसा पामर तो जनीं ४

१९८४. विषय भाहीलागीं जाण । धरी बकापरी ध्यान ॥१॥ विषयीक गायन करी । जैसा खर भुंके खरीं ॥२॥ नाहीं संतचरणीं मन । सदा विषयावरी ध्यान ॥३॥ विषय लोटी परता होई । एकाजनार्दन पायीं ॥४॥

१९८५. तोंडभरी विवेक मनीं वाहे अभिलाख । विवेक केला रंक विषयाचा ॥१॥ वैराग्यविण ज्ञान बोलती तें उणें । घरोघरीं पोसणें लाविताती ॥२॥ जुनाट परिपाठी सांगताहे गोष्टी । विरक्तीविण पोटीं ज्ञान नेघे ॥३॥ परिसोनी ग्रंथ निरोपी ज्ञानकथा । मनीं वाहे आस्था विषयांची ॥४॥ आरंभींच डाव पडियेला खोटा । पचलें नाहीं पोटा रामनाम ॥५॥ धडधडीत वैराग्य वरी वाहे विवेक । ज्ञानासी तो एक अधिकारी ॥६॥ वैराग्य विवेक बाणलेंसे अंगीं । ज्ञान तयालागीं वोरसलें ॥७॥ एकाजनार्दनीं विवेकेंसी भेटी । वैराग्याविण गोष्टी फोल होय ॥८॥

१९८६. बांधूनियां पर्णकुटी मठी। त्यावरी गुढी अद्वैताची ॥१॥ ऐसें मिरविती सोंग वायां। नरका जावया उल्हासें ॥२॥ नेणे कधीं संतांचें पूजन। सदा सर्वदा परधनीं मन ॥३॥ शरण एकाजनार्दनीं। ऐसें सोंग मिरविती जनीं ॥४॥

१९८७. पोट भरावया भांड। जैसा बडबडी तोंड ॥१॥ तैंवि विषयालागीं जाण। शास्त्र व्युत्पत्ती श्रवण ॥२॥ विषयवासना धरुनी थोर। दावी वरवर आचार ॥३॥ जेविं काग विष्ठा देखे। तेविं विषय देखोनी पोखे ४ ह्मणे जनार्दनाचा एका। शुद्धिका नोहे तया देखा ५

१९८८. आडक्याकारणें जीव जात। ह्मणती आह्मी उदार भक्त ॥१॥ ऐसिया दांभिकांसी। दुरी होय हरी त्यांसी ॥२॥ गाजराची तुळासाची। वाट पाहती विमानाची ॥३॥ एकाजनार्दनीं खोटा भाव। तयासी न भेटे देव ॥४॥

१९८९. द्रव्याचिया आशें। कथा करणें सायासें ॥१॥ उभयतां नरका जोडी। मेळविलीं तीं बापुडीं ॥२॥ निरास करूनि मन। करा कथा तें कीर्तन ॥३॥ देवा आवड भक्तीची। एकाजनार्दनीं साची ४

१९९०. द्रव्य घेऊनियां कथा जे करिती। उभयतां जाती नरकामध्यें ॥१॥ तयांचिया दोषा नाहीं परिहार। वेदाचा विचार कुंठिताचि ॥२॥ शास्त्रांची तों मती न चाले सर्वथा। पुराणें हीं तत्त्वतां मौनावलीं ३ एकाजनार्दनीं दोषां नाहीं पार। रवरव निर्धारें भोगिताती ४

१९९१. द्रव्याचिये आशे करी जो कथा। चांडाळ तत्त्वतां जाणावा तो ॥१॥ द्रव्याचिये आशें वेद जे पढती। रवरव भोगिती कल्पवरी ॥२॥ द्रव्याचिये आशे पुराण सांगती। सकुळ ते जाती नरकामध्यें ॥३॥ द्रव्याचिये आशे कथेचा विकरा। प्रत्यक्ष तो खरा मातंगचि ॥४॥ एकाजनार्दनीं नैराश्य भजन। तो प्राणी उत्तम कलियुगीं ॥५॥

१९९२. द्रव्य घेऊनियां उपदेश देती। मार्जार ते होती जन्मोजन्मीं ॥१॥ द्रव्य घेऊनियां तीर्थयात्रा करिती। श्वान ते होती जन्मोजन्मीं ॥२॥ देऊनियां दान परतोनि घेती। सूकर ते होती जन्मोजन्मीं ॥३॥ द्रव्य घेऊनियां रंगीं जे नाचती। वैष्णव ते

न होती जन्मोजन्मीं ॥४॥ एकाजनार्दनीं निर्धनीं भजन । तेणें नारायण संतुष्टचि ॥५॥

१९९३. द्रव्यांचिया लोभें । तीर्थामध्यें रहाती उभे ॥१॥ सांगती संकल्प ब्राह्मण । तेणें निर्फळ तीर्थ जाण ॥२॥ संकल्पानें नाड । उभयतां ते द्वाड ॥३॥ संकल्पाविरहित धन । एकाजनार्दनीं पावन ॥४॥

१९९४. करिताती कथा । द्रव्य मागती सर्वथा ॥१॥ नाहीं पुण्य दोघां गांठीं । हीन भाग्य तीं करंटीं ॥२॥ नैराश्य कथा भजन । तेणें तुष्ट नारायण ॥३॥ एकाजनार्दनीं वाणी । व्यास बोलले पुराणीं ॥४॥

१९९५. बाजारीं बैसोनि सांगे ज्ञान गोष्टी । कथेची राहाटी वोपावोपी ॥१॥ मेळवोनी जन सांगे निरूपण । वाचे ब्रह्मज्ञान पोटा-साठीं ॥२॥ न कळे पामरा आपुला विचार । करी अनाचार जगामध्यें ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसे फजीतखोर । भोगिती अघोर नरक देखा ४

१९९६. दांभिकाची भक्ति । वरी वरी देहस्थिती । अंतरीं तों गती । वेगळी बापा ॥१॥ नाम गाय प्रेमभरित । रडे स्फुंदे डोळे पुसीत । अंतरींचा हेत । वेगळा बापा ॥२॥ वृंदावनाचें तें फळ । कडु जैसें सर्वकाळ । तैसा मनोमेळ । वेगळा बापा ॥३॥ धरुनी ध्यान । बक जैसा लक्षी मीन । परस्त्री देखोन । विव्हळ बापा ॥४॥ सांगे आत्मज्ञान स्थिती । अंतरीं तों वेगळी रीती । द्रव्य जोडे कैशा रीती । हेंचि ध्यान बापा ॥५॥ न कळे कांहीं स्वहित । सदा द्रव्यदारा-वर चित्त । तयासी भगवंत । प्राप्त नाहीं ॥६॥ शरण एकाजनार्दन । नको मज तयाचें दरुशन । अभाविकांसी भाषण । नको देवा ॥७॥

१९९७. प्रत्यक्ष ती कथा जगाची माउली । विक्रयें करिती वहिली दोषी देखा ॥१॥ आपुली ती माता आपण भोगितां । प्राय-श्चित्त सर्वथा काय द्यावें ॥२॥ पतिव्रतेनें जैसा पतीचि वधिला । प्रायश्चित्त तिला कोणें द्यावें ॥३॥ मातें बाळकासी विषपान दिलें । प्रायश्चित्त या बोलें कोणें द्यावें ॥४॥ एकाजनार्दनीं कथा ती मा-उली । विकितां घडली ब्रह्महत्या ॥५॥

१९९८. कोटी ब्रह्महत्या घडे । कथा विक्रय तया जोडे ॥१॥

हा तो पुराणीं निवाडा। पाहे कीं रे दगडा ॥२॥ एकाजनार्दनीं जाण। पंचमहापातकी तो पूर्ण ॥३॥

१९९९. दीनाचें उपार्जन करी पोटासाठीं। म्हणे मज लंगोटी द्याहो कोणी ॥१॥ घेउनी संन्यास हिंडे दारोदारीं। नारायण करी पोटासाठीं ॥२॥ कामक्रोध वैरी सदोदित पिडी। वरी शेंडी बोडी करुनी काई ॥३॥ व्यर्थ विटंबना करिती जनांत। संन्याशाची मात सोंग दावी ॥४॥ एकाजनार्दनीं संन्यास साचा। रामनाम वाचा उच्चार करीं ॥५॥

२०००. वांयां शब्दज्ञान बोलाचा गौरव। पोटींचा पैं भाव मिथ्या सोंग ॥१॥ मैंदाचिये परी बैसती ध्यानस्थ। सदा चित्त ओढत परधनीं ॥२॥ वैराग्य तें फोल सांगताती गोष्टी। काय ते चावटी मिथ्या बोल ॥३॥ एकाजनार्दनीं ऐशिया सोंगासी। कैं हृषिकेशी प्राप्त होय ॥४॥

२००१. कनक फळ भक्षितां सहज भ्रांती येती। तैशी ही फजिती संसारिका ॥१॥ मर्कटाचीये परी नाचे घरोघरीं। नाचवोनी भरी पोट तैसें ॥२॥ करिती तितुकें अवघें तें सोंग। नाहीं कांहीं रंग भावभक्ति ॥३॥ एकाजनार्दनीं पडिलासे भ्रांती। नेणे कधीं स्तुति देवाची तो ॥४॥

२००२. मुखीं वसे ब्रह्मज्ञान। चित्तीं चिंती धनमान ॥१॥ ऐसे ठक जे पतित। तयां साधेना स्वहित ॥२॥ स्त्रीसंगीं सदा सक्त। वदनीं गोष्टी परमार्थ ॥३॥ एकाजनार्दनीं तयां। देव भेटेल कासया ४

२००३. गांठीं बांधोनियां धन मिरविती भक्ति। मनीं ते आसक्ती अधिक व्हावी ॥१॥ चित्त वित्तावरी भक्ति लोकाचारीं। देव अभ्यंतरीं कैंवी भेटे ॥२॥ असे चित्त वित्ता लावी कळांतरीं। अनुष्ठान करी दिवसगणी ॥३॥ जप तप विधान अवघेंचि सांडी। धरणेंचि मांडी सावकाश ॥४॥ धन सांडोनि मन धरी जनार्दन। एकाएकीं भक्ति फळेल तेणें जाण ॥५॥

२००४. आहाच वाहाच झकविलें लोकां। ऐसिया ठका देव कैंचा ॥१॥ शिकवुनी जन वंचला आपण। नरकीं पतन होत

असे ॥२॥ मी ज्ञाता म्हणोनी फुगोनी बैसला । ब्रह्मविद्येचा पसारा घातिला ॥३॥ अभ्यासी तें मिरवी लोकीं । पडलिया चुकी निजपंथें ॥४॥ ज्यासी दंभ तो काय जेणे । लोकीं मानवणें हेंचि पाहे ॥५॥ घरोघरीं गुरु आहेत आइते । गूळ घेऊनियां विकिती रायतें ॥६॥ संसारापासोनी सोडवी साचे । सद्गुरु ऐसें नांव त्याचें ॥७॥ बोलाचेनि ज्ञानें पावोनी देवा । भुलविलें मावा अभिमानें ॥८॥ एकाजनार्दनीं नव्हे त्या भेटी । बोसणतां भेटी साच होय ॥९॥

२००५. असत्य जन्मलें असत्याचे पोटीं । अर्थबळें चावटी शिकविती १ अर्थी धरुनी आस असत्य बोलणें । अर्थासाठीं घेणें मंत्र यंत्र ॥२॥ अर्थासाठीं प्राण त्याजिती जनीं । अर्थें होत हानी प्राणीमात्रा ३ एकाजनार्दनीं अर्थाचा संबंध । तेथें भेदाभेद सहज उठे ४

२००६. अर्थ नाहीं जयापाशीं । असत्य स्पर्शेना तयासी ॥१॥ अर्थापाशीं असत्य जाण । अर्थापाशीं दंभ पूर्ण ॥२॥ अर्थापोटीं नाहीं परमार्थ । अर्थापोटीं स्वार्थ घडतसे ॥३॥ अर्थ नका माझे मनीं । ह्मणे एकाजनार्दनीं ॥४॥

२००७. आहारालागीं करी देवाचें भजन । मिळे मिष्टान्न भोजनासी ॥१॥ आहारालागीं करी तीर्थांचें भ्रमण । आहारें जिंकिलें मन सर्वपरी ॥२॥ आहारालागीं करी तीर्थ प्रदक्षणा । आहारें व्यापिलें जना एकमय ॥३॥ आहार निर्धार नाहीं जनार्दनीं । एकाजनार्दनीं निराहार ॥४॥

२००८. आहारालागीं देवपूजा । आहारें खादलेंसे निजा ॥१॥ न कळेचि हिताहित । आहारें खादलीं पंचभूतें ॥२॥ आहारालागीं कर्म धर्म । भुलला वर्म आहारेंची ॥३॥ आहारालागीं मंत्र तंत्र । आहारालागीं करी अपवित्र ॥४॥ आहारालागीं जाला भांड । एकाजनार्दनीं काळें तोंड ॥५॥

२००९. आहारालागीं कथा । करिताती पैं सर्वथा ॥१॥ आहार न मिळतां जाण । कथेलागीं पुसे कोण ॥२॥ आहार मिळतां पोटभरी । पुराण सांगे बरव्या परी ॥३॥ आहार मिळतां संध्यास्नान । आहारार्थ जप ध्यान ॥४॥ आहारालागीं उपासना ।

नीच सेवना आहारेंची ॥५॥ आहाराकारणें सर्व हेत । एका-जनार्दनीं गात आहारेंची ॥६॥

२०१०. मी एक शुची जग हें अपवित्र । कर्माचे विचित्र वोढवलें ॥१॥ देखत देखत घेतसे विख । अंतीं तें सुख केविं होय ॥२॥ अल्प दोष ते अवघेचि टाळी । मुखें ह्मणे सर्वोत्तम बळी ३ अभिलाषें अशुचि झालासे पोटीं । एकाजनार्दनीं नव्हेचि भेटी ४

२०११. डोई बोडोनी केली खोडी । काया विटंबिली बापुडी ॥१॥ तैसें नव्हे निर्मळ मन । शुद्ध करीं अंतःकरण ॥२॥ द्वादश लाऊनियां टिळे । फांसा घालुनी कापी गळे ॥३॥ बक लावूनियां टाळी । ध्यान धरूनि मत्स्य गिळी ॥४॥ एकाजनार्दनीं भाव । तेथें द्वैतासी कैंचा ठाव ॥५॥

२०१२. शिष्यापासून सेवा घेणें । हें तों लक्षण अधमाचें ॥१॥ ऐसे असती गुरु बहु । नव्हेचि साहूं भार त्यांचा ॥२॥ एक-पणें समानता । गुरुशिष्य उरता उपदेश ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । गुरु माझा जनार्दन ॥४॥

२०१३. सांगती लोकां गुरु करा । आपुली आपण शुद्धि धरा ॥१॥ त्यांचें बोलणें वितंड । शिष्य मिळती तेही भांड ॥२॥ उपदेशाची न कळे रीत । द्रव्यासाठीं हात पसरीत ॥३॥ ऐशा गुरूच्या ठायीं भाव । एकाजनार्दनीं वाव ॥४॥

२०१४. जळतिया घरा । कोण वस्ती करी थारा ॥१॥ तैसे अभागी पामर । गुरुपण मिरविती वरवर ॥२॥ नाहीं मंत्र शुद्धीचें ज्ञान । भलतियाचे फुंकिती कान ॥३॥ मनुष्य असोनि गुरु पाही । एकाजनार्दनीं तें नाहीं ॥४॥

२०१५. बैसोनियां हाटवटी । सांगे गोष्टी लौकिक ॥१॥ तैसें नव्हे भक्तपण । घातला दुकान पसारा ॥२॥ वर्माचें तें पाठांतर । केला भार बहूतची ३ एकाजनार्दनीं सार । भुंके फार खर जैसा ॥४॥

२०१६. केलें काय तुवां जाऊनियां तीर्था । सर्वदा विषयार्थी भुललासी ॥१॥ मनींचीं तीं पापें नाहीं धोवियेलीं । वृत्ति हे लाविली संसारींच ॥२॥ तीर्थस्नानें अंग तरी शुद्ध केलें । नाहीं धोवियेलें

अंतरासी ॥३॥ वरी दिसती शुद्ध अंतरीं मलीन । तोंवरी हें स्नान व्यर्थ होय ॥४॥ तीर्थयात्रा योगें कीर्तिही पावली । बुद्धि शुद्धि झाली नाहीं तेणें ॥५॥ शांति क्षमा दया नाहीं पैं अंतरीं । वांयां येरझारीं कष्ट केले ॥६॥ एकाजनार्दनीं सद्गुरु पाय धरी । शांतीचे जिव्हारीं पावशील ॥७॥

२०१७. अभाविकाचें कर्म । तया न कळे कांहीं वर्म । संतां म्हणती भ्रम । यासी झाला ॥१॥ हरुषें मुखें नाम गाय । तया म्हणती वेडा होय । अभाविकाचें भय । जन मनीं वाहे ॥२॥ बोले जैसा का भाट । वर्म कांहीं न कळे नट । नामस्मरण स्पष्ट । न घडे तया ॥३॥ ऐशियाची संगती । न घडावी निश्चितीं । एकाजनार्दनीं अप्रीति । तयाची देवा ॥४॥

२०१८. वरुषला मेघ खडकावरुता । चिखल ना तत्त्वतां थेंब नाहीं ॥१॥ वांयां तो प्राणी आला नरदेहा । गेला वांयां पहा भक्तीविण ॥२॥ अरण्यांत जैशीं सूकरें बैसतीं । तैसें मठाप्रती करूनि बैसे ॥३॥ उदय होतांचि लपतें उलूक । तैसा तो मूर्ख समाधि बैसे ॥४॥ एकाजनार्दनीं वांयां गेलें सर्व । संसार ना देव दोन्ही शून्य ॥५॥

२०१९. स्वप्नामाजीं नेणे देवा । करी सेवा भूतांची ॥१॥ नाना साधन ते चेष्टा । तेणें कष्टा भरी भरला ॥२॥ जे जे करी ते उपाधी । मंत्र जपे तो अविधी ॥३॥ सकळ मंत्रां मंत्रराज । एकाजनार्दनीं नेणे निज ॥४॥

२०२०. शिकलासे टाणाटोणा । तेणें ब्रह्मज्ञाना तुच्छ मानी ॥१॥ बोले बहु चावट वचन । वेदां म्हणे तो अप्रमाण ॥२॥ सिद्धांत धाद्रांतांसी म्हणे । हें तों पाषांडी बोलणें ॥३॥ ऐसा पामर दुराचारी । वाचे न वदे कधीं हरी ॥४॥ एकाजनार्दनीं मन । ज्याचें पाषाणचि जाण ॥५॥

२०२१. भजन तें साचें भोळ्याभाविकांसी । पैं अभाविकांसी नरकवास ॥१॥ भोळियाचा देव अंकित भोळा । अभाविका चांडाळा जवळीं नसे ॥२॥ एकाजनार्दनीं भावाचें कारण । अभाविकां जाण दुःख पीडा ॥३॥

२०२२. गजाचें तें वोझें गाढवासी न साजे । भाविकाचें भजन अभाविका न विराजे ॥१॥ पतिव्रतेची रहाटी सिंदळीसी न साजे । श्रोतियाचें कर्म हिंसका लाजे ॥२॥ एकाजनार्दनाचें कवित्व सर्वांसी साजे । वाचे श्रीगुरु ह्मणतां कदा न लाजे ॥३॥

२०२३. जया अनुताप वैराग्य । तया म्हणती पहा अभागी ॥१॥ वरी वरी दांभिक आचार । तया ह्मणती पवित्र नर ॥२॥ जया बोलें मनुष्य मरे । तया म्हणती सिद्धत्व खरें ॥३॥ एकाजनार्दनीं बोध । अभाविकांसी ह्मचि खेद ॥४॥

२०२४. अविश्वासी वाडेंकोडें । जेथें जाय तेथें सांकडें ॥१॥ अंगोंअंगीं कष्ट सदा । ऐसी तयासी अपदा ॥२॥ जिकडे जाय तिकडे कष्ट । नोहे परमार्थीं वरिष्ठ ॥३॥ एका शरण जनार्दनीं । अविश्वास त्यागा ह्मणीं ॥४॥

२०२५. गाइत्रीमंत्राचा मानुनी कंटाळा । जाय तो वेताळा पूजावया ॥१॥ देवाचें पूजन करितां वाटे दुःख । आवडतो देख भांग घोटी ॥२॥ ब्राह्मणासी पाणी देतां मानी शीण । वेश्येचें धुवण वस्त्रें धुई ॥३॥ कीर्तनीं बैसतां ह्मणे निद्रा येत । खेळतसे द्यूत अहोरात्रीं ४ पुराण श्रवणीं मानीत कंटाळा । नटनाट्य खेळा पाहों जाय ५ एकाजनार्दनीं ऐसा तो गव्हार । चंद्रअर्कवर नरक भोगी ६

२०२६. हरिकथा परिसोनी जरी देखसी दोष । पयपान भुजंगा तेंचि परतलें विष ॥१॥ हरिनाम ऐकतां जरी न वाटे सुख । अंतरीं तूं देख पाप आहे ॥२॥ कस्तुरीचे आळां पेरिला पलांडु । सुवास लोपोनी कैसा वाढे दुर्गंधु ॥३॥ धारोष्ण पय परि ज्वरितांचें मुख । थुंकोनी सांडी ह्मणे कडु वीख ॥४॥ पान लागलिया गूळ न ह्मणे गोडु । गोडाचें गोड तें झालें कडु ॥५॥ एकाजनार्दनीं भाव नुपजे नरा । नरदेहीं आयुष्य तेंही केला मातेरा ॥६॥

२०२७. सचेतनीं द्वेष अचेतनीं पूजा । भक्ति गरुडध्वजा कैंवी पावे ॥१॥ व्यर्थ खटाटोप नाथिला पसारा । गोविंद गव्हरा कैंवी कळे २ हरिदासाचेनि गुणें शिळा दैवतपणें । त्या शिळा पूजोनी त्यातें द्वेषी ३ एकाजनार्दनीं नाथिलाची दावी । सजीव निर्जिवीं गोंवियेलें ४

२०२८. मत्सर ज्ञानीयातें न सोडी । मा इतर कायसीं बापुडीं ॥१॥ शिणताती मत्सरवेधें । भोगिताती भोगविविधें ॥२॥ निर्मत्सर भजनीं गोष्टी । ऐसा कोण्ही नाहीं सृष्टी ॥३॥ एकाजनार्दनीं मत्सर । तेणें परमार्थ पळे दूर ॥४॥

२०२९. जाह्मला बहुदीन । मग म्हणे नारायण ॥१॥ तया हीन पामरासी । ब्रह्महत्या घडल्या राशी ॥२॥ जें न करावें तें केलें । मग राम म्हणोनी डोले ॥३॥ काय तयाचें तें गाणें । जैसें मोलाचें रडणें ॥४॥ शुद्ध भावावांचुनी निका । एकाजनार्दनी नाहीं सुटका ॥५॥

२०३०. अभाविक यासी न रुचे भजन । सदा पिशाचपण देह त्याचा ॥१॥ असोनी संसारीं प्रेतवत देहे । काळ मुखा वाहे भार सदा ॥२॥ जगीं अपकीर्ति फजितीचें जिणें । सदा तें लपणें श्वानापरी ॥३॥ एकाजार्दनीं ऐसे ते पामर । भोगिती अघोर कल्पकोटी ४

२०३१. गर्दभाचे अंगीं चंदनाची उटी । व्यर्थ शीण पोटीं लावूनियां ॥१॥ श्वान तो भोजनीं बैसविला अढळ । परी वोकावरी डाळ जाऊं नेदी ॥२॥ सूकरालेपन कस्तुरीचें केलें । परी तो लोळे चिखलीं सदा ३ एकाजनार्दनीं अभाविकाचे गुण । व्यर्थ शीण जाण प्राणियासी ४

२०३२. केलिया कर्माचा येत असे वांटा । अभागी करंटा मतिमंद ॥१॥ जेथें राहे उभा दिसे दैन्यवाणा । चुकला भजना गोविंदाच्या २ एकाजनार्दनीं नामाच्या उच्चारा । न करितां अघोरा जाती प्राणी ३

२०३३. कामधेनु देउनी पालटा । अजा घे जैसा करंटा ॥१॥ तैसा ठकला कीर्तनीं । निशिदिनीं गाय गाणीं ॥२॥ दवडोनियां हिरकणी । वेंची आनंदें गारमणी ॥३॥ ऐसा अभागी पामर । एकाजनार्दनीं ह्मणे खर ॥४॥

२०३४. एक नरदेह नेणोनि वांयां गेले । एक न ठके ह्मणोनि उपेक्षिले । एक ते गिळिले ज्ञान गर्वें ॥१॥ एक ते साधनीं ठकिले । एक ते करूं करूं ह्मणतांचि गेले । करणें राहिलेंसे तैसें ॥२॥ यापरि अभिमान जगीं । ठकवितसे अंगसंगीं । नडी लागवेगीं जाणत्यासी । ॥३॥ जें जें करी साधन । तेथें होय अभिमान । नागवी धावणें तेथें सावाधांवा करी कोण ॥४॥ ज्ञानें व्हावी ब्रह्मप्राप्ती । तें ज्ञान

वोंचि विषयासक्ती । भांडवल नाहीं हातीं । मा मुक्ति कैंची ॥५॥ स्वप्नींचे निजधर्में । जाग्रतीं नोहे धर्म । ब्रह्माहमस्मि हेंही समाधान । सोलीव भ्रम ॥६॥ अभिमानाचिया स्थिती । ब्रह्मादिकां पुनरावृत्ती । ऐसी वेदश्रुती । निश्चयों बोले ॥७॥ एकाजनार्दनीं एकपण अनादी । अहंआत्मा तेथें समूळ उपाधी ॥८॥

२०३५. विषयाचे अभिलाषें सबळ भेदु भासे । विषय लेशु तेथें मुक्ति केंवि वसे ॥१॥ विषय तृष्णा सांडी मग तूं साधन मांडी । वैराग्याचीं गोडी गुरूसी पुसे ॥२॥ स्त्रीपुरुष भावना भेदु भासे मना । तेथें ब्रह्मज्ञाना गमन कैंचें ॥३॥ कणुभरित जो डोळा शरीरासी दे दुःख । अणुमात्र विषय तो संसारदायक ॥४॥ शुद्धभाव तें वैराग्य आवडे । अति विषय विषयाधीन ते किडे ॥५॥ एकाजनार्दनीं निजज्ञानशक्ति । निर्विषय मन ते अभेद भक्ति ॥६॥

२०३६. भाविकांचें स्थान पंढरी पावन । अभाविकां जाण नावडे तें ॥१॥ ह्मणोनि चिंतन विठ्ठलाचें वाचे । अभाविकां साचें नावडे नाम ॥२॥ वैष्णवांचा संग नावडे कीर्तन । अभाविकांचा दुर्गुण हाची देखा ॥३॥ अभाविकांच्या संगें परमार्थ नावडे । एकाजनार्दनीं न घडे सेवा कांहीं ॥४॥

२०३७. नाशिवंत शरीर ओंगळ वोखटें । परी तया भेटे कर्म धर्म ॥१॥ अशाश्वत शाश्वत हेंचि उमगा मनीं । तया चक्रपाणी धांवे मागें ॥२॥ देहींचें देहपण देहाचिये माथां । कर्म धर्म सत्ता देहालागीं ३ एकाजनार्दनीं कर्म धर्म पाठीं । वांयां भ्रम पोटीं घेती जीव ४

२०३८. देहिंचेनी सुखें सुखावत । सुख सरतां दुःख पावत ॥१॥ ऐशी आहे बरोबरी । वांयां शीणतो निर्धारीं ॥२॥ सुख दुःख तें समान । मुळींचेच हे दोन्ही जाण ॥३॥ एकाजनार्दनीं सुखदुःख । अवघा जनार्दन एक ॥४॥

२०३९. देहबुद्धि जयापाशीं । पाप वसे त्या मानसीं ॥१॥ दोष जाणा अहंकार । तेणें सत्य हा संसार ॥२॥ समूळ अहंतेच्या नाशीं । ब्रह्मप्राप्ती होय त्यासी ॥३॥ एकाजनार्दनीं अहंकार । त्याग करावा सत्वर ॥४॥

२०४०. देव देहीं आहे सर्व ते म्हणती । जाणतिया न कळे गती देव नेणे ॥१॥ ऐसे ते भुलले देवा विसरले । तपताती वहिले करुनी कष्ट ॥२॥ देवाची ती भेटी नाहीं जाहली तया । शिणताती वांयां कर्महीन ॥३॥ एकाजनार्दनीं जवळीं असोनी देव । कल्पनेनें वाव केला मनें ॥४॥

२०४१. सर्वात्मक भरला देवो । तेथें न ठेविती भावो ॥१॥ ऐशीं भुललीं कर्मासी । आचरती तीं दोषासी ॥२॥ सर्वां ठाईं व्यापक हरी । कोण द्वेषी कोण वैरी ॥३॥ ऐसे अभागी ते हीन । भोगिताती जन्म पतन ॥४॥ नको ऐसें ब्रम्हज्ञान । एकाजनार्दनीं शरण ॥५॥

२०४२. देव सर्वांठायीं वसे । परि न दिसे अभाविकां ॥१॥ जळीं स्थळीं पाषाणीं भरला । रिता ठाव कोठें उरला ॥२॥ जिकडे पाहे तिकडे देव । अभाविकां दिसे वाव ॥३॥ एकाजनार्दनीं नाहीं भाव । तंव तया न दिसे देव ॥४॥

२०४३. लटिक्या भावाचें । देवपण नाहीं साचें ॥१॥ भाव नाहीं जेथें अंगीं । देव पहातां न दिसे जगीं ॥२॥ सर्वकाळ मनीं कुभाव । जैसा पाहे तैसा देव ॥३॥ लटिकी भंड फजिती । एकाजनार्दनीं निश्चिती ॥४॥

२०४४. देहीं असोनियां देव । वाउगा करिती संदेहो ॥१॥ जाय देवळासी स्वयें । मनीं आशा दुसरी वाहे ॥२॥ बैसोनी कीर्तनीं । लक्ष लावी सदा धनीं ॥३॥ करूं जाय तीर्थयात्रा । गोंविलें मन विचारा ॥४॥ ऐशियासी न भेटे देव । एकाजनार्दनीं नाहीं भाव ॥५॥

२०४५. ब्रह्म एक परिपूर्ण । तेथें नाहीं दोष गुण ॥१॥ पराचा देखती जे दोष । तेचि दोषी महा दोष ॥२॥ ब्रह्मीं नाहीं दोष गुण । पहाती ते मूर्ख जाण ॥३॥ जे गुण दोष देखती । एकाजनार्दनीं नाडती ॥४॥

२०४६. जीवाचें जीवन जनीं जनार्दन । नांदतो संपूर्ण सर्व देहीं ॥१॥ वाउगी कां वांयां शिणती बापुडीं । काय तयां जोडी

ह्यातीं लागे ॥२॥ पंचाग्नि साधन अथवा धूम्रपान । तेणें काय संपूर्ण हरि जोडे ॥३॥ एकाजनार्दनीं वाउगीं तीं तपें । मनाच्या संकल्पें हरी जोडे ॥४॥

२०४७. आशाबद्ध करिती देवाचें पूजन । तेणें नारायण तुष्ट नोहे ॥१॥ आशाबद्ध करिती वेदाचें पठण । तेणें नारायण तुष्ट नोहे ॥२॥ आशाबद्ध करिती पुराण श्रवण । तेणें नारायण तुष्ट नोहे ॥३॥ आशाबद्ध करिती दैवतउपासन । तेणें नारायण तुष्ट नोहे ॥४॥ आशाबद्ध करिती जप तप हवन । तेणें नारायण तुष्ट नोहे ॥५॥ निराशी करिती देवाचें कीर्तन । एकाजनार्दन तुष्ट होय ॥६॥

२०४८. भिक्षेलागीं पाणीपात्र । सांठवण उदर मात्र ॥१॥ सायंकाळीं प्रातःकाळासी । भिक्षा संग्रह नसावा निश्चयेंसी ॥२॥ संग्रह यत्नाचीया चाडा । मोहोळ बांधिती अवघा कडा ॥३॥ मोहळ झाडितां त्यासी । नाश होतो मासीयासी ॥४॥ सर्व मायीक पदार्थ । एकाजनार्दनीं परमार्थ ॥५॥

२०४९. होउनी विठोबाचा दास । करी आस दुजियाची ॥१॥ वांयां माता व्याली तया । भूभार कासया अवनीसी ॥२॥ पूर्वज तया कंटाळती । जन्मला म्हणती खर हा ॥३॥ एकाजनार्दनीं ह्मणे । तया पेणें यमलोकीं ॥४॥

२०५०. राहुनी पंढरी । आणिकाची आस करी ॥१॥ तो पातकी चांडाळ । खळाहुनी अमंगळ ॥२॥ सांडोनियां विठ्ठल देव । आणिकासी ह्मणे देव ॥३॥ सांडोनिया पुंडलिका । गाय आणिकासी देखा ॥४॥ ऐसा पातकी तो खळ । तयाचा न व्हावा विटाळ ॥५॥ ह्मणे जनार्दनाचा एका । तया तेथें ठेऊं नका ॥६॥

२०५१. हीन जे पामर नावडे वाचे नाम । सदा कामीं काम प्रपंचाचें ॥१॥ भोगिती यातना न सुटे कल्पकोडी । चौऱ्यांशींची बेडी दृढ पायीं ॥२॥ जैसें कर्म केलें तैसें फळ आलें । कुंथता वाहिले भार माथां ॥३॥ एकाजनार्दनीं संशय न धरावा । आला तो भोगावा विषमकाळ ॥४॥

२०५२. जन्मोनी प्राणी नाम न घेत वाचे । त्याचिया जन्मचें

व्यर्थ वोझें ॥१॥ प्रसवोनी तया वांझ ती जननी । बुडविलीं दोन्ही कुळें त्यानें ॥२॥ पूर्वज पतनीं पडती बेताळीस । नाम नये मुखास ऐसा प्राणी ॥३॥ एकाजनार्दनीं पतीत दुराचारी । यम तया अघोरीं घालितसे ॥४॥

२०५३. अभागी तो जाण । न करी विठ्ठलस्मरण ॥१॥ तया व्यालीसे जननी । अभागी तो पाप खाणी ॥२॥ न जाय पंढरपुरा । मांडी वेदांत पसारा ३ एकाजनार्दनीं ह्मणे । श्वानापरी जयाचें जिणें ४

२०५४. नरदेह प्रमाण शतवर्षे ह्मणती । अभागी घालविती वांयां जाण ॥१॥ न करी भजन न जाय पंढरी । अभाविक दुराचारी सदा मनीं ॥२॥ जनार्दनाचा एका न पाहे त्याचें मुख । नरदेहीं देख पशुवत ॥३॥

२०५५. अभागियां नावडे वैष्णवांचा संग । सदा तो उद्योग परनिंदेचा ॥१॥ ऐसे जे पामर भोगिती अघोर । सुटिका निर्धार नोहे त्यासी ॥२॥ जन्मोनी मरती पुन्हां जन्मा येती । होतसे फजिती मागें पुढें ॥३॥ एकाजनार्दनीं नरकाचें बिढार । यमाचें तें घर माहेर केलें ॥४॥

२०५६. ऐसें कृपण मनाचें । तें गा पंढरीसी न यचे ॥१॥ पापीयासी पंढरपुर । नावडे ऐसा निर्धार ॥२॥ महाज्ञान पापांडीया । नावडे कायावाचा जीवेंसी ॥३॥ विषयीं जो कुचाचारी । तया नावडे ज्ञानेश्वरी ॥४॥ अभक्तांसी संत भेटी । झाल्या नावडे ह्मणे चावटी ॥५॥ एकाजनार्दनीं ह्मणे देवा । तया दुरी मज ठेवा ॥६॥

२०५७. विषयीं जो लंपट । तया नावडे ही वाट । पंढरी सुभट । नावडेचि पापिष्टा ॥१॥ अमृत फळें पूर्ण आलीं । कां गा जैसी परी जाली । तैसीच हे चाली । पापिष्टाची जाणावी ॥२॥ धनलुब्धका नावडे धर्म । मद्यपिया नावडे कर्म । जारासी संतसमागम । नाठवेचि सर्वथा ॥३॥ स्त्रीलुब्ध परद्वारी । काय तया गीता निर्धारीं । एकाजनार्दनीं हरी । नको संग तयाचा ॥४॥

२०५८. ब्राह्मणाचें तीर्थ घेतां त्रास मोठा । प्रेमें पितो घोटा घटघट ॥१॥ हातें मोन्या उपशी कष्ट करी नाना । देवाच्या पूजना

माला देह चतुष्टयाची होळी ॥३॥ एकाजनार्दनीं देहा देखती मरण। गेला आला नाहीं तो तैसाचि जाण ॥४॥

२२४६. निमालीया देहासाठीं । रांडापोरें हाणती होटीं ॥१॥ तयासाठीं न रडती । आपुलें म्हणती कैसे होती ॥२॥ ऐसे भुलले पामर । नरक भोगिती अघोर ॥३॥ एका शरण जनार्दनीं । रामनाम न घेती कोण्ही ॥४॥

२२४७. मी मी ह्मणतां वांयां गेलें सर्व । पाहे तूं अपूर्व नवल बापा ॥१॥ रावण नासला मी पणें गेला । रामें क्षय केला पुत्रपौत्रीं ॥२॥ मीपणें दुर्योधन बहुत गर्वीत । नासलें जीवित रणांगणीं ३ ऐसे ते बहुत मीपणें नासले । एकाजनार्दनीं भलें मीपण राहित ४

२२४८. आहारे पामरा मीपण फुगारा । व्यर्थ कांरे भारा वागविसी ॥१॥ शस्त्राचेनि रोम वक्र नोहे अंगा । तया सहस्र भगा जाह्ले देखा ॥२॥ विष अग्नीचेनी मेळें । तया कांहीं न पोळे ॥३॥ एकाजनार्दनीं मन । देवापायीं केलें अर्पण ॥४॥

२२४९. मी म्हणोनियां भार वाहे । वाउगा जाय कुंथत ॥१॥ रात्रंदिवस जैसा खर । वोझें अपार वहातुसे ॥२॥ नावडे भजन पूजन कथा । संसाराची वाहे चिंता ॥३॥ आला आयुष्याचा काळ। परि न राहे तळमळ ॥४॥ आपण मरुनी आणिकां मारी । ऐसा नष्ट दुराचारी ५ एकाजनार्दनीं नाहीं भाव। तेथें न भेटेचि देव ॥६॥

२२५०. म्हणती नरदेह पावन । परी अत्यंत निंद्य जाण ॥१॥ जंव जन्मलेंचि नाहीं । तंव मरण लागलें पाहीं ॥२॥ देहीं देहासहसा । नित्य मृत्यु लागला सरिसा ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । तैं चुके जन्ममरण ॥४॥

२२५१. मनुष्य देहीं व्हावें ब्रह्मज्ञान । घेतो पुढिलें आमंत्रण ॥१॥ पुढें जन्माचा विसार । घेतो अतिमानें तो पामर ॥२॥ चौऱ्यांयशीं लक्ष योनीप्रती। कोटी कोटी फेरे होती ॥३॥ ऐसा मनुष्यदेह पावन । तो वेंची विषयाकारण ॥४॥ होतां विषयीं वासना । नाठवीची एकाजनार्दना ॥५॥

२२५२. नाशिवंत देह नाशिवंत माया । नाशिवंत काया काय

काज ॥१॥ यमाचा पाहुणा जाणार जाणार । काय उपचार करूनि वांयां ॥२॥ छायेसी बैसला सर्वेचि तो गेला । वृक्ष रडूं लागला गेला म्हणोनी ॥३॥ पांथस्थ मार्गस्थ येउनी राहिला । उदय होतां निघाला आपुल्या मार्गे ॥४॥ तो घरधनी रडत धांवे मागें । काय काज वेगें सांगा तुम्ही ॥५॥ उसनें आणितां सुख वाटे जीवा । देतां दुःख जीवा काय काज ॥६॥ पाहुणा हा देह जाईल टाकुनी । एकाजनार्दनीं काय दुःख ॥७॥

२२५३. हें शरीर नाशिवंत साचें । जायाचें हो जायाचें अंतकाळीं ॥१॥ काय याचें सुख मानिती हे जन । पडिलेसे जाण मायाचक्रीं ॥२॥ संसाराचा या करिती विचार । भुलले पामर अधोगती ३ एकाजनार्दनीं पायाची भ्रमती । पुढें ती फजिती नेणवेचि ॥४॥

२२५४. नाशिवंत देह नाशिवंत माया । नाशिवंत छाया वांयां जैशी ॥१॥ मृगजळाचे परी नाशिवंत धन । यासी तूं भुलून गुंतलासी ॥२॥ व्यापारीं बाजारीं घातिलें दुकान । स्त्री पुत्र स्वजन तैसे बापा ३ एकाजनार्दनीं ऐशियाच्या छंदा । भुलोनी गोविंदा विसरसी४

२२५५. क्षणभंगुर देह । याचा मानिती संदेह ॥१॥ उदकावरील तरंग । तैसें दिसे सर्व जग ॥२॥ पाहतां मृगजळा । जळ नोहेची निर्मळा ॥३॥ साउली अभ्राची । वांयां जाय जैसी ॥४॥ करितां लवण पुतळा । विरे जैसा मिळतां जळा ॥५॥ एकाजनार्दनीं तैसें । दिसतां देह नासे जैसें ॥६॥

२२५६. असत्याचें मूळ नरदेह साचें । वांयां काय याचें कवतूक ॥१॥ हरिनाम सारें सेवीं तूं निर्धारें । आणीक पसार शीण वांयां २ एकाजनार्दनीं मृगजळ वोखटें । दिसे तें गोमटें तृषा न हारे ३

२२५७. जाणतां जाणतां कां रे वेडा होसी । नाथिल्याच्या पिसीं हांव भरी ॥१॥ दोन दिवसांचे उसणे व्यापारी । काय त्यांची थोरी मानितोसी ॥२॥ दिवसाची छाया पूर्व पश्चिमेसी । तैशी या देहाची स्थिति जाणा ॥३॥ एकाजनार्दनीं हरिकृपेंवीण । दावील ही खूण कोण बापा ॥४॥

२२५८. देहींच्या अवसाना । कोणी कामा नये कोण्हा ॥१॥ हे

तों मिळाले अपार । अवघा मायेचा बाजार ॥२॥ तुजसाठीं शोक । कोण्ही न करतीच दुःख ॥३॥ रडती पडती । पुढें कैसें होईल ह्मणती ॥४॥ आपुलीया हिता । रडती जना देखतां ॥५॥ याचें मानूं नको खरें । एकाजनार्दनीं त्वरें ॥६॥

२२५९. नका करूं वाद विवाद पसारा । वाउगा मातेरा नरदेहीं ॥१॥ आयुष्याचे अंतीं कामा नये कोणी । नेती ढकलुनी एकलेंचि ॥२॥ स्वजन स्वगोत्र नये कोणी कामा । सांडी त्यांचा प्रेमा परता होई ॥३॥ एकाजनार्दनीं मधाचीये मासी । तैसा सांपडसी यमफांशीं कोण सोडी ॥४॥

२२६०. कां रे भांबावसी नास्तिकासाठीं । कोरडी कां आटी करसी वांयां ॥१॥ हें तों पोसणें आणिलें उसणें । जयाचें तया देणें अनायासें २ घ्यावें त्याचें द्यावें ऐशी आहे नीत । तूं रे दुश्चित वाउगा मनीं ॥३॥ न देतां तरी देणें आहे केव्हां । वाउगा तो हेवा धरती पोटीं ४ एकाजनार्दनीं भरतां मापोडी । पडतसे उडी खालीं मग ॥५॥

२२६१. अस्थिमांसाचा हा कोथळा । ऐसा देह अमंगळा १ प्राणी ह्मणती माझें माझें । खर जैसें वाहे वोझें ॥२॥ न कंटाळे कधीं मन । जेवीं भुले सर्प जाण ॥३॥ एकाजनार्दनीं देवा । याचा विसर पाडावा ॥४॥

२२६२. मिळती सख्या माया बहिणी । हातीं घेउनी तेलफणी १ जंव आहे शरीर चांग । तंव काढिताती चांग भांग ॥२॥ नासलिया शरीरातें । टाकिताती तया परतें ॥३॥ पहा देहीं देव असतां । नाहीं ह्मणती सर्वथा ४ एकाजनार्दनीं पंचत्व । मग ह्मणती भूतभूत ५

२२६३. देहींचें आयुष्य पूर्ण तें भरलें । मग नाहीं उरलें मागील कांहीं ॥१॥ देहीं देह आहे तोंवरी अहंता । निमालिया तत्त्वतां वाव सर्व २ देहीं देहपणें मी मी माझें ह्मणे । मिथ्या सर्व जाणे देहाअंतीं ३ एकाजनार्दनीं मिथ्या देह आहे । रामनाम वाहे सत्वराभरीत ४

२२६४. ह्मणती नरदेह पावन । परी अत्यंत निंद्य जाण ॥१॥ योनिद्वारें ज्याचें जनन । सर्वेची मरण लागलेंसे ॥२॥ जंव जन्मलेंचि नाहीं । तंव तें मरण लागलें पाही ॥३॥ गर्भाच्याही ठायीं

ए. ३६

भेवो । मरण भावो न चुकेची ॥४॥ एकाजनार्दनीं नाहीं मरण । तेथें नाहीं जनन येणें जाणें ॥५॥

२२६५. स्वप्नामाजी बंधन । जागृतीं पाहतां लटिकें स्वप्न ॥१॥ ऐशी जाणा देहस्थिती । जागृती स्वप्न तें भास चित्तीं ॥२॥ जागृतीं धरितां भाव । स्वप्नीं दिसे तो प्रकाश ॥३॥ जागृती स्वप्न दोन्ही पाही । एकाजनार्दनाचे पायीं ॥४॥

२२६६. स्वप्नामाजी अनिरुद्धें देखिलीसे उखा । तयालागीं घेउनी गेली चित्ररेखा ॥१॥ तया सोडवण्या हरी । धांव घेतसे झडकरी ॥२॥ पाहे स्वप्नाचेनी कांतें । अनिरुद्धा केलेंसे निरुतें ॥३॥ स्वप्नींची देखे सारा । एकाजनार्दनीं पसारा ॥४॥

२२६७. आत्मा तो देहीं नाशिवंत नाहीं। अशाश्वत पाहीं कलेवर ॥१॥ समजोनी उमजोनि झांकिती डोळे। बळेंचि अंधळे होती मूर्ख २ मरणाचे हावे एकमेकां बोलती । गेला गेला ह्मणती असोनी जवळीं ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसे ते अंध । भुलले मतिमंद भ्रांतियोगें ॥४॥

२२६८. उलट भावना पालट मनाची । कायावाचा देहाची स्थिति एक ॥१॥ होणार तें होय देहाचें पतन। तेथें कोणा कमीपण येतें जातें ॥२॥ आणिलें जयाचें तें देणेंचि आहे । सोस वाउगा वाहे काय फळ ३ एकाजनार्दनीं वाउगा पसार। व्यर्थ हांवभर प्राणी जाहलें४

२२६९. धरिसी देहाची तूं आशा । तेणें फांसा पडशील ॥१॥ सोडविता नाहीं कोण्ही । पाहें विचारूनि मनामाजी ॥२॥ येती तैसे सर्वेचि जाती । व्यर्थ कुंथती माझें माझें ॥३॥ एकाजनार्दनीं पैलपार । तरसी निर्धार विठ्ठलनामें ॥४॥

२२७०. वांयांची आयुष्य जातसे खरें । उपाय तो बरे हरी एक ॥१॥ अवघा वेळ अवघा काळ । नका पोकळ घालवूं ॥२॥ जे जे घडी जे जे वेळीं । करा कल्लोळीं हरिकथा ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । भजा अनुदिनीं संतांसी ॥४॥

२२७१. देहाची ममता न धरी साचार । करी कांरे विचार पैलथडी ॥१॥ भरिला भरिला सागर भरिला । उतरी कांरे वहिला संतसंगें ॥२॥ नामाची सांगडी बांधीत निर्धारें । तेणें पैलपार तरसी

देखा ३ सांगड नामाची धरी प्रेमभावें । संतां शरण जावें एकविधा ॥४॥ एकाजनार्दनीं शरण गेलिया । कळिकाळ पायां वंदी यम ॥५॥

२२७२. नरदेहीं आयुष्य गमाविलें सारें । परी रामभजन खरें केलें नाहीं ॥१॥ ऐसे जे अभागी पावती पतनीं। तया सोडवणी कोण करी ॥२॥ एकाजनार्दनीं मानी हा विचार। राम चराचर जप करीं ३

२२७३. प्रपंचीं गुंतती । बळें माझें माझें ह्मणती ॥१॥ ऐसे अभागी ते खर । नेणे विचार सारासार ॥२॥ चिखलीं रुतती । आणिकातें धांवा ह्मणती ॥३॥ बळें कृशान पदरीं । बांधिताती दुराचारी ॥४॥ कुंथाकुंथी बळें । यम मारीतसे सळें ॥५॥ शरण जनार्दना । कोण्हा नोहेचि वासना ॥६॥ जनार्दनाचा एका। बोल बोलतसे देखा ॥७॥

२२७४. प्रपंचाचा भार वाहातसे खर । न कळे विचार साधनाचा ॥१॥ गुंतलासे मीन गळाचिये परी । आमीष देखोनी वरी गिळीतसे २ टाळी लाऊनियां बैसला सेवक। तैसाचि तो देख नामहीन ३ आवडी आदरें न ये नाममुखीं। एकाजनार्दनीं सुखी केवीं होय४

२२७५. न कळेची मूढा सुखाची ती गोडी । पायीं पडली बेडी प्रपंचाची ॥१॥ पाम लागलिया गूळ न ह्मणे गोड । तैसे ते मूढ विसरले नाम ॥२॥ शुद्ध वैराग्याचा मानिती कंटाळा । पाळिती अमंगळा प्रपंचासी ॥३॥ एकाजनार्दनीं नाहीं भाव खरा । तया त्या पामरा सांगुनी काय ॥४॥

२२७६. भासतसे दोर विखाराचे परी । तैसीच हे थोरी प्रपंचाची ॥१॥ भुलले भुलले प्रपंचीं गुंतले। वांयांची उगले बोल कां हे ॥२॥ श्वानाचियेपरी मागें पुढें पाहे। माझा म्हणोनी वाह्यां कवटाळिती ॥३॥ एकाजनार्दनीं अवकाळीं मेघ। तैसा प्रपंचीं दंभ लटिकाची ४

२२७७. प्रपंच आमिष गुंतशील गळीं । शेवटीं तळमळी होईल रया ॥१॥ स्त्रीपुत्र धन हें केवळ जाळें । गुंतशील बळें यांत रया २ पुढील विचार धरी कांहीं सोय । संतसंग लाहें अरे मूढा ॥३॥ एकाजनार्दनीं सत्संगावांचुनी । कोण निर्वाणीं तारील तुज ॥४॥

२२७८. बाळ तरुण वृद्ध ऐसे ते पाहिले । पाहुनी निमाले

देखसी रया ॥१॥ प्रपंच काबाड कोंबड्याचे परी । पुढेंचि उकरी लाभ नाहीं ॥२॥ तुज सुख दुःख मागील आठव । आतां भाकीं कींव कांहीं रया ॥३॥ एकाजनार्दनीं अहा रांडलेका । भोगिसी अनेका योनी रया ॥४॥

२२७९. जाणते नेणते दोघेही गुंतती । वांयां कुंथाकुंथी करिती रया ॥१॥ प्रपंच व्यसन न चुके पामरा । करती येरझारा न चुके रया ॥२॥ वोढाळ सांपडतां बांधिती दावणी । कोण करुणावचनीं सोडी रया ॥३॥ एकाजनार्दनीं करितां प्रयाणा । नाहीं ती करुणा यमासी रया ॥४॥

२२८०. ऐशी प्रपंचाची गोडी । जन्ममरण घेती कोडी ॥१॥ नाहीं तया कांहीं धाक । जन्म मरणाचा देख ॥२॥ आलिया देहासी । नाठविती हृदयस्थासी ॥३॥ जरा आलिया निकटीं । करी प्रपंचाची राहटी ॥४॥ एकाजनार्दनीं शरण । नायकती मूर्ख जन ॥५॥

२२८१. दीपाचिया अंगसंगा । कोण सुख आहे पतंगा ॥१॥ दीपा रूपाचेनि कोडें । पतंग स्नेहांत उडी पडे ॥२॥ एक निमाले देखती । दुजा उडी घाली अवचित्तीं ॥३॥ ऐशीं भुललीं बापुडीं । एकाजनार्दनीं धरूनि गोडी ॥४॥

२२८२. काळ आलारे जवळीं । वाचे जपें नामावळी ॥१॥ अंतकाळीं जाण । तुज होईल बंधन ॥२॥ नको गुंतूं संसारा । चुकवीं जन्ममरण फेरा ॥३॥ कोणी कोणाचे न सांगाती । अवघे सुखाचेच होती ॥४॥ एकाजनार्दनीं शरण । कायावाचामनें जाण ५

२२८३. संसार पसर करिसी तळमळ । कां रे घननीळ नाठविसी ॥१॥ पुत्रदाराधन कवण हे कवणाचें । आहे तोंवरी माझें माझें ह्मणती ॥२॥ लटिका प्रपंच सर्व नाशिवंत । एक हें शाश्वत हरिनाम ३ ह्मणे जनार्दन एकनाथा घेईं । प्रेमसुख पाहीं पावशील ४

२२८४. अवघे सुखाचे सांगाती । दुःख देखतां पळती ॥१॥ सुख देखोनि ह्मणती माझें । दुःख देखतां पळती वोजें ॥२॥ यापरि अवघें लटिकें देख । एकाजनार्दनीं पाहे सुख ॥३॥

२२८५. नरदेहा येऊनि गमावी आयुष्य । धरीना विश्वास रामनामीं ॥१॥ अंतकाळीं तया कोणी नये कामा । वाउगाचि श्रमा पडतो डोहीं ॥२॥ माझें माझें म्हणोनियां कवटाळितो बाहीं । प्रपंच प्रवाहीं धांव घाली ॥३॥ एकाजनार्दनीं करितां कल्पना । गेलासे पतना यमलोकीं ॥४॥

२२८६. कां रे नागवीसी दिवसाचे चोरी । प्रपंच भोंवरीं पडसी रया ॥१॥ वाचे नाम गाय वाचे नाम गाय । नाम न गातां होय दुःख रया ॥२॥ सुख दुःखें दोन्ही भातुकी असती । प्रपंचाचे अंतीं भोगिसी रया ॥३॥ रामनाम वाचे सदा गात जाय । न धरीं तूं हाय वाउगी रया ॥४॥ एकाजनार्दनीं किती सांगूं मूढा । वांयां तूं दगडा भूमीभार ॥५॥

२२८७. कां रे हावभरी जाहलासी पामरा । भार वाहसी खरा प्रपंचाचा ॥१॥ नाम श्रीरामाचें नित्य घेई वाचे । तुटेल जन्माचें दुःख जाण ॥२॥ यातना यमाची दुःखाची परवडी । नामें धरी गोडी आवडीनें ॥३॥ एकाजनार्दनीं नायकसी मूढा । अहा रे दगडा धर्मलंडा ॥४॥

२२८८. भक्ती नाहीं नामीं तो चांडाळ पतीत । तोची जाणावा कुश्चित नष्ट येथें ॥१॥ प्रपंच कर्दमीं बुडोनियां ठेले । संतांविण उगले फजीत होती ॥२॥ पुत्र मित्र कांता मानुनी भरंवसा । याचा मोहफांसा जन्मवरी ॥३॥ एकाजनार्दनीं अंतीं आहे कोण । न कळे संतांविण निश्चयेंसी ॥४॥

२२८९. नवल देखिलें संसाराचें बंड । त्याचें कोणी तोंड न ठेंचिती ॥१॥ गुंतलेची बळें चिखलें माखलें । कर्मी जन्मफळें भोगिताती ॥२॥ नाथिला पसारा मानिती तो साचा । वेध हो तयाचा वागविती ३ एकाजनार्दनीं नाडलेसे मोहें । संदेह संदेहें गोंवियलें ४

२२९०. वाउगाची पसारा । कां रे वाढविला गव्हारा ॥१॥ म्हणसी माझें माझें । अंतीं कोण आहे तुझें ॥२॥ भुललासी वांयां । गमाविसी व्यर्थ काया ॥३॥ कोण हें कोणाचें । एकाजनार्दनीं साचें ४

२२९१. वाउगाची शीण करिसी सर्वथा । चुकसी परमार्था मूढा जाण ॥१॥ किती करिसी सोस माझें माझें म्हणोनी । शेवटीं बंधनीं

पडसी मूढा ॥२॥ अंतकाळीं कोणी नाहीं रे सांगाती । होईल फजिती तुझी तुला ॥३॥ एकाजनार्दनीं वाउगाचि धंदा । त्यजूनि गोविंदा सेवी बापा ॥४॥

२२९२. उपजोनि प्राणी गुंतला संसारीं । आपुला आपण वैरी होय रया ॥१॥ न कळे पामरा नरकाचें तें मूळ । विषय सुख अमंगळ भोगी रया ॥२॥ नाथिलिया प्रपंचा गुंतला बराडी । सैर वोढावोढी होईल रया ॥३॥ न कळे तयासी जाहला बुद्धीहीन । माझें माझें कवळोन रडे रया ॥४॥ एकाजनार्दनीं अभागी पामर । भोगिती अघोर नरक रया ॥५॥

२२९३. दुःखाच्या खडकीं आदळती प्राणी । परि संसाराचा मनीं वीट नये ॥१॥ कामाचीया लाटें कर्दमाचे पुरीं । बुडे तरी हाव धरी अधिकची ॥२॥ वारितां नायके भ्रमलासे कीर । सांपडे सत्वर पारधीया ॥३॥ एकाजनार्दनीं यमाचीया फांसां । पडेल तो सहसा न कळे मूढा ॥४॥

२२९४. सर्पे धावोनी धरिल्या तोंडीं । सर्वांगा घालितसे वेढी ॥१॥ सर्प बाधेची सांकडी । निवारी मंत्रवादी गारुडी ॥२॥ रिघतां सद्गुरूसी शरण । जेणें निरसे जन्ममरण ॥३॥ संसार सर्प मिथ्या देहीं । एकाजनार्दनीं सदा ध्याई ॥४॥

२२९५. अशाश्वत देह जाईल जाईल । वांयांचि गमाविल अभागी तो ॥१॥ नये मुखीं कदा श्रीरामचरित्र । वांयांचि पैं वक्त्र जल्पे सदा ॥२॥ दिननिशीं करी संसाराचा धंदा । नाठवी गोविंदा मूढ कांहीं ॥३॥ एकाजनार्दनीं अभागी तो खरा । तपाच्या डोंगरा हाव धरी ॥४॥

२२९६. भजन करितां लाजतो पामर । संसारीं चित्त स्थिर सदा नाहे ॥१॥ तीर्थयात्रे जाय संसार चिंता वाहे । पुराण कीर्तनीये निद्रा बळें ॥२॥ ऐसा तो पापिष्ठ कर्म तें सबळ । एकाजनार्दनीं म्हणे दोषी अमंगळ ॥३॥

२२९७. मधाचिया गोडा गुंतले किडाळीं । तैशी परवडी संसारांची ॥१॥ वाउगाची सोस रचिलीया कंद । म्हणूनि नेतां वेध

मक्षिकेसी ॥२॥ एकाजनार्दनीं विचारीं मानसीं । वांयां भवपाशीं गुंतूं नको ॥३॥

२२९८. पाहतो देखतो कानीं जें ऐकतो । परी सदाचि पहातो संसार मनीं ॥१॥ मीनाचीये परी गुंतलासे जळीं । परी संसारा कवळी अधम तो ॥२॥ दानधर्म कांहीं न वेंचे आडका । रुक्यासाठीं थडका घेत असे ॥३॥ एकाजनार्दनीं संसारावेगळा । कैं मी गोपाळा होईन साचा ॥४॥

२२९९. भरला तो हावे ह्मणे माझें माझें । वाहातसे ओझें संसाराचें ॥१॥ कुंथत कुंथत वेरझारा करी । खराचीये परी पृष्ठीं वाहे ॥२॥ न मिळेचि अन्न बहुत आपदा । परी त्या गोविंदा स्मरेचिना ॥३॥ ऐसे जन्मोनियां दास संसाराचे । एकाजनार्दनीं त्याचें तोंड काळें ॥४॥

२३००. न कळे पामरा कांहीं हा विचार । भोगावे अघोर किती जन्म १ मरुनी जन्मावें मरूनि जन्मावें । पुनरपि मरावें वेरझारीं २ एकाजनार्दनीं न मानीं विश्वास । दृढ धरी पाश संसाराचा ॥३॥

२३०१. पाहतां पाहतां नेत्र गेले । परी भुललोंसे मेळे संसाराच्या ॥१॥ जाउनी धरितों माझें म्हणोनियां । परी ते वांयां जाती सर्व ॥२॥ विषय भोगितों गर्दभाचे रीतीं । लाभ तो निश्चिती लत्ताप्रहर ॥३॥ एकाजनार्दनीं मंडूकाचे परी । वटवट खरी संसारीं ते ॥४॥

२३०२. पिसाळलें श्वान पाणीयासी बीहे । तैसा नरदेह संसारासी ॥१॥ वाउगाची शीण पावती पतन । नेणे आपुलें निदान भुलला वांयां ॥२॥ मर्कटासी जेवीं मदिरा पाजिली । भूतबाधा झाली तयावरी ॥३॥ सैरावैरा नाचें कोण न तया हांसे । एकाजनार्दनीं तैसे मनुष्यदेहीं ॥४॥

२३०३. अवघें आयुष्य काळाधीन जाहलें । परी चित्त त गुंतलें संसारांत ॥१॥ सापें दर्दूर गिळियेला मुखीं । तेणेंचि तो शेखीं मक्षिका धरी ॥२॥ ऐसे हावभरीं प्राणी पैं नाडले । ह्मणती माझे वहिले कन्यापुत्र ॥३॥ एकाजनार्दनीं मृगजळाची आशा । पडे तेणें फांसा गळा बळें ॥४॥

२३०४. काय सुख आहे संसारीं । म्हणोनी भरलासी हाव भरी । वाचे स्मरे श्रीहरी । दिननिशीं प्रपंचीं ॥१॥ जन्म जाहलीयापासून । सदा संसाराचें ध्यान । नाहीं कधीं आठवण । न ये मुखीं रामनाम ॥२॥ ऐसा भार वाही खर । परि तया न कळे साचार । आहे पुढें यातना अघोर । हें कांहीं नाठवी ॥३॥ ऐसें होतां भरलें आयुष्य । मृत्यु पुन्हां येत जन्मास । ऐशा भोगी चौऱ्यांयशीं निःशेष । एकाजनार्दनीं ह्मणे त्यास लाज नाहीं ॥४॥

२३०५. अशाश्वतासाठीं । कां रे देवासवें तुटी ॥१॥ अंतकाळींचें बंधन । कोण निवारी पतन ॥२॥ तूं म्हणसी हें माझें । खरा ऐसें वाहसी वोझें ॥३॥ पावलीया अवसानीं । कोणी नाहीं वा निर्वाणीं ॥४॥ याचा न धरीं विश्वास । एकाजनार्दनाचा दास ॥५॥

२३०६. उघडा अनुभव असोनियां देहीं । वांयांचि प्रवाहीं कां पडसी ॥१॥ संसार दुस्तर कूप हा निर्धार । पडतां अंधकार सुटे जाण २ भ्रमतां भ्रमतां नयेचि बाहेरी । चौऱ्यांयशीं फेरी पुनः पुनः ३ एकाजनार्दनीं नको हा विचार । वांयां फाजितखोर होशी बापा ४

२३०७. नेणतां नेणतां कां रे अंध होशी । माझें म्हणविशी कां रे बळें ॥१॥ तूं कोण कोठील आहेसी कोणाचा । शिणतोसी साचा मी माझें म्हणुनी ॥२॥ रहाट माळ जैसी जात येत वरी । तैशीच हे परी जन्म देहीं ॥३॥ एकाजनार्दनीं करी कां विचार । वांयां हावभर फिरूं नको ॥४॥

२३०८. गुंतला सर्प भुलला नादा । तैशी प्राणियासी आपदा संसाराची ॥१॥ सदा तळमळ मन नाहीं स्थिर । भोगिती अघोर जन्मोजन्मीं ॥२॥ नळिका यंत्रामाजी सांपडे वानर । संसारीं तो नर तैसा गुंते ॥३॥ एकाजनार्दनीं करितां नाना युक्ती । मागें ही फजिती पुढें होती ॥४॥

२३०९. कासयासी मूढा करिती संसार । पुढें तो अघोर थोर आहे ॥१॥ बळेंचि कां रे नागवसी पहातां । विषय भोग भोगितां दुःख बहु ॥२॥ पातकाची राशी हे तों कन्यापुत्र । तूं कां रे पवित्र त्यासी म्हणसी ॥३॥ एकाजनार्दनीं नाशिवंतासाठीं । देवासवें तुटी पाडितोसी ॥४॥

२३१०. **वांयांचि भुली पडली गव्हारा** । भ्रमशी भोंवरां संसाराच्या ॥१॥ कां रे सावध न होशी मूढा । शिणशी दगडा फजितखोरा ॥२॥ गुंतुनी पडसी वाउग्या व्यसनीं । संसार घसणीं चौऱ्यांयशींच्या ॥३॥ एकाजनार्दनीं किती हें सांगावें । जाणत जाणत नागवे निलाजिरा ॥४॥

२३११. आमिष लाउनी मीनातें गोंविती । तैसी संसारस्थिति जाणें बापा ॥१॥ पान लागलिया गूळ न ह्मणे गोड । नामामृतीं चाड न धरती ॥२॥ पहाती डोळां देखती प्रकार । परि विषयाचा आदर न सांडिती ॥३॥ माझें माझें ह्मणोनी दृढ धरिताती । एकाजनार्दनीं भोगिती चौऱ्यांयशीं ॥४॥

२३१२. **संसाराचें सुख कोण पैं सांगती** । होत आहे फजिती लहानथोरां ॥१॥ सर्पें मंडूक धरिलासे मुखीं । तेणें पैं शेखीं मक्षिका धरी ॥२॥ मरती बापुडीं हांव धरती गोडी । तरी तीं वेडीं नागवती ॥३॥ एकाजनार्दनीं न धरी सोय । वांयांचि धांवो जाय हांव भरी ॥४॥

२३१३. **काय ऐसा यासी मानला विचार** । संसार पसर गोड वाटे ॥१॥ बुडतां देखती आणिकांसी डोळे । परि तुमचे अंधळे बळें होती ॥२॥ सायासें शिणती माझें ह्मणोनियां । एकाजनार्दनीं वांयां जाती हीन ॥३॥

२३१४. **मक्षिकेनें जैसा रचियेला कंद** । वाउगाची वेध तैशापरी ॥१॥ आणिकें झाडितां गुंतोनि पडती । तैशी ही फजिती संसाराची ॥२॥ एकाजनार्दनीं कृपा न करी देव । तोंवरी अभाव सर्व जाणा ॥३॥

२३१५. **स्वप्नवत संसार मानी हा निर्धार** । अशाश्वत जाणार छाया जैशी ॥१॥ मृगजळ नाथिलें दिसतसे जळ । पहा हो प्रबळ पटळ मेघ जैसे ॥२॥ एकाजनार्दनीं वाउगा आभास । देवाविण सौरस वाउगा भासे ॥३॥

२३१६. **वाउगाचि सोस वहाताती वोझें** । ह्मणती माझें माझें हीन भाग्य ॥१॥ जाणती नेणती राहाटी देखती । मरती रडती देखती त्या ॥२॥ एकाजनार्दनीं भुलले ते वांयां । परि देवराया शरण न जाती ॥३॥

२३१७. **घरसी संसाराची हाव** । माझें माझें ह्मणशी सर्व । हें तंव कोणाचें वैभव । तुज न कळे पामरा ॥१॥ आयुष्यमान जंव आहे । तंव सर्वां होशी साह्य । अंतकाळीं पाहें । कोणी कामा न येती ॥२॥ तुज जे ह्मणती उत्तम । त्यांचा तुज मोठा भ्रम । अंतकाळीं पावशी श्रम । एकलाचि पामरा ॥३॥ ह्मणोनि सर्व भावें हरी । स्मरण करी निरंतरीं । एकाजनार्दनीं निर्धारीं । नाम स्मरे वेळोवेळां ॥४॥

२३१८. **छाया पैं वृक्षाची बैसतां सुख** । तैसा संसार देख प्राणीमाला ॥१॥ गुंडती बळें गुंडती बळें । माझें माझें सळें काळ तोंडें ॥२॥ असतां बरवी करिती आणिक सेवा । आवडली या देवा धांवें ह्मणती ॥३॥ ऐसा काळतोंडा जनीं जाला वेडा । एकाजनार्दनीं रेडा पशुजन्मीं ॥४॥

२३१९. **सुखावोनि पतंग दीपावरी पडे** । परि शेवटीं जोडे देह अंत ॥१॥ तैसे प्राणीमात्र संसारीं भुलले । कष्ट ते उगले करिताती २ भिलाव्याचे परि प्रपंच गोमटा । परी काढी चपेटा अंतरींचा ॥३॥ एकाजनार्दनीं भुलले पामर । वांयां नरक घोर भोगिताती ॥४॥

२३२०. मिथ्या हा संसार । अवघा मायेचा बाजार ॥१॥ स्त्रिया पुत्रधन । हें तों सर्व मायिक जाण ॥२॥ यांत गुंतूं नको नरा । न करी आयुष्य मातेरा ॥३॥ वाचे वदे हरिहर । करी ध्यान निरंतर ॥४॥ एकाजनार्दनीं नरा । नित्य भजे हरिहरा ॥५॥

२३२१. **कोणाचें घरदार मृगजळ संसार** । तुझा तूं विचार करीं बापा ॥१॥ सोयरा तूं देव करी पा संसारीं । वांयां हाव भरी होऊं नको ॥२॥ द्वैत अद्वैत टाकुनी परतें । होई पां सरता देवापायीं ॥३॥ एकाजनार्दनीं देवाविण तुज । राखील पां सहज कोण दुजा ॥४॥

२३२२. **कोण हरी आतां संसाराचा छंद** । न स्मरतां गोविंद दुःख बहु ॥१॥ शाहाणे बुडती शाहाणे बुडती । शाहाणे बुडती भवडोहीं ॥२॥ तत्त्वज्ञानाच्या सांगताती गोष्टी । परि संसार हिंपुटी होती मूढ ॥३॥ एकाजनार्दनीं संसाराचा छंद । टाकुनी गोविंद भजे कां रे ॥४॥

२३२३. **संसार सागरीं बुडालिया प्राणी** । करी सोडवणी कोण

त्याची ॥१॥ अविद्यादि पंचक्लेश हे तरंग । बुडालें सर्वांग प्राणि-याचें ॥२॥ भ्रमाच्या आवर्तामाजी सांपडला । सोडवी तयाला कोण आतां ॥३॥ स्त्रियापुत्र आप्त बंधु हे सोयरे । ओढिताती सारे मत्स्याऐसीं ॥४॥ प्रपंच या कामें पसरिलें जाळें । त्यामाजी गुंतले प्राणी जात ॥५॥ एकाजनार्दनीं उच्चारील नाम । सुखाचा आराम प्राप्त होय ॥६॥

२३२४. फट गाढवाच्या लेका । संसार केला फुका ॥ ध्रु० ॥ खटपट करितां खटपट करितां गेला सारा वेळ । रामनाम घेतां तुझी बैसे दांतखीळ ॥१॥ कैंचा आपा कैंचा बापा कैंचा मामा काका । कैंची आई कैंची ताई कैंची बहीण आका ॥२॥ कैंचें घर कैंचें दार भुललासी फुका । कैंची सासू कैंची बाईल त्यांनीं नेला पैका ॥३॥ बारा सोळा मुलें झालीं त्याला झाले नातु । द्रव्य होतें तें राहुनी गेलें कंबरेवर हातु ॥४॥ एकाजनार्दनीं हाणे हा संसार खोटा । हरिस्मरण करा कधीं नये तोटा ॥५॥

२३२५. किती वेळां जन्म किती वेळां मृत्यु । ह्याचि न कळे अंतु भाग्यहीनां ॥१॥ जन्मोनी संसार मानितो बरवा । परि या राघवा शरण न जाय ॥२॥ पावलिया मरण सहज नरक कुंडीं । कोण तया सोडी अधमासी ॥३॥ स्वप्नामाजी नेणें परमार्थ मानसीं । सदा चौऱ्यांयशीं फेरे भोगी ॥४॥ एकाजनार्दनीं नोहेचि सुटिका । भाग्यहीन देखा मरे जन्मे ॥५॥

२३२६. मृगजळाच्या पुरीं गुंतसी पामरा । कोण तुज निर्धारा सोडवील ॥१॥ पडसी पतनीं चौऱ्यांयशीं आवर्ती । तेव्हां तुझी गती कैशी होय ॥२॥ जीवीं जीवपण शिवीं शिवपण । वेगळें तें जाण दोन्ही होती ॥३॥ यातना अनंत तुज भोगविती । तेथें काकुलती कोणा ऐशी ॥४॥ यमाचे ते दूत मारिती पामरा । फेरे संसारा न चुकशी ॥५॥ एकाजनार्दनीं सांगतो विचार । रामनामें परिकर जप करीं ॥६॥

२३२७. संसारीं तरले बोलती तें कुडें । जाती ते बापुडे अधोगती ॥१॥ नेणती आचार विचार स्वधर्म । करताती कर्म मना

तैसें ॥२॥ न तरती भवसागरीं बुडती ह्व्यासें । लागतसे पिसें धन आशा ॥३॥ एकाजनार्दनीं आशा हे सांडोनी । गोविंद चरणीं मिठी घाला ॥४॥

२३२८. आपुलें पारखें सांगतां नायकती । करितसे खंती संसाराची ॥१॥ काय संसाराचें सुख तें तयासी । कोण फांसा फांसी चुकवील ॥२॥ कधीं रामनाम नाठवी पामर । भोगितो अघोर जन्म कोटी ॥३॥ एकाजनार्दनीं एकपणें शरण । जनीं जना-र्दन आज्ञा आहे ॥४॥

२३२९. देह नाशिवंत अभ्रींची साउली । तैशी परी बोली संसाराची ॥१॥ जळगारीं जैसें उदक नाथिलें । कीं मृगजळ पस-रलें चहूंकडे ॥२॥ पुरुषाची छाया वाउगाचि भास । चोराचा पैं लेश काय तेथें ॥३॥ रज्जु देखतांचि भासतसे सर्प । एकाजना-र्दनीं दर्प संसाराचा ॥४॥

२३३०. वांयांचि कासया करितां आटाआटी । क्षणें पाडा तुटी संसारासी ॥१॥ संसार कर्दमीं गुंतलेती वाया । किती वेळां खेपा कराव्या त्या ॥२॥ मरावें जन्मावें मरावें जन्मावें । खंडन केव्हां व्हावें न धरा शुद्धि ॥३॥ एकाजनार्दनीं किती तें सांगावें । नायकती द्दावे भरले जीव ॥४॥

२३३१. जे आसक्त संसारीं । ते अघोरीं पडती ॥१॥ तयां नाहीं सोडविता । सद्गुरुनाथावांचुनी ॥२॥ त्याचे चरण धरा चित्तीं । मग भीति कासया ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । जन्ममरण चुकलें ४

२३३२. संसार म्हणसी माझा । कां रे गुंतसी वोजा ॥१॥ राहें अलिप्त संसारीं । अंतरीं धरूनियां हरी ॥२॥ तेणें चुकती बंधनें । पावन करिती संतजन ॥३॥ त्रैलोक्यीं ज्याचा शिक्का । एकाजना-र्दनीं नाम घोका ॥४॥

२३३३. मागें बहुतांसी सांगितलें संतीं । वांयां हे फजिती संसार तो ॥१॥ अंधाचे सांगाती मिळालेसे अंध । सुख आणि बोध काय तेथें ॥२॥ विष खाऊनियां प्रचीत पाहे कोणी । तैसा अधमपणीं गुंतूं नको ॥३॥ एकाजनार्दनीं जाऊं नको वांयां । संसार माया लटिकी ते ॥४॥

२३३४. नोहे सायास रामनामीं । संसारासी गुंते प्राणी ॥१॥ आठवी वाचे रामनाम । संसार तुटेची श्रम ॥२॥ नको करूं वांयां श्रम ॥ वाचे म्हणे रामनाम ३ आवडीनें नाम घोका । म्हणे जनार्दनाचा एका ४

२३३५. अष्टची प्रहर करिसी संसाराचा धंदा । कां रे त्या गोविंदा स्मरसी ना ॥१॥ अंतकाळीं कोण सोडवील तूंतें । कां रे स्वहितातें विसरलासी ॥२॥ यमाची यातना न चुके बंधन । सोडवील कोण तुजलागीं ॥३॥ एकाजनार्दनीं गुंतलासी वांयां । भजे यादवराया विसरूं नको ॥४॥

२३३६. वांयांची सोस संसार कामाचा । रामनामीं वाचा रंगो कां रे ॥१॥ यापरती जीवा सोडवण नाहीं । वेदशास्त्रीं पाहीं भाष्य असे ॥२॥ पुराणें डांगोरा पिटिती नामाचा । तें तूं कां रे वाचा न वदसी ॥३॥ सायास साधनें न लगे आणीक । एकाजनार्दनीं ऐक्य मन करी ॥४॥

२३३७. सांडीं पां सांडीं संसाराचा छंद । आठवीं गोविंद वेळोवेळां ॥१॥ न लगे सायास न लगे सायास । आठवीं श्रीहरीस मनोभावें ॥२॥ षड्वैरीयांचें तोडी पां बिरडें । करीं तूं कोरडें आशापाश ॥३॥ एकाजनार्दनीं शरण स्वभावें । भोगी तूं गौरवें वैकुंठीचें ॥४॥

२३३८. अहारे मूढा अहारे मूढा । जन्मोनी दगडा काय केलें ॥१॥ साठी घटीं करसी संसाराचा छंद । वाचे तो गोविंद नुच्चारिसी २ एकाजनार्दनीं श्रीरामावांचून । चुकवील बंधन कोण मूढ ३

२३३९. बुडालिया जळीं धांवतसे कोण । तैसे प्राणी जन बुडताती ॥१॥ संसार हा डोहो दुस्तर पारखा । सांगड ती देखा रामनाम २ एकाजनार्दनीं संतांचा आधार । उतरूं पैलपार भवडोहीं ३

२३४०. संसारीं आलिया प्राणी । तया यमाची जाचणी । अंतीं तयासी निर्वाणीं । कोणी नाहीं ॥१॥ करी नामाचें स्मरण । तेणें तुटेल बंधन । कायावाचा मनें जाण । संतां शरण जाई ॥२॥ नाराती पापें होय होळी । विठ्ठलनामें वाजवी टाळी । कळिकाळ पायांतळीं । वैष्णवारागातें ॥३॥ भाव धरी बळकट । आशापाश तोडीं नष्ट । रामनाम जपे स्पष्ट । यातना ते चुकती ॥४॥ सोस करीं

नामाचा । आणीक शीण उगाचि साचा । एकाजनार्दनीं ह्मणे वाचा । रामनाम गाये ॥५॥

२३४१. करूं करूं ह्मणतां गेले वांयांविण । संसार तो शीण केला वेगीं ॥१॥ अधमा न कळे अधमा न कळे । झांकोनियां डोळे घाणा नेती ॥२॥ यमदूत नेती तयांसी तांतडीं । मारिती वरी कोडी यमदंडें ॥३॥ एकाजनार्दनीं चुकवीं या यातना । संतांच्या चरणा शरण रिघे ॥४॥

२३४२. मी माझें आणि तुझें । द्याकी परतें हें वोझें । नामें पावन होसी सहजें । तेंचि सेवीं आवडीं १ नको गुंतूं या लिगाडा । सोडीं सोडीं या दगडा । भवबंधनाचा हुडा । पडेल अंगावरुता॥२॥ देईं टाकुनी लवलाहीं । रामनाम मुखें गाईं । एकाजनार्दनापायीं । तरीं सुखा काय उणें ॥३॥

२३४३. अल्प आयुष्य अल्प सर्व । अल्प वैभव समजेना ॥१॥ ह्मणे सदा माझें माझें । परी न लाजे काळासी ॥२॥ त्यासी ऐसें न कळे कदा । संसारधंदा मिथ्या हा ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । नाठवी मनीं श्रीहरीसी ॥४॥

२३४४. देह भोगितसे मुख्य गोडी । स्त्री भोगतो आवडी ॥१॥ स्त्री हातीं धरितां देख । वाढे प्रपंचाचें दुःख ॥२॥ जें जें आणी तें तें थोडें । धनधान्य आवडे कुडें ॥३॥ ऐसा भुलला संसारा । लक्ष चौऱ्यांयशीं येरझारा ॥४॥ सोडविता नाहीं कोण्ही । एकाजनार्दनावांचुनी ॥५॥

२३४५. पावला जनन मातेचे उदरीं । संतोषली माता तयासी देखोनी ॥१॥ जो जो जो जो ह्मणोनी हालविती बाळा । नानापरी गाणें गाती करिती सोहळा ॥२॥ दिवसेंदिवस वाढला रारळ फोक। परि कर्म करी आचाट तया न साहावे दुःख ॥३॥ शिकवितां नायके पडे भलते वेसनीं । एकाजनार्दनीं पुन्हां पडतसे पतनीं ॥४॥

२३४६. अभागी ते पामर । भोगिती नरक अघोर ॥१॥ जाहला बाईलेचा अंकित । वर्ते जाणोनी मनोगत ॥२॥ नावडे माता पितियाची गोष्टी । ह्मणे हे बोलती चावटी ॥३॥ एकाजनार्दनीं दुर्जन । पावती नरकीं ते पतन ॥४॥

२३४७. पिता सांगतां गोष्टी। तयासी करितो चावटी ॥१॥ नायके शिकाविलें। ह्मणे ह्मातान्यासी वेड लागलें ॥२॥ बाईल बोलतांचि जाण। पुढें करून धांवे कान ॥३॥ ऐसें नसावें संतान। वांयां भूमीभार जाण ॥४॥ एकाजनार्दनीं अमंगळ। त्याचा होईल विटाळ ॥५॥

२३४८. व्हावें निसंतान। हेंचि एक बरें जाण ॥१॥ येर श्वान ते सूकर। जन्मा येवोनियां खर ॥२॥ मातापित्याचा कंटाळा। न पहावें त्या चांडाळा ॥३॥ देखतांचि सचैल स्नान। करावें तें पाहुनि जाण ॥४॥ पुत्र नोहे दुराचारी। एकाजनार्दनीं ह्मणे वैरी ॥५॥

२३४९. नवमास वरी वाहिलें उदरीं। तिसी दारोदारीं हिंडवितो ॥१॥ लालन पालन करीत आवडीं। जोडली ती जोडी नेदी तिसी ॥२॥ सर्वभावें दास बाइलेचा जाहला। एकाजनार्दनीं अबोला धरी माते ॥३॥

२३५०. मायबापां न घाली अन्न। बाइलेच्या गोता संतर्पण ॥१॥ मायबापां नसे लंगोटी। बाइलेच्या गोता नेसवी धटी ॥२॥ मायबापां न मिळे गुंजभर सोनें। बाइलेच्या गोता घडी अळंकार लेणें ॥३॥ मायबापें श्रमोनियां मेलीं। एकाजनार्दनीं बाईल प्रिय जाहली ॥४॥

२३५१. मातेचिया गळां न मिळे गळसरी। बाईलेसी सरी सोनियाची ॥१॥ मातेचिये हातां न मिळे कांकण। बाईले करीं तोडे घडी जाण ॥२॥ मातेसी न मिळे अंगीं चोळी। बाईलेसी नेसवी चंद्रकळा काळी ॥३॥ बाइले आधीन ठेविलें जिणें। एकाजनार्दनीं नरकीं पेणें ॥४॥

२३५२. मातेसी न मिळे खावयासी अन्न। बाईलेसी घाली नित्य मिष्टान्न ॥१॥ ह्मणे बाईल माझी संसारी बहु। मातेनें मज बुडाविलें बहु ॥२॥ मातेनें माझा संसार बुडविला। माझ्या बाईलेनें वाढविला ॥३॥ माता माझी अभागी करंटी। बाईल प्रत्यक्ष सभागी मोठी ॥४॥ एकाजनार्दनीं बाइलेआधीन जाहला। मातेसी अबोला धरिला तेणें ॥५॥

२३५३. बाईलेचा जाहला दास । न करी आस मातेची ॥१॥ नव महिने वोझें वागवून । तिचा उतरी तो शीण ॥२॥ बाइलेच्या बोला । धरी मातेसी अबोला ॥३॥ एकाजनार्दनीं पुत्र । जन्मला तो अपवित्र ॥४॥

२३५४. बाइलेच्या बोला । धरी मातेसी अबोला ॥१॥ बाइलेसी नेसवी धटी । माते न मिळे लंगोटी ॥२॥ बाइले षड्रस भोजन । माते न मिळे कोरान्न ॥३॥ बाईल बैसवी आपुले घरीं । माते हिंडवी दारोदारीं ॥४॥ एकाजनार्दनीं शरण । ऐसे पुत्राचे अवगुण ॥५॥

२३५५. बाईल सांगतांचि गोठी । ह्मणे मातेसी करंटी ॥१॥ जन्मापासुनी आमुचे मागें । अवदसा लागली सांगे ॥२॥ इचे उत्तम नाहींत गुण । ऐसा बोले अभागी जाण ॥३॥ नरदेहीं ते गाढव । एकाजनार्दनीं नाहीं भाव ॥४॥

२३५६. बाइलेचा जाहला दास । करी आस मातेची ॥१॥ माकड जैसें गारुड्याचें । तैसा बाईलेपुढें नाचे ॥२॥ पिता सांगतां हित गोष्टी । दुःख वाटे तया पोटीं ॥३॥ ऐसें बाइलेनें गोंविले । एकाजनार्दनीं वांयां गेले ॥४॥

२३५७. देव गुरु माता पिता । ऐसा भाव जया चित्ता ॥१॥ नाहीं दुजा आठव कांहीं । चित्त जडलें चौघांपायीं ॥२॥ एकाजनार्दनीं साचें । ऐसें मनीं नित्य ज्याचे ॥३॥

२३५८. माता पिता देव गुरु । ऐसा ज्याचा एक विचारु ॥१॥ धन्य धन्य तयाचें शरीर । नर नोहे तो ईश्वर ॥२॥ चारी दैवतें समान मानी । शरण एकाजनार्दनीं ॥३॥

२३५९. मातापितियांसी जो करी नमन । धन्य त्याचें पुण्य इह जनीं ॥१॥ मातापितियाचें करी जो पूजन । धन्य तयाचें पुण्य इहलोकीं ॥२॥ मातापितियांची करीत जो सेवा । एकाजनार्दनीं देवा वरिष्ठ तो ॥३॥

२३६०. बाइलेआधीन होय ज्याचें जिणें । तया अधमा नरकीं येणें ॥१॥ बाईल मनोगतें ऐसा चाले । नावडती कोणाचे तया बोल

॥२॥ बाईल देवाचाही देव । ऐसा ज्याचा दृढ भाव ॥३॥ एकाजनार्दनीं ह्मणे मूढाला । बाईलेनें भुलविला ॥४॥

२३६१. रात्रंदिवस भार वाहे खर । बाइलेचें उदर भरितसे ॥१॥ नेणे दानधर्म व्रत आचरण । आतिथी पूजन स्वप्नीं नाहीं ॥२॥ नेणे श्राद्ध पक्ष आपुला आचार । सदा दुराचार कर्में करी ॥३॥ पत्नी गृहीं सदा वसतसे मन । न वेंची कांहीं धन कवडी एक ॥४॥ एकाजनार्दनीं ऐसा हीनभागी । जोडीतसे अभागी नकरवारा ॥५॥

२३६२. निर्धन पुरुषाची देखा । स्त्री बोले अतिशय ऐका ॥१॥ दिवसां पोराची तडातोडी । रात्रीं तुमची वोढावोढी ॥२॥ नाहीं घरीं खावया अन्न । संततीनें भरलें सदन ॥३॥ एकाजनार्दनीं देवा। ऐसा स्त्रीचा हेलावा ॥४॥

२३६३. प्रपंच्याचा कठिण लाग । नाशासी मूळ स्त्रीसंग ॥१॥ भोगाचें जें जें सुख । ते तें प्रत्यक्ष घेती विख ॥२॥ दीपाचीया अंग संगा । कोण सुख आहे पतंगा ॥३॥ पुढील निमाले देखती । पाहुनी पुढें उडी घालिती ॥४॥ ऐसे भुलले तया संगीं एकाजनार्दनीं जगीं ॥५॥

२३६४. सदा सर्वकाळ बाईलेचा दास । होउनी कामास श्वान जैसा ॥१॥ नेणे भीड कधीं मर्यादा स्वजनीं । बाईलेचे कानीं गुज-सांगे २ बैसतां राउळीं बाईले एकांत । देवापाशीं चित्त न बैसेचि ३ एकाजनार्दनीं ऐसा तो पतित । अघोर भोगीत कल्पकोडी ॥४॥

२३६५. परदारा परधन । येथें धांवतसे मन ॥१॥ मन जाय दूरदेशीं । बोहुनी आणा चरणापाशीं ॥२॥ दुर्बुद्धि मनाचें ठाणें । मोडोनी टाका पुरतेपणें ॥३॥ एकाजनार्दनीं मन । आपुले पदीं राखा जाण ॥४॥

२३६६. स्त्री पुत्र दारा धन । देखोनियां नाचे श्वान ॥१॥जातां बळें कीर्तनीं । बका ऐसा बैसे ध्यानीं॥२॥लक्ष ठेउनी बाहेरी। वरवर बोले दुराचारी ॥३॥ एकाजनार्दनीं ह्मणे । श्वानापरि त्याचें जिणें ४

२३६७. स्त्रियांचे संगतीं । नोहे परमार्थ निश्चितीं ॥१॥ स्वप्नीं

होतां दरुशन । तेथेंच गुंततसे मन ॥२॥ पहा स्त्रियांच्या अंगसंगें । भुलविला ऋषिशृंग ॥३॥ विश्वामित्र तपिया खाणी । कुत्रा करुनी हिंडे वनीं ॥४॥ ऐसे भुलले थोर थोर । तेथें जीव किती पामर ॥५॥ एकाजनार्दनीं भुलले । वांयां स्त्रीसंगीं गुंतले ॥६॥

२३६८. व्याही जांवयाच्या कोडी । पोषितरो अति आवडी॥१॥ देहसुखाचीया चाडा । अवघे मेळविले वोढा ॥२॥ देहीं वाढवी अतिप्रीति । पुत्र दारा माझे म्हणती ॥३॥ जैसा जोंधळा कणा चढे । कणभारें क्षितीं पडे ॥४॥ वृक्षा फळें येती अपारें । फळ भारें वृक्ष लवे ॥५॥ ऐसा भुलला स्वजनासी । एकाजनार्दनीं सायासी ॥६॥

२३६९. कन्या पुत्रादिक धन । हें तों जाण भ्रमवत् ॥१॥ मागील अनुभव घेउनी कसवटी । पडलीरे तुटी रामनामीं ॥२॥ नाथिले याचा काय तो धिवसा । कवण तो आकाशा कुंपण घाली ॥३॥ अभ्रींची छाया मृगचळ पाणी । काय तें रांजणीं भरतां येतें ॥४॥ एकाजनार्दनीं सारीमारींचें वचन । काय तें प्रमाण आयुष्याविण ॥५॥

२३७०. गुंतलासी मायापाशीं । कोण सोडवील तुजसी । धाये मोकलोनि रडसी । नये करुणा कवणातें ॥१॥ वाचे सदा नाम गाय । तेणें चुकती अपाय । सहजचि सोय । नाम मुखीं वदतां ॥२॥ बंधनाची तुटेल बेडी । होईल कैवल्याची सहज जोडी । एकाजनार्दनीं आवडी । रामनामीं धरितां ॥३॥

२३७१. लेंकुरातें बाप खेळवी साचें । बाईल देखतां तो पुढें नाचे ॥१॥ माझा बाप माझी आई । बाईल देखतां नाचतो पायीं । ॥२॥ धडसेनी तोंडें बोबडें बोले । आवडीनें म्हणे पाहे बाइले । ॥३॥ सासु सासरा पहाती सालां । नाचतो जांवई घेऊनी मुला ॥४॥ यापरी ममता नाचवी जन । देवद्वारीं आलीया धरी अभिमान ॥५॥ एकाजनार्दनीं सांडोनि अभिमान । संतापुढें नाचे धरुनियां कान ॥६॥

२३७२. आळस निद्रा सांडी । रामनाम म्हणे तोंडीं ॥१॥ धन वित्तमान । हें तों श्वान विष्ठे समान ॥२॥ पुत्र पत्नी संसार । वांयां व्यर्थचि भार ॥३॥ हें परतें सांडी मनें । एकाजनार्दनीं जिणें ॥४॥

२३७३. धन कामासाठीं देख । न मनी दोष महादोषी ॥१॥ कवडीयें लोभें केला असे मूर्ख । नाठवेची नरक पतितासी ॥२॥ कवडा येकु लाभु होतां । तैं श्राद्ध करी मातापिता ॥३॥ मी उत्तम मैलहीन । ही धनलोभ्या नाठवे आठवण ॥४॥ एकाजनार्दनीं शरण । काय तया ब्रह्मज्ञान ॥५॥

२३७४. घालुनियां काखे धन । सदा मागे जो कोरान्न ॥१॥ धन्य वांयां जिणें पाही । श्वान सूकर समतेही ॥२॥ असोनियां दरिद्रता । सदा धर्मावरी चिंता ॥३॥ द्रव्य पदरीं बहु आहे । अतिथी रिक्त हस्तें जाये ॥४॥ एकाजनार्दनीं ऐसे पामर । नरक भोगिती अघोर ॥५॥

२४७५. घरीं धनधान्य पुरून । सदा मागे जो कोरान्न ॥१॥ द्रव्य असोनि नाहीं ह्मणे । केविलवाणें ह्मणे मी दिन ॥२॥ असोनि द्रव्याचीया राशी । भिक्षा मागे अहर्निशीं ॥३॥ ऐसा संचय करून । सवेंची पावला मरण ॥४॥ वांयां गेला नरदेहीं । एकाजनार्दनीं पाही ॥५॥

२३७६. कवडी कवडी घाली खांचे । नित्य नूतन भिक्षावाचे ॥१॥ अतीतासी दान । तें तों स्वप्नीं नाहीं जाण ॥२॥ पर्वकाळ विधी । न कळे अभाग्यासी कधीं ॥३॥ ठेउनी वित्त धनावरी । सवेंचि फिरे घरोघरीं ॥४॥ जन्मा येवोनि अघोर । एकाजनार्दनीं भोगिती पामर ॥५॥

२३७७. गांठीं बांधोनियां धना । क्षणक्षणा पाहे त्यातें ॥१॥ न जाय तीर्थयात्रेप्रति । धनाशा चित्तीं धरुनी ॥२॥ बैसलासे सर्प दरीं । तैशापरी धुसधुसी ॥३॥ नको धनाशा मजशी जाण । शरण एकाजनार्दन ॥४॥

२३७८. धनलोभ्याचे जाय धन । शोधितसे रात्रंदिन ॥१॥ त्याची निंदा करतील लोक । रांडा पोरें थुंकती देख ॥२॥ भिकेलागीं जेथें गेला । म्हणती काळतोंडा आला ॥३॥ होता धनलोभें भुलला । संचित तें वरा नागविला ॥४॥ ऐसें धनाचें कारण । शरण एकाजनार्दन ॥५॥

२३७९. हींच दोनी पैं साधनें। साधकें निरंतर साधणें ॥१॥ परद्रव्य परनारी। यांचा विटाळ मनें धरीं ॥२॥ नको आणिक उपाय। सेवीं सद्गुरूचे पाय ३ ह्मणे एकाजनार्दन। न लगे आन तें साधन ४

२३८०. पाया शोधोनियां बांधिताती घर। ऐसे या दुस्तर नरदेहीं ॥१॥ म्हणती पुत्र माझे नातु हें कलत्र। मिळती सर्व गोत्र तये ठाईं ॥२॥ संपत्ती देखोनि मिरविती तयारी। माझें माझें म्हणती रांडापोरें ॥३॥ चाले बरवा धंदा बहिणी म्हणती दादा। आलिया दरिद्र बाधा पळुनी जाती ॥४॥ जनार्दनाचा एका करितसे विनंति। संतसंग चित्तीं जीवीं धरा ॥५॥

२३८१. संपत्ती देखोनि म्हणती माझें माझें। वागवितो वोझें खरा ऐसा ॥१॥ क्षणीक आयुष्य क्षणीक संपत्ती। न कळे तयाप्रती अंध जैसा ॥२॥ जाणार जाणार सर्व हें जाणार। हरिनाम सार जपें सदा ॥३॥ जनार्दनाचा एका सांगतसे मातु। धरीरें सांगातु वैष्णवांचा ॥४॥

२३८२. मातला बोकड भलत्यावरी धांवे। तैसा भरला विषय ह्यावे ॥१॥ नाठवेचि आपपर। सदा हिंडे परद्वार ॥२॥ शिकविलें मानी वोखटें। उताणा नेटें चालतसे ॥३॥ कर्म धर्म नावडेचि कांहीं। विषय प्रवाहीं बुडतसे ॥४॥ एकाजनार्दनीं ते पामर। भोगिती अघोर कुंभपाक ॥५॥

२३८३. करितां विषयाचें ध्यान। जीव होय मनाधीन ॥१॥ ऐसे भुलले विषयासी। अंतवले परमार्थासी ॥२॥ संसार सागरीं वाहिला। गोड परमार्थ राहिला ॥३॥ गेलें भुलोनियां मन। विसरला आठवण ॥४॥ जन्मा येवोनीयां देख। एकाजनार्दनीं ते मूर्ख ५

२३८४. सलगीनें सर्प हातीं तो धरिला। परि दंश तो वहिला करील बापा ॥१॥ तैसें विषयांसी सलगी पैं देतां। नेती अधःपाता प्राणीमात्र ॥२॥ विष उत्तम चांगलें घातलेंसे मुखीं। परि प्राण शोखी क्षणमात्रें ॥३॥ जाणोनी जाणोनी नको भुलूं वांया। एकाजनार्दनीं पायां भजे आधीं ॥४॥

२३८५. बंधनाचा फांसा बैसलासे गळीं। मीनापरि गिळी

सर्वकाळ ॥१॥ आमीष विषया भुलला पामर । भोगिती अघोर चौऱ्यांयशीं ॥२॥ गुंततांचि गळीं जाईल कीं प्राण । हें तों अधम जना न कळे कांहीं ॥३॥ एकाजनार्दनीं न कळेचि मूढा । सांगावें द्गडा किती किती ॥४॥

२३८६. इंद्रियें नाना छळिती पामरें । समाधान शरीरें नोहे कधीं ॥१॥ ज्याचा जो व्यापार करती सैरावैरा । परी त्या सर्वेश्वरा न भजती ॥२॥ विषयाचें कामें करिती विवंचना । परी नारायणा न स्मरती ॥३॥ एकाजनार्दनीं कृपा नव्हतां पूर्ण । इंद्रियां समाधान केवीं होय ॥४॥

२३८७. काम क्रोध मद मत्सर शरीरीं । रात्रंदिवस निर्धारीं छळिताती ॥१॥ आशा तृष्णा भ्रांति भुली हे वासना । सदोदित मना छळिताती ॥२॥ एकाजनार्दनीं यांचा टाकीं संग । मग पांडुरंग हातीं लागे ॥३॥

२३८८. डोळा फोडोनियां काजळ ल्याला । नाक कापून शिमगा खेळला ॥१॥ वेंचितां धन लक्ष कोटी । आयुष्य क्षणचि नोहे भेटी ॥२॥ मिथ्या बागुलाचा भेवो । बाळें सत्य मानिती पहाहो ३ ऐसें मिथ्या नको मनीं । एका शरण जनार्दनीं ॥४॥

२३८९. अमृत विकूनि कांजी प्याला । तैसा नरदेह गमाविला ॥१॥ लाहोनी उत्तम शरीर । वेंचिलें तें विषयपर ॥२॥ ऐशी मूर्खांची गोष्टी । एकनाथ देखोनि होतसे कष्टी ॥३॥

२३९०. श्वानाचीये परी धांवे । विषयासक्त जीवें भावें ॥१॥ नेणे मान अपमान । सदा विषयावरी ध्यान ॥२॥ नाहीं देवाची स्मृती । सदा लोळे विषयावतीं ॥३॥ नाठवेचि कांहीं धंदा । भुलला तो विषय मदा ॥४॥ एकाजनार्दनीं देवा । नाठवी अभागी न करी सेवा ॥५॥

२३९१. श्वानाचा तो धर्म करावी वसवस । भलें बुरें त्यास न कळे कांहीं ॥१॥ वेश्यांचा धर्म द्रव्य तें हरावें । भलें बुरें भोगावें न कळे कांहीं ॥२॥ निंदकाचा धर्म निंदा ती करावी । भलें बुरें त्यागावी न कळे कांहीं ॥३॥ सज्जनांचा धर्म सर्वांभूतीं दया । भेदा-

मूळ छेदितां वृक्ष खुडे । तैं समूळ विषय उडे ॥२॥ ऐसा अनुराग धरीं मनीं । देईं विषयासी पाणी ॥३॥ एकाजनार्दनीं गोडी । सहज परमार्थ उघाडी ॥४॥

२४०३. विषया होउनी उदास । सांडीं संसाराची आस ॥१॥ तरीच पावाल चरण । संतसेवा घडेल जाण ॥२॥ होऊन उदासवृत्ती । भजन करा दिनरातीं ॥३॥ ऐसी आवड धरा मनीं । शरण एकाजनार्दनीं ॥४॥

२४०४. कल्पनेचे जळीं वासना कल्लोळीं । बुडाले भवजळीं नामहीन ॥१॥ तयाच्या धांवण्या कोण धांवे देव । ऐसा तो उपाव नेणेचिना ॥२॥ दुःखाचे डोंगर भोगिती बापुडीं । कोण काढाकाढी करील त्यांची ॥३॥ एकाजनार्दनीं संतांवांचूनियां । त्या अभाग्यांची दया कोण करी ॥४॥

२४०५. न सुटेचि आशा गुंते बळें पाशीं । दुःखाचिया सरसें म्हणे देव ॥१॥ ऐसे अमंगळ गुंतले कर्दमीं । भोगिताती उर्मी जन्मदशा २. एकाजनार्दनीं संतांसीं शरण । गेलिया बंधन तुटे वेगीं ॥३॥

२४०६. अविद्येचें भ्रांतपण । मिथ्या दावी साच धन ॥१॥ तेथें गुंतसी लिगाडा । तेणें पडे पायीं खोडा ॥२॥ जन्ममरण भोंवरा । भ्रमें फिरसी निर्धारा ॥३॥ कळोनि कां रे वेडा होसी । एकाजनार्दनीं न पाहसी ॥४॥

२४०७. फजितखोरांचे जीवीं । लाज नाहीं सर्वथा ॥१॥ सांगतां ते न धरती मनीं । नायकती कानीं शिकविलें ॥२॥ जैसा जैसा उन्मत्त मर्दे । काम छंदें तेवीं नाचे ॥३॥ एकाजनार्दनीं ते पामर । जन्म वेरझार भोगिती ॥४॥

२४०८. आवडीं विष खाउनी मेला । तो स्वयें नरका गेला ॥१॥ कवणा कवण ठेवी दोष । ऐसा मूर्ख तो तामस ॥२॥ अमृत सांडुनी कांजी प्याला । तैसा नरदेह गमाविला ॥३॥ लाहूनि उत्तम शरीर । गमाविलें परिकर ॥४॥ एका शरण जनार्दनीं । कोण लाभ जाहली हानी ॥५॥

२४०९. हे तों अवघे फजितीचे भांड । अंतकाळीं तोंड काळें

करती ॥१॥ चालतां इंद्रियें ह्मणती माझें माझें । अंतकाळींचें वोझें न घेती हे ॥२॥ जरा आलिया निकट भरुनी । जाती हे पळोनि आपुले गृहां ॥३॥ एकाजनार्दनीं धरी हा विश्वास । रामनामीं ध्यास सुखें करी ॥४॥

२४१०. थोर गर्भींची यातना । आठवितां दुःख मना ॥१॥ नऊ मास वरी । पचे विष्ठेचे दाथरीं ॥२॥ जन्म होतांचि जननी । सुख मानी अनुदिनीं ॥३॥ बाळ वाढतसे सायासें । तों तों साउली संतोषे ॥४॥ तारुण्याच्या येतां भरां । मातेसी करी पाणउतारा ॥५॥ पावला सवें ह्मातारपण । नाकीं तोंडीं लाळ जाण ॥६॥ नाठवेचि रामनाम । एकाजनार्दनीं तो अधम ॥७॥

२४११. धन मानबळें नाठविसी देवा । अंतकाळीं तेव्हां कोण आहे ॥१॥ यमाचे ते दंड बैसतील माथां । मग तुज रक्षिता कोण आहे ॥२॥ माता पिता बंधु सोइरे धाइरे । जोंवरी इंद्रियें चालताती ॥३॥ सर्वस्व कामिनी ह्मणविसी कांता । ती ही केश देतां रडूं लागे ॥४॥ एकाजनार्दनीं जातांचि शरण । स्वप्नीं जन्ममरण नाहीं नाहीं ॥५॥

२४१२. जरा पावली निजसंधी । अनिवार येती आधीव्याधी ॥१॥ पायीं पडतसे वेंगडी । अंधारीं धरणें लागे काठी ॥२॥ डोळांचि पडे तोंडा लाळ । नाका येत शेंबूड वोंगळ ॥३॥ चुंबन देतां पोरांप्रती । बाऊ ह्मणोनि पोरें पळती ॥४॥ ऐशी दशा येईल अंगा । एकाजनार्दनीं शरण रिघा ॥५॥

२४१३. बधिर जाले पैं श्रवण । जाले दंत उन्मळण ॥१॥ अझुनी काय धरिसी माया । गेलीं इंद्रियें विलया ॥२॥ नाकीं श्लेष्माचा खळाळ । तोंडावाटे पडे लाळ ॥३॥ टरपुर वाजे गुदद्वार । चरणीं सांडिला व्यापार ॥४॥ वृषण आलें गुडघ्यावरी । शिश्न लोंबे पीठचाचरी ॥५॥ कफवात पैं सुटला । शरीर कांपे चळचळां ॥६॥ लहान थोर ते हांसती । फे फे वांकुल्या दाविती ॥७॥ वाटतां चांचपडे भिंती । पोरें बाऊ ह्मणोनि पळती ॥८॥ भार्या केलीरे आवडी । ती तुजवर बोटें मोडी ॥९॥ स्त्रीये पाहिजे पुरुष-

भोग । तुज लागला खोकला रोग ॥१०॥ तुज जाणें निरयाकडे । ती काजळ कुंका रडे ॥११॥ प्राण आला डोळियासी । कैसा स्वार्थ न संडिसी ॥१२॥ आंगण जालें रे विदेश । किती करिसी विषय सोस ॥१३॥ आप्त ह्मणती कां मरेना । पालटु जाला याचिया चिन्हा ॥१४॥ एकाजनार्दनीं निष्काम । भजा भजा रे परब्रह्म ॥१५॥

२४१४. बारा वर्षें बाळपण गेलें । परि रामनाम मुखीं नाहीं आलें ॥१॥ अहारे मूढा जन्मलासी दगड । गमाविलें वाड आयुष्यासी ॥२॥ बारा वर्षें तारुण्य अवस्था । कामक्रोधें लाहो घेतला पुरता ॥३॥ बारा वरुषें वृद्धाप्य आलें समूळीं । जराव्याधी देहासी कवळी ॥४॥ ऐसें आयुष्य गेलें वांयांविण । एकाजनार्दनीं ह्मणे नाहीं घडलें भजन ॥५॥

२४१५. देहो जैं पासूनि झाला । तैं पासुनी मृत्यु लागला ॥१॥ साप बेडुकातें गिळी । बेडूक मुखें माशी कवळी ॥२॥ ऐसा काळ गिळितो जना । न कळेचि बुद्धिहीना ॥३॥ मरण जाणती बापुडीं । धरिती प्रपंचीं आवडी ॥४॥ ऐसे पामर आत्मघाती । यासी महा होये फजिती ५ असो जनीं जनार्दन । एकाजनार्दनीं शरण ॥६॥

२४१६. जन्मलें तें बाळ । परी वाट पाहे काळ ॥१॥ नाहीं संतसमागम । सदा विषयाचें काम ॥२॥ मुखीं रामनाम नाहीं । सदा संसार प्रवाहीं ३ एकाजनार्दनीं भुलोन । स्त्रीआधीन जाहला दीन ४

२४१७. आमिष देखोनि मीन गुंतलासे गळीं । तैसा काळ बळी पाश घाली ॥१॥ आप्त गोत्रज असोनि जवळीं । नेताती वहिली यमकाळ ॥२॥ दांत विचकूनियां म्हणती गेला गेला । ऐशा अभाग्याला काय बोध ३ एकाजनार्दनीं मनुष्य देहीं मूढ । प्रत्यक्ष दगड अवनी भार ॥४॥

२४१८. जाणार जाणार देह हा जाणार । काय उपचार करिसी वांयां ॥१॥ मृत्तिकेचें घर बांधितां खचलें । तैसे परि जाहलें न कळे तुज ॥२॥ गृहधनदारा पुत्रपौत्र वांयां । स्मरें देवराया एका भावें ३ एकाजनार्दनीं घेई अनुतापा । चुकवी हे खेपा जन्ममृत्यु ४

२४१९. धनदारापुत्र अपत्यें म्हणसी माझें । परी हें काळाचें

खाजें जाणें बापा ॥१॥ गंगेलागीं पूर अवचित आला । लोटोनियां गेला मागुती जैसा ॥२॥ तैसा याचा विश्वास न धरीं तूं मनीं । यमाची जाचणी तुजसी होय ॥३॥ एकाजनार्दनीं सोडोनि देईं संग । नाम तूं अभंग हरीचें वदें ॥४॥

२४२०. ज्यांचे आयुष्या नोहे लेखा । तेही देखा निमाले ॥१॥ इतरांचा पाड कोण । नेमिलें जाण न चुके तें २ आणिलें तें उसणें साचा । देणें तयाचा प्रकार ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । करी विनवणी सर्वांसी ॥४॥

२४२१. पितापुत्र नातु सर्व काळें ग्रासिले । उरले ते गेले काळमुखीं ॥१॥ सायास करूनि वाढविती मांसें । परि काळाचें हें खाजें नेणती ते ॥२॥ बाळतरुणवृद्धदशातें पावती । परी न म्हणती रामराम ॥३॥ एकाजनार्दनीं भुलला गव्हार । न करी विचार स्वहिताचा ॥४॥

२४२२. एका पाठीं एक पुत्र । आहे मरणाचा हुडा ॥१॥ आज मेले उद्यां मरती । मागें रहाती तेही रडती ॥२॥ मरण जाणोनियां पाही । उगेच बोलती प्रवाहीं ॥३॥ ऐसी भुली पडली देखा । एकाजनार्दनीं भुलले एका ॥४॥

२४२३. नको गुंतू मायाजाळीं । काळ उभा हा जवळी १ नाहीं तुजलागीं तत्त्वता । सोडविणार माता पिता ॥२॥ स्त्रिया पुत्र बंदीजन । करिती तुजलागीं बंधन ॥३॥ धनवित्त कुळें । सोडितील अमंगळें ४ एकाजनार्दनीं मन । ठेवी गुरुपायीं बांधोन ॥५॥

२४२४. इष्ट मित्र बंधु चुलते पुतणे । काळाचे पोसणे सर्व देख ॥१॥ यमाची यातना पडतां जीवा ती । कोणा काकुलती करसी मूढा ॥२॥ जोंवरी आहे तुज जवळी धन । तोंवरी पिशून म्हणती माझें ॥३॥ एकाजनार्दनीं जवळी आला काळ । तेव्हां ते निर्बळ सर्व होती ॥४॥

२४२५. एक एक मरती पहाती । बुजियासी भ्रांती कैशी बापा ॥१॥ अरे ग्रासिलें शरीर काळें देखा । परि तया मूर्खा न कळे कांहीं २ एकाजनार्दनीं भुलला प्रपंचा । कोण दुःखा त्याच्या सोडविल ३

२४२६. कन्यादान केल्या पाहीं। तों आपले घरा घेउनी जाये ॥१॥ वांयां कायशी तळमळ। तेथें कांहीं न चले बळ ॥२॥ आयुष्याचे अंतीं। पडसी काळाचीये हातीं ॥३॥ करी कांहीं पां विचार। कवणाचें घरदार ४ जनीं जनार्दन एकला। एकाजनार्दनीं देखिला ५

२४२७. पहा पहा उगा बैसलासे काळ। भरलीसे वेळ न चुके मग ॥१॥ सर्वही संबंधी असतां जवळी। नेईल तात्काळीं तुजलागीं ॥२॥ पाहे पां तो बोका बैसतो टपुनी। जातो उचलोनी घेउनी अंश ३ एकाजनार्दनीं किती भाकूं कींव। नायकतीं जीव गुंतले ते ४

२४२८. काळाचे आहारीं। पडती शेवटीं निर्धारीं ॥१॥ ऐसें असोनि ठाऊक मना। परि न स्मरे रामराणा ॥२॥ गुंतले ते मायाजाळीं। न कळे गळीं लागती ॥३॥ एकाजनार्दनीं शरण। वाचे न म्हणती नारायण ॥४॥

२४२९. नेमिला काळ लागला पाठीं। हें तों दिठीं पाहती ॥१॥ एकापाठीं दुसरें जाय। वांयां हाय हाय उरते ॥२॥ न सोडी तो लागला मागें। शिणती वाउगे मूर्ख ते ॥३॥ शरण एकाजनार्दनीं। पडती वदनीं काळाचे ॥४॥

२४३०. अगाध जीवनीं मत्स्य ते असती। नाहीं दुःखप्राप्ति तयां कधीं ॥१॥ परी आंलिया ढीवर घालितसे गळ। मग तळमळ करुनी काय ॥२॥ आमीष देखोनी भक्षावया जाय। परि नेणे काळ आहे म्हणोनियां ३ एकाजनार्दनीं प्राणी ते भुलले। आमिषीं गुंतले मीनापरी ॥४॥

२४३१. देखती निमाले आपुले पूर्वज। पितापुत्र सहज तेही गेले ॥१॥ नाहीं त्या यमासी करुणा कवणाची। भोगविती दुःखाची नाना योनी ॥२॥ सुकृत पदरीं मूळ नाहीं दोरा। घालिती अघोरा अंत न लगे ॥३॥ एकाजनार्दनीं नाहीं तेथें सुख। भोगविती दुःख न सांगवे ॥४॥

२४३२. आयुष्य जातें पळ पळ तुजला कैसें कळेना। दो दिवसांची तनु हे साची आलासे पाहुणा ॥१॥ चौसष्ट घडीयी माजी रात्र गेली समजेना। आयुष्य खातो काळ तुह्मी रामें कां रे ह्मणांना

॥२॥ नरदेह पांचांचा आणिलासे ऊसना। कांहीं तरी स्वहित करीं व्यर्थ कांरे वल्गना ॥३॥ राम दृढ धरशील तरी तुटेल यातना। भ्रांति माया काढी नको पडूं बंधना ॥४॥ वाल्मिक तरला उलट्या नामस्मरणा। एकाजनार्दनीं ह्मणे जाई साधु दर्शना ॥५॥

२४३३. जैसा गळीं लागला मासा। तैसा फांसा यमाचा ॥१॥ जाणते परी वेडे होती। फेरे घेती चौऱ्यायशीं ॥२॥ परि नेघे रामनाम। सदा काम विषयाचें ॥३॥ ह्मणे जनार्दनीं एका। यासी सुटका कैसेनी ४

२४३४, घटिका भरतां न लगे वेळ। उभा काळ वाट पाहे १ कोणी नयेरे सांगाती। वांयां होतसे फजिती ॥२॥ माप भरतां नाहीं गुंती। वांयां कुंथी फळ काय ३ शरण रिघा जनार्दनीं। मोक्षदानीं उदार ॥४॥ एका विनवी जनार्दनीं। अंतकाळीं नाहीं कोणी ॥५॥

२४३५. देह अवसानीं काळाची तों संधी। पोहोंचली आधीं येवोनियां ॥१॥ कोण सोडवील तुजलागीं बापा। श्रीराम जपा लवलाही २ छाया जैशी हाले नाशिवंत खरी। तैशीच ही परी देहाचिया ॥३॥ एकाजनार्दनीं भुलूं नको माया। काळ तो लवलाह्या नेईल बापा ४

२४३६. आळस करसी नाम घेतां। जासी यमाचिया पंथा। कोण ती सर्वथा। सोडविल तुजलागीं ॥१॥ बंधु बहिणी नये कामा। कांय सांगावें तुज अधमा। गुंतलासी स्त्रीभोग कामा। तेव्हां दूर पळती ते ॥२॥ कोणही न होती कोणाचे। तूं ह्मणसी मामेभाचे। एकाजनार्दनीं साचें। कोणी नाहीं पामरा ॥३॥

२४३७. काळें ग्रासिलें सकळ। उरला जाऊं नेदी वेळ। घटिका आणि पळ। रामनाम स्मरे जना ॥१॥ अरे आलेनी संसारा। कांहीं तरी विचार करा। आयुष्याचा दोरा। तुटे तो न कळेचि ॥२॥ करुणा नाहीं तया यमासी। काढिती वोढिती जिवासी। भोगविती चौऱ्यायशीं। यातना ते दुस्तर ॥३॥ ह्मणोनी येतसे करुणा। शरण एकाजनार्दना। वाचे रामराम ह्मणा। मग सुख पावाल ॥४॥

२४३८. नरदेहीं सुख सोहळा संस्कार। परि तेथें विकार दैवयोगें ॥१॥ बाळत्वामें सुख अज्ञान दशेंत। रामनाम मुखांत नये कधीं ॥२॥ तरुण अवस्था विषयाचें ध्यान। नये तें भजन मुखीं कदा ॥३॥ जरेनें वेष्टिलें आलें वृद्धपण। एकाजनार्दन भजन नेणे ॥४॥

२४३९. भोगोनी नाना योनी । आलासी आतां या जनीं ॥१॥ ऐसा धरी मागील आठव । करी देहाचें वाटीव ॥२॥ नाहीं तरी जाशील वांयां । पुनरपि यमालया ॥३॥ येतां जातां शिणतोसी । एकाजनार्दनीं कां न भजसी ॥४॥

२४४०. अल्प आयुष्य नरदेहीं जाण । कांहीं तरी भजन करीं वाचे ॥१॥ जाणार जाणार नरदेह जाणार । न चुके येरझार जन्म-मृत्यु ॥२॥ करीं धंदा आठवीं गोविंदा । वांयां तूं आपदा नको घेऊं ॥३॥ एकाजनार्दनीं पंढरी पाहून । तेथें न करी मन ठेवणें देखा ४

२४४१. पळ पळ आयुष्य खातसे काळ । कां रे होसी सबळ पोसणा तूं ॥१॥ वाढविसी देह काळाचें भातुकें । कां रे तुज कौतुकें सुख वाटे ॥२॥ नामस्मरण करितां लाजसी पामरा । भोगिसी अघोरा यमदंडा ॥३॥ एकाजनार्दनीं सांगतसे हित । कां रे न घ्या त्वरित हरिनाम ॥४॥

२४४२. काळानें ग्रासिलें सावधान व्हा रे । सोडवण करा रे हरि-नामें ॥१॥ आयुष्य सरलीया कोण पां सांगाती । पुढें हो फजिती यमदंड ॥२॥ उपाय तो सोपा नामाचा गजर । न करी विचार पुढें कांहीं ३ एकाजनार्दनीं तूं कां रे अंधळा । देखतोसी डोळां सुख दुःख ४

२४४३. आपुलिया हिता आपण जागिजे । वांयां न नागविजे देहीं देहा ॥१॥ ह्याचि अनुताप घेऊनियां मना । करी पां चिं-तना रामनाम ॥२॥ नाहीं कांहीं मोल सुलभ फुकाचें । घेई सदा वाचे रामनाम ॥३॥ एकाजनार्दनीं किती हें सांगावें । गुंतले ते ह्यावे नायकती ॥४॥

२४४४. कां रे नागविसी काळा । मानिसी संसार सोहळा । शेवटीं तो गळां । यम पाश पडतील ॥१॥ वाचे म्हणे रामनाम । आणीक नको दुजें काम । मोक्ष मुक्ति धाम । नामें एका जोडती २ वाउगें जप तप कर्म । याचा न धरीं संभ्रम । वाचे गाय सदा नाम । तेणें सर्व जोडतसे ॥३॥ एकाजनार्दनीं नेम । कायावाचा मनें सप्रेम । वाचे स्मरतसे नाम । श्रीराम सर्वदा ॥४॥

२४४५. अशाश्वत देह काळाचें भातुकें । पंचप्राण कौतुकें खेळ

तेथें ॥१॥ जीव शिव दोन्ही मध्य बैसाकार । व्यापारीं व्यापार सर्व त्याचा ॥२॥ जीव गुंतलासे विषयाचे वोढी । शिव जाणे गोडी आत्मस्वरूप ॥३॥ ऐसा हा खेळ अनादि पसर । एकाजनार्दनीं निर्धार नाम जपा ॥४॥

२४४६. देहाचिये माथां काळाची तों सत्ता । म्हणोनी सर्वथा घोका राम ॥१॥ आदि मध्य अंतीं काळ लागलाहे । क्षणक्षणां पाहें वास त्यासी ॥२॥ सर्व जाणोनियां अंधळे पैं होती । काळ नेतांचि देखती ते दुजा ॥३॥ परि रामनामीं न धरिती विश्वास । निकट समयास धांवाधांवी ॥४॥ एकाजनार्दनीं भुलले ते प्राणी । तया सोडवणी कोण करी ॥५॥

२४४७. येवोनियां काळ बैसलासे उशां । झांकितोसी कैसा डोळे आतां ॥१॥ वाचे नारायण वदें तूं सादर । काळपाश साचार चुके जेणें ॥२॥ वांयां हा संसार करसी हाव भरी । काळाची तो फेरी निकट आली ॥३॥ एकाजनार्दनीं नको यातायाती । संसार फजिती जन्म दुःख ॥४॥

२४४८. आलारे आला आला काळ निकटीं । रामनाम होटीं केव्हां जपसी ॥१॥ बाळ तरुण वृद्ध दशा ती पावली । काळाची पडली छाया अंगीं ॥२॥ यातायाती करतां जन्म वांयां गेला । परी नाहीं वदला मुखीं राम ॥३॥ एकाजनार्दनीं फजितखोर जीणें । सर्वांचि मरणें पुढती जन्म ॥४॥

२४४९. देह हा काळाचा जाणार शेवटीं । याची धरुनी मिठी गोडी काय ॥१॥ जाणार जाणार जाणार हें विश्व । वाउगाचि सोस करसी काय ॥२॥ प्रपंच काबाड एरंडांचे परी । रसस्वाद तरी कांहीं नाहीं ॥३॥ नाशिवंतासाठीं रडतोसी वांयां । जनार्दनीं शरण निघें तूं पायां ॥४॥ एकाजनार्दनीं भेटी होतां संतांची । मग जन्ममरणाची चिंता नाहीं ॥५॥

२४५०. सावधान सर्व आहे । तुझे हात आणि पाय । तोंवरी तूं जाय । तीर्थयात्रेकारणें ॥१॥ सरलीया आयुष्यकाळ । इंद्रियें होतील विकळ । कांहीं न चाले बळ । वाउगी ते तळमळ ॥२॥

डोळे कान नाक आहे । तोंवरी संतां शरण जाय । हीं मावळलीया होय । हायहाय तुजलागीं ॥३॥ काय म्हणशी माझें माझें । हें तों शेवटींचें वोझें । एकाजनार्दनीं दुजें । तुज कोण सोडवील ॥४॥

२४५१. काय याची मुखीं बैसे दांतखीळ । नामोच्चारा बळ क्षीण होतें ॥१॥ काय याचे कर्ण बधिर पैं वहिले । हरिकीर्तनीं जाहले पांगुळ ते ॥२॥ काय याचे नेत्रां अंधत्व तें आलें । न देखती सांवळें रूप कधीं ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसा तो चांडाळ । त्याचा मज विटाळ नको नको ॥४॥

२४५२. सुखरूप असतां ह्मणे माझें माझें । संकट देखोनियां घाली देवावरी वोझें ॥१॥ पापी तो अधम मती । कदा नेणे नामस्मरण गति ॥२॥ नामावांचोनी गति नाहीं । ऐसें वेदशास्त्रें बोलती पाहीं ३ एकाजनार्दनीं ह्मणे भुलला । पुनः अधम जन्मा आला ॥४॥

२४५३. होईं शरणागत भाकीरे करुणा । तरीच बंधना चुकशील ॥१॥ आपुलें तूं हित करूनियां घेईं । सदा वाचे गाईं रामनाम ॥२॥ जंववरी आहे इंद्रिय संबंध । तोंवरी तूं बोध करीं मना ॥३॥ एकाजनार्दनीं मावळलिया दीप । सहजचि खेप येईल बापा ॥४॥

२४५४. चौऱ्यांयशीं लक्ष योनी फिरे । परि मनीं सोय न धरे ॥१॥ दोंचि अक्षरांचें काम । अधम नुच्चारी रामनाम ॥२॥ मरतीयां हांसे । आपण स्वयें मरतसे ॥३॥ एकाजनार्दनीं भांड । जन्मोनी लाजविली रांड ॥४॥

२४५५. चौऱ्यांयशीं लक्ष देहप्रती । कोटी कोटी फेरे होती ॥१॥ अवचट देह मनुष्य जन्म । तेथें साधावें परब्रह्म ॥२॥ जन्मोनियां मनुष्य देहीं । परमार्थ साधिला तो नाहीं ॥३॥ सदा विषयीं अनुसंधान । भुले प्रपंचीं अनुदिन ॥४॥ तया नोहे संत भेटी । एकाजनार्दनीं जाती भेटी ॥५॥

२४५६. देहाची तों देह जोडी । साधी परमार्थ घडी ॥१॥ हेंचि निकें साधन । येणें न घडे बंधन ॥२॥ देहीं देह शुद्ध पाहे । सहज परमार्थ होये ३ सांडोनियां देहीं आटी । एकाजनार्दनीं तें भेटी ४

२४५७. आयुष्य देहींचें जंव पुरलें नाहीं । तंवचि हृदयीं राम

जपा ॥१॥ आपुलेच देहीं करा सोडवण । चुकवा पतन यमलोकीं ॥२॥ संसाराचा छंद वाउगा पसारा । यांत सैरावैरा हिंडूं नका ॥३॥ एकाजनार्दनीं धरा भरंवसा । श्रीराम सरसा वाचे वदा ॥४॥

२४५८. तूं ह्मणशील बा हें माझें माझें । वांयां वहासी वाउगें ओझें ॥१॥ सोडीं दे टाकूनि परता येईं । रामनाम वाचे सदा गाईं ॥२॥ नामाचि जाण सत्य सार । वांयां कां वहाशील भार ॥३॥ एकाजनार्दनीं नाम सार । वेदशास्त्रीं हा निर्धार ॥४॥

२४५९. जन्ममरणांच्या चुकवारे खेपा । यासी तो सोपा राममंत्र ॥१॥ वेळोवेळां वाचे उच्चारावें नाम । तेणें निष्काम प्राणी होय ॥२॥ सायास नाहीं अनायासें वर्म । वाचे रामनाम आठवावें ॥३॥ एकाजनार्दनीं नामाविण कांहीं । आणिक थोर नाहीं कलीमाजी ४

२४६०. सांडा वाउगे ते बोल । वाचे ह्मणा विठ्ठल विठ्ठल ॥१॥ तेणें तुटती यातना । भवपाश तुटेल जाणा ॥२॥ बैसला जिव्हारीं । व्यापूनि ठेला तो अंतरीं ॥३॥ एकाजनार्दनीं ध्यान । ध्यानीं मनीं विठ्ठल पूर्ण ॥४॥

२४६१. सीमगियाचे सणीं । रामकृष्ण न ह्मणे कोण्ही १ महाशब्द उच्चारण । कैसें भुलले अज्ञान ॥२॥ गजरें शब्द करी । एकाजनार्दनीं ह्मणा हरी ॥३॥

२४६२. नामाचा उच्चार करितां कोण्ही हांसे । तयासी होतसे नरकवास ॥१॥ साबडे बोबडे गावोत भलते । परि ते सरते पांडुरंगा ॥२॥ अभाविकामें मांडिला पसारा । तया नाहीं थारा उभयलोकीं ॥३॥ एकाजनार्दनीं भावाचें भजन । दंभाचें कारण नाहीं देवा ४

२४६३. नेणतेपणें पांडुरंगा ध्याईं । सदोदित गाईं रामनाम ॥१॥ मग तुज सोपे मार्ग ते असती । पांडुरंग चित्तीं दृढ धरीं ॥२॥ एकाजनार्दनीं कायावाचा मन । करीं समर्पण देवापायीं ॥३॥

२४६४. कां रे नायकसी गव्हारा । कां रे न भजसी ईश्वरा ॥१॥ सोपा मंत्र विठ्ठलराज । तेणें पुरे सर्व काज ॥२॥ नको संसाराचें कोड । अंतकाळीं यम दंड ॥३॥ एकाजनार्दनीं कींव भाकीं । रामनाम वदा सुखीं ॥४॥

२६४५. मना नको नको हिंडों दारोदारीं । कष्ट झाले भारी येतां जातां ॥१॥ कल्पना सोडोनि संतांसंगें राहें । सर्व सुख आहे त्यांचे पायीं ॥२॥ ज्याचिया दरुशनें शोक मोह जळे । पाप ताप पळे काळभय ॥३॥ जवळीच दिसे भावितां भावितां । एकाजनार्दनीं ध्यातां सुख मोठें ॥४॥

२६४६. मना सांडीं विषय खोडी । लावीं विठ्ठलेंशी गोडी ॥१॥ आणीक न लगे साधन । एकलें मन करीं उन्मन ॥२॥ विठ्ठल विठ्ठल सांवळा । पाहें पाहें उघडा डोळा ॥३॥ एकाजनार्दना शरण । मनचि होय विठ्ठल पूर्ण ॥४॥

२६४७. अरे अरे मना । कांहीं करीं विचारणा ॥१॥ शरण विठोबासी जाईं । मग राहीं भलते ठाईं ॥२॥ वाउगा तूं सोस । मना न करीं सायास ॥३॥ येतों काकुलती । एकाजनार्दनीं प्रीती ४

२६४८. न करीं तळमळ मना । चिंतीं चरणां विठोबाचे ॥१॥ राहें क्षणभरी निवांत । न करीं मात दुजी कांहीं ॥२॥ संतचरण वंदी माथां । तेणें सर्वथा सार्थक ॥३॥ एकाजनार्दनीं मात । मना ऐकें तूं निवांत ॥४॥

२६४९. आणीक साधनीं नको गुंतूं मना । धरीं या चरणां विठोबाच्या ॥१॥ वाउगा बोभाट कासया खटपट । पंढरीची वाट सोपी बहु २ एकाजनार्दनीं कायावाचा मनें । सतत रहाणें संतपायीं ३

२६५०, आणीकाची आस नको करूं मना । चिंतीं तूं चरणा विठोबाच्या ॥१॥ वाचे नाम गाये वाचे नाम गाये । वाचे नाम गाये विठोबाचें ॥२॥ करकटीं उभा चंद्रभागे तटीं । पुंडलिकापाठीं धरूनि ध्यान ॥३॥ ठेविले चरण दोन्ही विटेवरी । वाट पाहे हरी भाविकाची ॥४॥ एकाजनार्दनीं उभारुनी बाह्या । आलें-गीत आहे भोळे भोळे ॥५॥

२६५१. अंतरींचा भाव दृढ धरीं मना । सेवीं तूं चरणा विठोबाच्या ॥१॥ साधन आणीक नको कष्ट कांहीं । राममुखीं गायीं सदा नेमें. ॥२॥ आकार निराकार सर्वही व्यापक । तो उभा सम्यक समपदीं ॥३॥ एकाजनार्दनीं वाहूनियां आण । विठ्ठलाचे चरण ध्यावे आधीं ॥४॥

२६५२. बाउगी उपाधी न करीं रे मना। चिंतीं शा चरणा राघवाच्या ॥१॥ अंतकाळीं सखा कोणी नाहीं दुजा। पुत्र मल्ली वोजा न ये कामा ॥२॥ चालतांचि देह ह्मणती माझा माझा। अंतकाळीं पैजा यम बांधी ॥३॥ एकाजनार्दनीं सर्व हें मायीक। शाश्वत तो एक श्रीरामनाम ॥४॥

२६५३. मना तूं ऐक माझी मात। श्रीविठ्ठलीं धरीं कां रे हेत ॥१॥ कांहीं पडतां जड भारी। वाचे म्हणे विठ्ठलहरी ॥२॥ तुजही खूण निर्वाणीं। शरण एकाजनार्दनीं ॥३॥

२६५४. मना ऐक हे विनंती। तूं न करीं दुजी खंती। विठ्ठलावांचुनी प्रीती। दुजी नको आणीक ॥१॥ बाउगा तूं न करीं सोस। दृढ घालीं तूं कास। धरीं पां विश्वास। विठ्ठलचरणीं ॥२॥ सांडीं माझें आणि तुझें। बाउगें नको वाहूं वोझें। निपजती बीजें। संतचरणीं सकळ ॥३॥ हेंचि साधनांचें सार। श्रीविठ्ठलमंत्र उच्चार। एकाजनार्दनीं वेरझार। येणें तुटे समूळ ॥४॥

२६५५. मना निश्चय तूं करीं। ह्मणे जाईन पंढरी ॥१॥ नेम धर्म हाचि माझा। पंढरीवांचूनि नाहीं दुजा ॥२॥ सर्व तीर्थांचें माहेर। विटे उभा कटीं कर ॥३॥ आवडीनें धरा भाव। एकाजनार्दनीं भेटे देव ॥४॥

२६५६. भक्त करुणाकर दीनाचा वत्सल। उभा श्रीविठ्ठल विटेवरी ॥१॥ मना जाय तेथें मना जाय तेथें। मना जाय तेथें पंढरीये ॥२॥ पुरतील काम निवारेल गुंती। आहे ती विश्रांति संतसंगें ॥३॥ आषाढी कार्तिकी सोहळा आनंद। मिळालासे वृंद वैष्णवांचा ॥४॥ एकाजनार्दनीं आनंदीं आनंद। तेणें परमानंद डुल्लतसे ॥५॥

२६५७. विठ्ठल पंढरपूर निवासी। विठ्ठल उभा भिवरेसी। विठ्ठल पुंडलिकापाशीं। भक्ति प्रेमेंशी तिष्ठत ॥१॥ जाईं जाईं मना तेथें। सुखें वैष्णव नाचती जेथें। ब्रह्मानंद पद दरुशनमात्रें। देत आहे भक्तांसी ॥२॥ सुलभ सुलभ मंत्रराज। शंभु जाणे निजबिज। एकाजनार्दनीं गुज। सांगतसे भाविकां ॥३॥

२६५८. लाभें लाभ हातांसी ये। हेंचि सोय धरीं मना ॥१॥ वाउगा सोस नको बाहूं। सुखें गाऊं विठ्ठला ॥२॥ नको नको श्रम पसारा। सैरा वैरा धांवूं नको ॥३॥ निवांत सेवीं हरिकीर्तना। एकाजनार्दनीं म्हणे मना ॥४॥

२६५९. निवांतपणें मना चिंती तूं चरणा। आणिक कल्पना न करीं कांहीं ॥१॥ चिंतीं पां विठ्ठल कायावाचा मनें। संसार बंधन तुटेल तेणें ॥२॥ संसाराची वार्ता नुरेचि पां कांहीं। आणिक प्रवाहीं पडूं नको ॥३॥ एकाजनार्दनीं विठ्ठलनामीं छंद। मना तूं गोविंद आठवीं कां रे ॥४॥

२६६०. मना ऐक एक मात। धरी हरिनामीं हेत ॥१॥ तेणें चुकती बंधनें। वाचे म्हणे नारायण ॥२॥ नारायण नाम। तेणें सर्व होय काम ॥३॥ दृढ धरीं भाव। न करीं आणिक उपाव ॥४॥ उपाव न करीं कांहीं। शरण देवासी तूं जाईं ॥५॥ एकाजनार्दनीं मन। करीं देवासी अर्पण ॥६॥

२६६१. मना तूं एक करीं। वाचे आठवीं श्रीहरी ॥१॥ आणिक न करीं साधन। वाचे म्हणे नारायण ॥२॥ सर्वकाळ हाचि धंदा। वाचे आठवीं गोविंदा ॥३॥ तेणें जीवा सोडवण। शरण एकाजनार्दन ४

२६६२. अरे अरे मना। सत्य सत्य धरीं ध्याना। पंढरीचा राणा। वेध ठेवीं तयाचा ॥१॥ तुज नाहीं रे बंधन। सहज आकळे ब्रह्मज्ञान। वाउगें शोधन। नको करूं ग्रंथांचें ॥२॥ मागां तुज शिकविलें। परि तूं रे नायकशी वहिलें। तुझें हित तुज कथिलें। शुद्धि करीं कांहीं ते ॥३॥ तूं अनिवार सर्वांसी। ह्मणोनी कींव भाकितों तुजसी। शरण गुरुजनार्दनासी। एका भावें जाईं तूं ॥४॥ एकाजनार्दनीं शरण। जातां होईल समाधान। वाउगें नको भ्रमण। चरणीं राहें निवांत ॥५॥

२६६३. अरे माझ्या मना। नित्य भजें नारायणा ॥१॥ तेणें तुटेल बंधन। उभय लोकीं कीर्ति जाण ॥२॥ मिळेल सकळ संपत्ति। नाश पावेल विपत्ति ॥३॥ प्राप्त होय ब्रह्मपद। वाचे वदावा गोविंद ॥४॥ एकाजनार्दनीं मन। सदा चिंती नारायण ॥५॥

२६६४. माझ्या मना लागो छंद । नित्य गोविंद गोविंद ॥१॥ तेणें निरसेल बंधन। मुखीं वदें नारायण ॥२॥ ब्रह्मरूप होय काया । माया जाईल विलया ॥३॥ होय सर्व सुख धणी । चुके जन्ममरण खाणी ॥४॥ ह्मणे एकाजनार्दन । सदा समाधान मन ॥५॥

२६६५. मनें नागविलें बहुतापरी । धांव धांव तूं श्रीहरी ॥१॥ आतां माझें मन । दृढ ठेवावें आकळून २ वाहात चालिलों मनामागें । बुडतसे प्रपंच गंगे ३ धांवें धांवें विठाबाई । एकाजनार्दनीं लागे पायीं ४

२६६६. काय तुझें वेंचे देवा । मन आपुलें स्वाधीन ठेवा ॥१॥ हेंचि मागणें तुजप्रती । वारंवार हे विनंती ॥२॥ माझी ठेवा आठवण । ह्मणे एकाजनार्दन ॥३॥

२६६७. माझ्या मनाचें तें मन। चरणीं ठेवावें बांधून ॥१॥ मग तें जाऊं न शके कोठें । राहे तुमच्या नेहटें ॥२॥ मनासी तें बळ । देवा तुमचें सकळ ॥३॥ एकाजनार्दनीं देवा । मन दृढ पायीं ठेवा ॥४॥

२६६८. पायीं ठेविलिया मन। सहज होईन उत्तीर्ण ॥१॥ आलों ज्या कारणा । तेंचि करवा पंढरीराणा ॥२॥ वाउगी ती आस। मनीं नसावी सायास ॥३॥ येतों काकुलती । एकाजनार्दनाप्रती ॥४॥

२६६९. तापलीया तापें शिणलीया मार्गीं । पोहे ठाकी वेगीं कृष्णकथा ॥१॥ कृष्णकथा गंगा सांवळें उदक । मना बुडी दे कां बोल्हावसी ॥२॥ बोल्हावलें मन इंद्रियां टवटवी । गोपिराज जीवीं सांठविलें ॥३॥ सांठविलें जीवीं जाणा याची खुणा । जरी होय करुणा सर्वांभूतीं ॥४॥ सर्वांभूतीं राम दृष्टीचें देखणें । नाहीं दुजें पेणें आडवस्ती ॥५॥ आडवस्ती नाहीं एकाजनार्दनीं । श्रीरामा-वांचुनी आन नेणें ॥६॥

२६७०. तुज सांगतसें मना । पाहें पंढरीचा राणा ॥१॥ नको दुजा छंद कांहीं। राहें विठ्ठलाचें पायीं २ विषयीक वासना। सोडीं सोडीं सत्य जाणा ॥३॥ जेणें घडे सर्व सांग । फिटे संसाराचा पांग ॥४॥ ह्मणे जनार्दनाचा एका । सुलभ उपाव नेटका ॥५॥

२६७१. जन्ममरण सांकडें निवारावया कोडें । विठ्ठल उघडें पंढरीये ॥१॥ तयाचे चरणां मिठी घालीं मना । नाहीं तुज यातना

जन्मकोटी ॥२॥ चंद्रभागे स्नान पुंडलीक भेटी । पूर्वजां वैकंठीं मार्ग सोपा ॥३॥ महाद्वारीं नाचा जोडोनियां पाणी । पुढें चक्रपाणी उभा विटे ॥४॥ एकाजनार्दनीं तयांसी भेटतां मोक्ष । सायुज्यता पायीं लागे ॥५॥

२६७२. मन रामीं रंगलें अवघें मनचि राम जालें । सबाह्य अभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें ॥१॥ चित्तचि हारपलें अवघें चैतन्यचि जालें । देखतां देखतां अवघें विश्व मावळलें । पहातां पहातां अवघें सर्वस्व ठकलें ॥२॥ आत्मयारामाचें ध्यान लागलें मज कैसें । क्रियाकर्म धर्म अवघें येणेंचि प्रकाशे । सत्य मिथ्या प्रकृति पर रामचि अवघा भासे ॥३॥ भक्ति अथवा ज्ञान शांति आणिक योगस्थिति । निर्धारितां न कळे रामस्वरूपीं जडली प्रीति । एकाजनार्दनीं अवघा रामची आदिअंतीं ॥४॥

# भाग तिसरा.

## आत्मस्थिति.

### उपासना.

२६७३. येऊनी नरदेहा गमाविलें आयुष्य । नाहीं हृषिकेश स्मरला मनीं ॥१॥ मुखें नाहीं केलें देवाचें स्मरण । ऐसा अधम जन जाहलों देवा ॥२॥ नाहीं तें ऐकिलें कीर्तन संतांचें । कर्ण बधिर साचे जाहले देवा ॥३॥ करें नाहीं केला दानधर्म कांहीं । ऐसा अपराधी पाहीं जाहलों देवा ॥४॥ चरण न चालती तीर्थयात्रेप्रती । ऐसा आत्मघाती जाहलों देवा ॥५॥ एकाजनार्दनीं संसाराचा छंद । नाहीं तो गोविंद आठविला ॥६॥

२६७४. कासया निर्मिला अपवित्र संसार । न घडे विचार योग्यायोग्य ॥१॥ दिननिशीं मना द्रव्याची वासना । परी नारायणा स्मरण नाहीं ॥२॥ ऐसा मी भुललों प्रपंच लिगाडीं । एकाजनार्दनीं उडी घालीं देवा ॥३॥

२६७५. कासया संसार लाविला छंद । तेणें हा गोविंद अंतरला ॥१॥ न कळे दिवस जातो तें कळेना । संसार भ्रमणा फिरतसों ॥२॥ एकाजनार्दनीं भाकितों करुणा । माझिया वचना चित्त द्यावें ३

२६७६. आशामनीषातृष्णा बांधिती दांवणीं । सोडवी चक्रपाणी संतसंगें ॥१॥ कामक्रोधलोभ याचा पसार । पाडिती विसर तुझा देवा ॥२॥ मोह ममता भ्रांति ढकलिती कूपीं । दावी पैं सोपी वाट आम्हां ॥३॥ जनार्दनाचा एका विनवी सर्वांतें । भजा एकचित्तें विठोबासी ॥४॥

२६७७. आशा पाश देवा नको या संसारीं । नको चौऱ्यांयशीं फेरी वेरझार ॥१॥ सोडवी देवा कुसंगा टाकून । मन तें उन्मन तुझे चरणीं ॥२॥ एकाजनार्दनीं मनोगत सिद्धी । कैं कृपानिधी पुरवाल ॥३॥

२६७८. जन्म जरा मरण व्याधी । ही तो उपाधी लागलीसे ॥१॥ लिगाड तें मुळीं वांयां । जैशी छाया अभ्रांची ॥२॥ विषयकर्दमाचे मेळीं । विठ्ठल वनमाळी येवों आतां ॥३॥ एकाजनार्दनीं ध्यास । अवघी आस पायां पैं ॥४॥

२६७९. संचित माझें वोखटें देवा । तुह्मी केशवा काय करा ॥१॥ पहा वासुगी शिव कंठीं । क्षुधा पोटीं वायूची ॥२॥ एका-एकाजनार्दनीं शरण । कर्मचि गहन पैं माझें ॥३॥

२६८०. धांव रे धांव आतां । दीनवत्सला रामा । संसारसंग गोष्टी । मी गुंतलों कामा ॥१॥ तारुण्य अभिमानें । अंगीं भरला ताठा । विषय संपत्तीचा । मज फुटला फाटा ॥२॥ विषय भोगितांना । देह पोसलें माझें । स्वहित आठवेना । ध्यान चुकलों मी तुझें ॥३॥ विषया मोकलिलों । तुज शरण मी आलों । एकाजनार्दनीं पायीं । लीन मी जाहालों ॥४॥

२६८१. धांव नारायणा । माझ्या दुःखाच्या निरसना ॥१॥ संसारें मी कष्टलों । तुजलागीं शरण आलों ॥२॥ कोण सोडवील आतां । तुजविण जी अनंता ॥३॥ तूंचि मायबाप । निवारिसी सर्व ताप ॥४॥ एकाजनार्दन पाय । धरूनियां चित्तीं राहे ॥५॥

२६८२. धांवे धांवे श्रीहरी । निवारी संसार बोहरी ॥१॥ आडलियाचा विसांवा । धांवें पावें तूं केशवा ॥२॥ तूं दीनदयाळ हरी । आपुलें आह्मा जतन करी ॥३॥ अंकित भक्तांचा । ऐसी बोले वेदवाचा ॥४॥ एकाएकीं जनार्दनीं । आठ सहस्र बोले वाणी ५

२६८३. तुजविण आम्हां कोण आहे देवा । धांव यादवराया मायबापा ॥१॥ पडिलोंसे डोहीं प्रपंच आवर्ती । कोण करी शांति तुजवीण ॥२॥ जन्ममरणाचा पडिलासे फेरा । सोडवीं दातारा मायबापा ३ एकाजनार्दनीं धांवे लवलाही । येवोनियां हृदयीं ठाव देई ४

२६८४. सांडिला प्रपंच जाहलोंसे उदास । सर्वभावें कास धरिली तुमची ॥१॥ आतां माझें हित करीं गा देवराया । नाहीं तरी वांयां सहज गेलों ॥२॥ लौकिकाची चाड नाहीं मज शंका । तुह्मावांचूनी एका पांडुरंगा ॥३॥ एकाजनार्दनीं पायाची आवडी । सर्व माझी जोडी नाम तुझें ॥४॥

२६८५. ब्रीदावळी करी आपुली जतन । आलों मी शरण जनार्दना ॥१॥ राखी माझी लाज पतीत पतीत । तुझा मुद्रांकित रंक एक ॥२॥ कामक्रोध लोभ दंभ अहंकार । हे देहीं अनिवार सोसवेना ॥३॥ आशा मनीशा माया सखीया सांगातिणी । करिती गौसणी सदा जीवा ॥४॥ चित्त वित्त आशा लागलीसे पाठीं । इहीं जीवें साठीं केली मज ॥५॥ जनार्दना शरण अनन्य पैं एका । कायेवाचे देखा चरणीं विनटला ॥६॥

२६८६. तुमच्या चरणांपरतें । शरण न जाय आणिकांतें ॥१॥ ऐसे चरण पावन । उद्धरले असंख्य जन ॥२॥ चरणरजाचें ध्यान । शंकर करितो आपण ३ एकाजनार्दनीं शरण । धरिले चरण न सोडीं जाण ४

२६८७. अहो करुणाकरा पतितपावना । आमुच्या वचना चित्त द्यावें ॥१॥ दीन मी हीन रंकाहुनी रंक । म्हणोनियां देख शरण तुझा ॥२॥ आमुचें सांकडें वारूनियां देवा । द्यावी तुझीं सेवा एक चित्तें ३ एकाजनार्दनीं संकल्प हा दृढ । आतां नाहीं गूढ तुझापुढें ४

२६८८. कीर्ति तुमची तिहीं लोकीं । तारिले पातकी अपार ॥१॥ जाहला विश्वास आधीं मना । धरिलें चरणां दृढ मग ॥२॥ एकाजनार्दनीं लडिवाळ । करा सांभाळ आतां माझा ॥३॥

२६८९. कृपाळु माधव तूं मुरारी । अच्युता अनंता श्रीहरि १ तुह्मीं तारिलें अहिल्येसी । उद्धरिलें अजामेळासी ॥२॥ महा दोषांची दोष श्रेणी । ती तारिली कुंटणी ॥३॥ रामनाम जपे अनुदिनीं । शरण एकाजनार्दनीं ॥४॥

२६९०. त्रिभुवनीं तुमची थोरी । पतीतपावन म्हणती हरी ॥१॥ तें हें तारक सत्यनाम । शंकराचा तूं विश्राम ॥२॥ ब्रीद गाजे पतितांचें । तिहीं लोकीं तुमचें साचें ॥३॥ शरण एकाजनार्दन । आम्ही पतीत तूं पावन ॥४॥

२३९१. ज्याचा केला अंगिकार । न मानी भार त्याचा हा ॥१॥ अरिमित्रां सम देणें । एकचि पेणें वैकुंठ ॥२॥ उत्तम मध्यम चांडाळ । देणें स्थळ एकची ॥३॥ एकाजनार्दनीं भाकीं कींव । उद्धारा जीव पातकी ॥४॥

२६९२. उपमन्यु प्रल्हाद तारिले आळीकें । मी तुझें लाडकें सानपणें ॥१॥ नेणतीयासी धांवसी तूं त्वरा । शाहणे वेरझारा मरताती ॥२॥ एकाजनार्दनीं शरण एकपणीं । नेणतां जाणतां चरणीं तुझे देवा ॥३॥

२६९३. पोटींचें बाळ अवगुणी वोखटें । परि मायबापा स्नेहो मोठें ॥१॥ तयापरि उद्धरा आलों जी स्वामी । अवगुणाच्यापरी उपेक्षा तुम्ही ॥२॥ गुण नाहीं तेथें कर्म कैंचें धड । परि मायबापा वाटतसे कोड ॥३॥ एकाजनार्दनीं उद्धव साचें । म्हणोनी हरिदासा कौतुक त्याचें ॥४॥

२६९४. जेणें जेणें आमुच्या मना समाधान । तें तें करूं ध्यान तुमचें देवा ॥१॥ करुणाकर तुह्मी पतित पावना । अहो नारायणा वेदवंद्या ॥२॥ भाकितसों कींव होऊनि उदास । आतां निराश नका करूं ॥३॥ एकाजनार्दनीं नका दुजें आतां । अहो रुक्मादेवीकांता पांडुरंगा ॥४॥

२६९५. शरणागता कृपाळु उदार पंढरीराणा । जाणतसे खुणा अंतरींच्या ॥१॥ तिहीं त्रिभुवनीं चाले एक सत्ता । ह्मणोनि तत्त्वतां कींव भाकीं ॥२॥ करुणाकर तुह्मी भक्तांचें जीवन । हें आह्मां वचन श्रुतिवाक्य ॥३॥ एकाजनार्दनीं आलोंसे शरण । कायावाचा मन जडलें पायीं ॥४॥

२६९६. साचपणें माझें करावें धांवणें । कायावाचामनें शरण तुह्मां ॥१॥ अहो पंढरीराया नका आतां दुजें । विश्रांति सहज तवचरणीं ॥२॥ एकाजनार्दनीं माझा अभिमान । वाढविलें आपण ह्मणोनियां ॥३॥

२६९७. बहु उतावीळ । पांडुरंगा तूं दयाळ ॥१॥ मागें तारिलें बहुतां । माझी असों द्यावी चिंता ॥२॥ दयाळ तूं पांडुरंगा । मज धरावें वोसंगा ॥३॥ सेवा तुह्मीं देवा । केली दुर्बळाची केशवा ॥४॥ उचिता उचित । एकाजनार्दनीं मात ॥५॥

२६९८. भजन नाहीं मी अकर्मी वांयां । अभिनव अवगति जाली देवराया ॥१॥ नीचां नीच मीची एकु । मजवरी उपवरी

घतें सकळ लोकु ॥२॥ अंधाअंध अधोगत पाही । मजहुनी अंधा-अंध कोणी नाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं नीच हा नेला । मुंगीयाचे पाईं सगळा सामावला ॥४॥

२६९९. पंचाननें मज घेतिलें वेढून । नेताती काढून प्राण माझे ॥१॥ गजेंद्राकारणें त्वां घातली उडी । तैसा लवडसवडीं धांवें देवा ॥२॥ तुजवांचून मज नाहीं आधार। एकाजनार्दनीं पार उतरी देवा ॥३॥

२७००. अहो नारायणा । सांभाळावें आह्मां दीनां ॥१॥ आमुची राखावी ती लाज। परंपरा हेंचि काज ॥२॥ सांभाळावी ब्रिदावळी। करुणा कल्लोळीं दयाळा ॥३॥ एकाजनार्दनीं शरण। करुणाकर पतितपावन ॥४॥

२७०१. थोर अन्यायी दयाघना। सांभाळीं दीना आपुल्या ॥१॥ वारंवार क्षणक्षणीं। मस्तक चरणीं तुमच्या ॥२॥ कुर्वंडीन आपुली काया। तुमचे पायांवरुनी ॥३॥ एकाजनार्दनीं तुमचा दास। न करा उदास तयासी ॥४॥

२७०२. तुह्मी कृपावंत देवा। माझा हेवा चुकवावा ॥१॥ सांपडलों काळाहातीं । उगवा गुंती तेवढी ॥२॥ माझें मन तुमचे चरणीं। राहो चक्रपाणी सर्वदा ॥३ शरण एकाजनार्दनीं। तुम्ही धनी ब्रह्मांडीं ॥४॥

२७०३. आह्मां तुमचा भरंवसा। सांभाळावें जगदीशा ॥१॥ आपुली आपण जतन करा। ब्रीदावळी हे दातारा ॥२॥ आम्हीं पतितांनीं कोडें। तुह्मां घातलें सांकडें ॥३॥ शरण एकाजनार्दनीं। मोक्ष मुक्ती तुमचे चरणीं ॥४॥

२७०४. वांयां बोभाट अनंता। शरणागता उपेक्षिलिया ॥१॥ अपमानाचें भातुकें। तुह्मा सुखें देतील ॥२॥ एकापरिस एक थोर। तुमचा बडिवार चालूं न देती ॥३॥ विनवी जनार्दनाचा एका। देवा लौकिका सांभाळा ॥४॥

२७०५. तुम्हीं बहुतांचें केलेंसे धांवणें। आतां नारायणें कठिण केलें ॥१॥ होउनी उदास अवलोकितों दिशा। पुरवा माझी

इच्छा मायबापा ॥२॥ एकाजनार्दनीं त्रैलोकीं नाम । तुह्मी तो निष्काम देवा बहु ॥३॥

२७०६. धांवण्या धांवतां न लावा उशीर । हा श्रेष्ठाचार मार्गे आला ॥१॥ गुणदोष नाहीं पाहिले कवणाचे । केलें बहुतांचें धांवणें देवा२ एकाजनार्दनीं पतितपावन । हें तों तुम्हां वचन साजतसे ३

२७०७. जाणा पाळूं कळा । कृपाळुवाजी दयाळा ॥१॥ कांहो आतां उपेक्षिलें । मज दीनासी ये वेळे ॥२॥ पाहतों वास देउनी धीर। कांहो पडियेला विसर ॥३॥ चित्त सर्व तुमचे पायीं । कृपावंता भेटी देई ॥४॥ एकाजनार्दनीं एकपणें । तया नाहीं दुजें पेणें ॥५॥

२७०८. तुह्मी कृपाळ कृपाळ । विश्व जन प्रतिपाळ ॥१॥ ह्मणोनि येतों काकुलती । कृपाळुवा श्रीपती ॥२॥ एकाजनार्दनीं देवा। सर्व सारूनि पायीं ठेवा ॥३॥

२७०९. अनाथाचा नाथ दीनाचा दयाळ । म्हणवोनी सांभाळ करीं माझा ॥१॥ तुज ऐसा देव नाहीं त्रिभुवनीं । म्हणवोनी चरणीं विनटलों ॥२॥ बापाजनार्दना कृपा करीं दान । सांभाळीं वचन आपुलें तें ॥३॥ एकाजनार्दनीं भेटी देई देवा । संता-पाई भावा मिठी पडो ॥४॥

२७१०. आनंदाचा भोग घालीत आसनीं । वैकुंठनिवासिनी तुझे नांवें ॥१॥ येई वो विठ्ठले अनाथाचे माथे । पंढरीदैवते कुळ देवी ॥२॥ आपुलें म्हणावें सनाथ करावें । एकाजनार्दनीं वंदावें संतजना ॥३॥

२७११. कैं तयामार्गी चरण चालती । ऐशी वाटे खंती दीन-रातीं ॥१॥ कैं या मनाची पुरेल वासना । कैं मिठी चरणा देईन जीवें ॥२॥ कैं हें भाळ ठेवीन चरणीं । कैं पायवणी घेईन सुखें ॥३॥ एकाजनार्दनीं कैं होईल कृपादान । कैं नारायण प्रेमें भेटे ४

२७१२. वारंवार देहीं हेचि पैं वासना । अखंड चरणा घालीन मिठी ॥१॥ हा माझा नवस आठवीन पाय । आणीक तें कांहीं नेणें दुजें ॥२॥ संकल्पासी कैं येईल अंकुर । कैं धीराधीर होईल मन ३ एकाजनार्दनीं अखंड वासना। पुरवा नारायणा देउनी भेटी ४

२७१३. कृपाळु माउली उभी भीमातटीं । लागलीसे आशा जीवासी मोठी ॥१॥ कई भेटेल माझा मायबाप । उजळोनी दीप वोवाळीन श्रीमुख ॥२॥ शून्य स्थावर व्यापुनी वेगळा राहे । एकाजनार्दनीं वंदीन त्याचे पाय ॥३॥

२७१४. हीच मुख्य उपासना । तुमच्या चरणां दंडवत ॥१॥ गुणदोष पाहूं नका । कीर्तनीं सुखा लुटावें ॥२॥ संत चरणीं सदा भाव । करा वाव संसार ॥३॥ लडिवाळ जनार्दना एका । कींव देखा भाकितसे ॥४॥

२७१५. कैं मनींची इच्छा पुरेल ही धांव । पाहीन पंढरीराव जाऊनियां ॥१॥ आलीया जन्मांचें होईल सार्थक । निवारेल दुःख भय पीडा ॥२॥ कैं हें मस्तक ठेवीन चरणीं । पाहीन डोळे भरूनि श्रीमुख तें ॥३॥ एकाजनार्दनीं कैं होईन पाल । नासिल समस्त तापत्रय ॥४॥

२७१६. माहेरींची वास पाहीन मी डोळां । संतांचा पैं मेळा येतां देखें ॥१॥ घालुनी दंडवत लागेन मी पाई । जीव हा उतराई करूनि सांडी ॥२॥ कुर्वंडीन काया तयावरून भावें । जीवें वोवाळावें जीवलगा ॥३॥ आषाढी कार्तिकी प्रेमें करती वारी । तयांची मी थोरी काय वानूं ॥४॥ एकाजनार्दनीं धन्य ते दैवाचे । निरंतर वाचे विठ्ठलनाम ॥५॥

२७१७. मागणें हेंचि माझें देवा । दुजेपण दुरी ठेवा ॥१॥ मी तूं ऐसी नको उरी । जनार्दना कृपा करी ॥२॥ रंक मी एक दीन । माझें करावें स्मरण ॥३॥ नीच सेवा मज द्यावी । एकाजनार्दनीं आस पुरवावी ॥४॥

२७१८. आम्ही दीन तूं दीनानाथ । तिहीं लोकीं तुझी मात ॥१॥ आम्ही पतीत तूं पावन । ऐसें साजे नामाभिधान ॥२॥ आम्ही अनाथ तूं कैवारी । ऐसी तुझी आहे थोरी ॥३॥ आम्ही दीन तूं वत्सल । ऐकिला तो ऐसा बोल ॥४॥ नको धरूं दुजें आतां । कृपाळू तूं दीनानाथा ॥५॥ एका शरण जनार्दनीं । ऐसें चालत आलें दुरुनी ॥६॥

२७१९. संपत्ती संतती मजला नावडे । स्वरूप आवडे तुझें देवा ॥१॥ तुझ्या रूपीं सुख मानिया लोचनां । आणिक नारायणा न पाहती ॥२॥ हस्त इच्छिताती तुज भेटावया । सेवाहि कराया सर्व काळ ॥३॥ चित्त जडलें पायीं सदा सर्व काळ । राहिली तळमळ तयाची ते ॥४॥ एकाजनार्दनीं तुझें नाम मुखीं । नको आणिका सुखीं गोऊं मज ॥५॥

२७२०. देव तुष्टला मग दे घे । तुजवांचूनि कांहीं नेघे ॥१॥ देवा इतुली कृपा करी । जो मी तुझा घोट भरी ॥२॥ आणीक कांहीं मागेन जरी । तरी मज दंडावें हरी ॥३॥ वैकुंठ देई रे एका । तो तंव फोडीव फटका ॥४॥ क्षीरसागर शेषशयन । इतुकें न दे चाळवण ॥५॥ सोहं पद विसावून । देतां घेतां लाजिरवाणें ॥६॥ एकाजनार्दनीं तुष्टला । सकल सर्वांगीं घोटला ॥७॥

२७२१. वारंवार संतसंग । गाऊं अभंग हरि नाम ॥१॥ वाचे कीर्ति पाय पंथीं । आणिकांची स्तुती न गाऊं ॥२॥ एकविधपणें राहूं । वाचे गाऊं विठ्ठल ३ एकाजनार्दनीं सेवा । तुमचे देवा दास्यत्व ४

२७२२. मज तो आणीक नाहीं चाड । येवढी जोड पायांची ॥१॥ वास द्यावा पंढरीचा । संतांचा समागम ॥२॥ कीर्तनीं नाचेन महाद्वारीं । गरुडपारीं कान धरूनि ॥३॥ ऐसें लडिवाळ तान्हें । एकाजनार्दनाचें पोसणें ॥४॥

२७२३. माझें मन राखोनी पायीं । करा समाधान देहीं ॥१॥ हेंचि मागतों साचार । वारंवार जोडोनि कर ॥२ ब्रह्मज्ञानाची आटी । नका योगाची कसवटी ॥३॥ भुक्तिमुक्ति नका आड । ब्रह्म सायुज्यता भीड ॥४॥ लागतो चरणा । शरण एकाजनार्दना ॥५॥

२७२४. माझें मन अति चंचळ । त्यासी बांधा तुह्मी सबळ ॥१॥ मग तें कोठें नव जाय । तुमचे सोडोनियां पाय ॥२॥ सुख दुःखाचें कारण । मनाचि हें अधिष्ठान ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । मनें मनासी बंधन ॥४॥

२७२५. माझें मन राहो तुझे पायीं । वास पंढरीचा देई ॥१॥ जन्म देशी भलते परी । वाचे राम विठ्ठल हरी २ जन्मासीया भिणें ।

हें तों आम्हां लाजिरवाणें ॥३॥ मोक्षमुक्तितें देवा । नको गोऊं तया ठाया ४ ह्मणे जनार्दनीं एका । संतसंग द्यावा निका ॥५॥

२७२६. वाउगे बोल जाती वांयां । पंढरीराया कृपेविण ॥१॥ तुमचा छंद वसो मनीं । संतचरणीं वास सदा ॥२॥ नको आत्मस्थिति वांयां शीण । तुह्मांविण दयाळा ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । मनाचें मोहन तुह्मी माझे ॥४॥

२७२७. जेथें जेथें मन जाईल वासना । फिरवावें नारायणा हेंचि देईं ॥१॥ वारंवार द्यावा नामाचा आठव । कुबुद्धीचा ठाव पुसा सर्व ॥२॥ भेदाची भावना तोडावी कल्पना । छेदावी वासना समूळ कंद ॥३॥ एकाजनार्दनीं नका दुजा छंद । रामकृष्ण गोविंद आठवावा ॥४॥

२७२८. येवढा पुरवा मनींचा छंद । वाचे गोविंद आठऊं द्या ॥१॥ मग मीं तुमच्या न सोडीं पायां । करीन काया कुर्वंडी ॥२॥ वारंवार क्षणक्षणा । संत चरणां वंदीन ॥३॥ दुजा नका कांहीं हेत । एकाजनार्दनीं मागत ॥४॥

२७२९ मागणें तें एक आह्मांप्रती द्यावें । निरंतर यावें जागरणा ॥१॥ या हरिदासाचा संग बरवा । आनंद राघवा गाऊं गीतीं ॥२॥ जो न लभे तप तीर्थदानीं । तो हरिकीर्तनीं तिष्ठतसे ॥३॥ जनार्दनाचा एका ह्मणे । कृपा करणें जागरणें ॥४॥

२७३०. सर्वभावें विनवणी । मस्तक चरणीं देवाच्या ॥१॥ सदा पहावें रूप डोळां । वाचे चाळा हरि नाम ॥२॥ निजध्यास कीर्तनाचा । समागम तो संतांचा ॥३॥ एकाजनार्दनीं ह्मणे देवा । हेंचि सेवा मज द्यावी ॥४॥

२७३१. आमुच्या निज सुखधामा । तुझे चरण पुरुषोत्तमा ॥१॥ आह्मावरी कृपा करा । उद्धारा दातारा दीनासी ॥२॥ देऊनियां नाम कीर्ति । वसवा मूर्ति हृदयीं ॥३॥ एका शरण जनार्दनीं । ठाव मागतसे चरणीं ॥४॥

२७३२. तुमचे वर्णितां पोवाडे । कळिकाळ पायां पडे ॥१॥ तुमची वर्णितां बाळलीळा । ते तुज आवडे गोपाळा ॥२॥ तुमचें

वर्णीन हास्य सुख । त्याचें छेदिसी संसार दुःख ॥३॥ तुमचे दृष्टीचें दर्शन । एकाजनार्दनीं तें ध्यान ॥४॥

२७३३. कांहीं न करूं आणीक आन । वाचे गुण गाऊं तुमचे ॥१॥ पाहूं डोळेभरी मुख । तेणें सुख इंद्रिया ॥२॥ न करूं कोणा ताडातोडी । आहे ती खोडी दूर करूं ॥३॥ एकाजनार्दनीं प्रमाण । वाचे नारायण आठवूं ॥४॥

२७३४. श्रवणीं ऐकेन तुमचें गुण नाम । वाचे आणीक काम न करी कांहीं ॥१॥ डोळे भरूनियां पाहीन श्रीमुख । सुखाचें तें सुख हृदयांत ॥२॥ अष्टभावें कंठीं दाटेन सद्गद । सांडोनि भेदाभेद आन देवा ॥३॥ एकाजनार्दनीं यापरतें प्रेम । आन नाहीं विषम मजपाशीं ॥४॥

२७३५. तुह्मी उदार कृपाळ । मागें केले प्रतिपाळ ॥१॥ तैसें मज सांभाळावें । वदनीं वदवावें नाम तुमचें ॥२॥ आशापाश नका मोह । याचा निःसंदेह पाडावा ॥३॥ एकाजनार्दनीं विज्ञापना । परिसा दीना दासाची ॥४॥

२७३६. नेणे साधन पसारा । व्रता तपाच्या निर्धारा ॥१॥ आवडी गाऊं तुझें नाम । तेणें पुरती सर्व काम ॥२॥ आणीक न करूं चावटी । आगम निगम आटाआटी ॥३॥ न करी साधन कांहीं । एकाजनार्दनीं पाही ॥४॥

२७३७. देवा तुह्मी आहांत समर्थ । काय मागूं मी पदार्थ ॥१॥ देणें याल तरी हेंचि द्यावें । संत चरण मी वंदावे ॥२॥ दुजें मागणें सायासी । नाहीं नाहीं हृषीकेशी ॥३॥ बोलतसे तोंडभरी । ऐसें नका ह्मणूं हरी ॥४॥ अंकीत मी तुझा देवा । एकाजनार्दनीं ठेवा ५

२७३८. दास्यत्व करीन मी देवा । माझी पुरवा आस तुम्ही ॥१॥ देउनिया कृपादान । निरवावें जाण संतांसी ॥२॥ मग तें धरितां आपुले करीं । होतीं कामारी भुक्ति मुक्ति ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । तुमचें माहिमान न कळे ॥४॥

२७३९. नाम धारकाचा । दास होईन मी साचा ॥१॥ आणीक नको थोरपण । वाचे वदों त्याचे गुण ॥२॥ नामीं सदा बसों हेत । हेंचि मागणें मागत ३ हेंची द्यावें कृपादान । एकाजनार्दनीं शरण ४

२७४०. माझीया जीवीं आवडे । संत समागम रोकडे ॥१॥ हेंचि द्यावें कृपादान । कृपाळू तूं नारायण ॥२॥ एकाजनार्दनीं म्हणवी दास । त्याची पुरवावी आस ॥३॥

२७४१. तुह्मी उदार सर्व गुणें । मीं रंकपणें रंकाहूनी ॥१॥ कायावाचा आणि मन । केलें समर्पण तव चरणीं ॥२॥ आणीक नाहीं कांहीं चाड । सेवा दृढ संतांची ॥३॥ एकाजनार्दनीं तुमचा दास । आहे आस पायांची ॥४॥

२७४२. दास्य करूं हरिदासाचें । तेणें जन्माचें सार्थक ॥१॥ बुद्धि वसो तुमचे नामीं । आणिका कामीं न गुंतों ॥२॥ संसार तो पारिखा जाहला । या विठ्ठला पहातां ॥३॥ पालटला भेदाभेद । एकाजनार्दनीं आनंद ॥४॥

२७४३. हेंचि देवासी विनंती । संत सेवा दिवसराती ॥१॥ वास देईं पंढरीचा । नाम घोष कीर्तनाचा ॥२॥ सदा सर्वदा नाम मुखीं । दुजें नको कांहीं पारखी ॥३॥ एकाजनार्दनीं हरिचा दास । ह्मणतां पुरे सर्व आस ॥४॥

२७४४. देवा माझें मन लागो तुझे चरणीं । संसार व्यसनीं पडों नेदी ॥१॥ नामस्मरण घडो संत समागम । वाउगाची भ्रम नको देवा ॥२॥ पाईं तीर्थयात्रा मुखीं रामनाम । ह्याची माझा नेम सिद्धी नेईं ॥३॥ आणीक मागणें नाहीं नाहीं देवा । एकाजनार्दनीं सेवा दृढ देईं ॥४॥

२७४५. उपासना हीच बरी । वाचें हरि हरि ह्मणावें ॥१॥ काय दुसऱ्यांचें काम । वाचें नाम आठवितां ॥२॥ चातकाचा जैसा नेम । पूर्ण काम हरि करी ॥३॥ एकविध आमुचा भाव । एकाजनार्दनाचि देव ॥४॥

२७४६. पूर्वींचिया मतांतरा । सांपडला बरा आह्मां मार्ग ॥१॥ नाहीं कोठें गोवा गुंती । ऐसे गर्जती हरिदास ॥२॥ वाचे नाम करें टाळी । साधन कलीं उत्तम हें ॥३॥ धालों कीर्तनीं प्रेमानंदें । वाचें आनंदें गाऊं गीत ४ एकाजनार्दनीं धरली कास । नाहीं आस दुसरी ५

२७४७. धरपांग सांग नको माळा मुद्री । ठाव संतपदीं देईं देवा ॥१॥ प्रेम भाव देईं प्रेमभाव देईं । मागणें दुजें नाहीं आणिक तें

॥२॥ नाममुखीं सदा संतांचा सांगात । प्रेम हृदयांत विठोबाचें ३ एकाजनार्दनीं हा माझा निर्धार । जन्माची वेरझार तोडी देवा ॥४॥

२७४८. पायाचें चिंतन । माझें हेंचि भजन ॥१॥ भजनाचा मुख्यभाव । चित्तीं चिंतन लवलाहो ॥२॥ राहो माझी मती । भजनीं तें दिनराती ॥३॥ हेत दुजा मनीं । ठेवूं नका चक्रपाणी ॥४॥ मज पायां परते । नका ठेवूं जी निरुतें ॥५॥ कृपाळूजी देवा । एकाजनार्दनीं ठेवा ॥६॥

२७४९. जेथें मुख्यत्वें करावी भक्ती । घडावी संतांची संगती । हेंचि मागणें तुह्माप्रती । यावें निश्चितीं मज देवा ॥१॥ पुरवा पुरवा माझा हेत । दुजें मागणें नाहीं निश्चित ॥ध्रु०॥ आयुष्य अंतवरी नामस्मरण । गीता भागवताचें श्रवण । विष्णू शिवमूर्तीचें ध्यान । हेंचि देणें सर्वथा ॥२॥ ऐकोनी ऐसें वचन । जनार्दन तुष्टला प्रेमें करून । एकाजनार्दनीं पाय धरून । सप्रेमें आलिंगिला ॥३॥

२७५०. गुंलला प्रपंचीं सोडवी गा देवा । देईं तुझी सेवा जिवेंभावें ॥१॥ न लगे धन मात पुत्र दारा वित्त । सदा पायीं चित्त जडोनी राहो ॥२॥ वैष्णवांचा दास कामारी निःशेष । हेंचि पुरवी आस दुजें नको ॥३॥ एकाजनार्दनीं करित विनंति । मागणें श्रीपति हेंचि यावें ॥४॥

२७५१. जयजयजी देवाधीदेवा । पंढरीरावा श्रीविठ्ठला ॥१॥ भुक्ती मुक्ती नको कांहीं । लिगाड तेंही मज आतां ॥२॥ भाळी भोळी ध्यावी सेवा । हीची देवा विनवणी ॥३॥ एकाजनार्दनीं तुमचा दास । त्याची आस पाया पें ॥४॥

२७५२. माझें मन तेथें वसो । आणीक नसो दुजें कांहीं ॥१॥ होईन हरीचा वारकरी । करीन वारी पंढरीची ॥२॥ संसाराचा वीट आला । आवडला संतसंग ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । करी विनवणी येवढी ॥४॥

२७५३. हेची माझी मनींची आस । करा दास सेवेसी ॥१॥ नका कांहीं गुंतागुंती । लिगाड फजिती मज मागें ॥२॥ संसार तो फळकट । दाखवा वाट पंढरी ॥३॥ एकाजनार्दनीं विनंती । पुढती करुणा असों द्या ॥४॥

२७५४. तुमच्या सेवेचा महिमा । मज न कळे पुरुषोत्तमा ॥१॥ पूजा कारणें कवणें रीतीं । नेणें जप माळ हातीं ॥२॥ स्नानसंध्या न कळे कांहीं । मन असो तुझे पायीं ॥३॥ तुह्मां मागणें इतुकें । एकाजनार्दनीं द्यावें कौतुकें ॥४॥

२७५५. भाग्यहीन बहुअसती । कमळापती सांभाळणें ॥१॥ गर्जे ब्रीदाचा तोडर । चराचर त्रिभुवनीं ॥२॥ शरणागता वज्र पंजर । हा वडिवार त्रिजगतीं ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । कैवल्यदानी उदार ॥४॥

२७५६. शरण शरण नारायणा । आह्मां दीनां तारावें ॥१॥ मार्गे बहु शीण पोटीं । पाडा तुटी तयाची ॥२॥ संसाराचा चुकवा हेवा । मागील उगवा गुंती ते ॥३॥ तुह्मीं कृपा केल्यावरी । मी निर्धारीं पावाचि ॥४॥ शरण एकाजनार्दनीं । तुम्ही तों धनी त्रैलोक्याचे ॥५॥

२७५७. सर्वभावें शरणागत । जाहलों निश्चित कृपाळा ॥१॥ आतां कळे तैसें करी । तुह्मी उदार श्रीहरी ॥२॥ मी आलों असें शरण । कृपा करणें उचिताचि ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । रिद्धीसिद्धी तुमचे चरणीं ॥४॥

२७५८. शरण आलों तुझिया पायां । कृपानिधी देवराया ॥१॥ पशु उद्धरिलें गजासी । गणिका नेली वैकुंठासी ॥२॥ ऐसा कृपेचा कोंवळा । भक्तां आधीन गोपाळा ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । हीच लाधली निजखूण ॥४॥

२७५९. अहो देवा गुणनिधाना । परिसा विज्ञापना एक माझी ॥१॥ माझें मज आश्वासन । देखिल्या चरण तुमचे ॥२॥ हेचि माझी करुणा करा । भक्ति अवधारा भोळी ते ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । माझी विनवणी परिसावी ॥४॥

२७६०. तुझीया कृपेचें पोसणें मी दीन । करीं तूं जतन जनार्दना ॥१॥ अंकित मी दास कायामनेंवाचा । हेलावा कृपेचा करीं देवा ॥२॥ कदा नुपेक्षिसी आलिया । शरण हें मागोनी महिमान चालत आलें ॥३॥ एकाजनार्दनीं कृपेचा वोरस । करी जगदीश मजवरी ॥४॥

२७६१. मज तो अधिकार नाहीं । शरण आलों तुझे पायीं १ तुह्मीं पशु गजातें उद्धरिलें । गणिके तारिलें कुंटनीसी ॥२॥ ऐशी शरणागता माउली । एकाजनार्दनाची साउली ॥३॥

२७६२. माझे मनोरथ चरणाची आवडी । दुजियाची जोडी नको आतां ॥१॥ वाउगा पसारा नका गोऊं मन । चरणापाशीं जाण स्थिर होय ॥२॥ एकाजनार्दनीं पुरवीं वासना । दुजें नारायणा नको कांहीं ॥३॥

२७६३. भक्ति माझी भोळी । भाव एकविध बळी ॥१॥ अहो परिसा नारायणा । जाणोनी अंतरींच्या खुणा ॥२॥ नाहीं तुह्मा सांकडें कायी । भुक्तिमुक्ती तेंही मागणें ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । माझी विनवणी परिसावी ॥४॥

२७६४. सर्वांभूतीं तुझें रूप । हृदयीं रिद्धची स्वरूप ॥१॥ इतुलें देई अधोक्षजा । नाहीं तरी पोट भरीन तुझा ॥२॥ सकळांहुनी करी सान । सकळिकीं समसमान ॥३॥ सदा द्यावा संतसंग । अखंड कीर्तनीं अनुराग ॥४॥ निःशेष दवडोनीया स्वार्थ । अवघा करी परमार्थ ॥५॥ एकाजनार्दनीं मागें । नाहीं तरी घाला घालीन अंगें ॥६॥

२७६५. तुमचें जाहलिया दरुशन । जन्ममरण फिटला पांग ॥१॥ आतां धन्य जाहलो करुणाकरा । विश्वंभरा दयाळुवा ॥२॥ मागें कासाविस बहु जाहलों । दरुशनें पावलों सुखातें ॥३॥ एकाजनार्दनीं कृपा केली । फळासी आली सर्वस्वें ॥४॥

२७६६. आह्मीं तो वासना भाजियेली बळें । वैराग्याचेनि बळें आथियेलें ॥१॥ सांडिला वेव्हार माया लोकाचार । भरला निर्धार हृदयामाजी ॥२॥ एकाजनार्दनीं खुंटली वावना । जनीं जनार्दना अभ्यासिलें ॥३॥

२७६७. माझे देई मजलागून । ह्मणोनी दृढ धरिले चरण १ भक्तीचें ऋण देवा । देई माझें मज केशवा ॥२॥ माझें देतां जड काई । अभिलाष धरीन पायीं ॥३॥ ऐशा अभिलाषें फावला । एकाजनार्दनीं उभा केला ॥४॥

२७६८. जाईल तरी जावो प्राण । परी मी न सोडीं चरण ॥१॥ ऐसा विश्वासलों हरी । नाम तुमचें कंठीं धरीं ॥२॥ होईल तें होवो साचा । परी न संडों नाम वाचा ॥३॥ चित्त वेधलें चिंतनीं । शरण एकाजनार्दनीं ॥४॥

२७६९. ऐकें गा हृषीकेशी । जाणोनी तूं विश्वासी । निजगुह्य तुजपाशीं । ठेवणें दिधलें ॥१॥ आज्ञा चाळवोनी विपयासी । थितें बुडवूं पाहासी । क्रियानष्ट होसी । तूंचि येक ॥२॥ आमुचें आम्हा देतां । तुज कां नये चिंता । लाजरी तत्त्वतां । भाक्ति घेसी ॥३॥ नेतां पंचापाशीं । भलें नव्हे हृषीकेशी । मजसी समान होसी । एकाजनार्दनीं ॥४॥

२७७०. वेव्हाराच्या ठाईं । तुझें न चले कांहीं । मी तूं दोघे पाहीं । सरिसे तेथें ॥१॥ ठेविलें बुडविसी । शेखीं जावही न देसी । ऐकोन नायकसी । गर्हिसपणें ॥२॥ खवळलों तरी जाण । गिळीन मीतूंपण । तेथें देवपण । उडविन तुझें ॥३॥ जो सांगे पांचांपाशीं । त्याचें तोंड तूं धरिसी । ठकडा कैसा होसी । म्हणे एकाजनार्दनीं ॥४॥

२७७१. जिहीं जाणितलें वर्मासी । त्याचें दास्य करसी । गर्भवास सोशिसी । त्यांचेसाठीं ॥१॥ घर कुटुंब ना अभावो । गांव ना तुज ठाव । रोलाद तूं पाहा हो । लागला जगीं ॥२॥ बहुतांचें ठेवणें । बुडविलें येणें । शेखीं जीव घेणें । मागत्यासी ॥३॥ मायबापेंविण । वाढला हा जाण । शरण एकाजनार्दन । जाती गोतपणें ॥४॥

२७७२. होतां द्वारपाल लाज वाटे थोरी । न साहे भिकारी जाला हरी ॥१॥ बळीच्या तो द्वारीं सारथी पार्थाचा । गोसावी आमुचा वेदवाणी ॥२॥ गर्भ न साहाती यातायाती जना । एकाजनार्दना शरण वेगें ॥३॥

२७७३. सर्वस्व हरुनी ह्मणसी बळीसी । म्यां बांधिलें विचारिसी कोण कोण ॥१॥ द्वारीं द्वारपाळ झालासी अंकीत । सांग बुद्धिमंत ऐसा कोण ॥२॥ ऐसें नाथिलेंशी आपणा गोंवीसी । एकाजनार्दनीं बोल आह्मां कां ठेविसी ॥३॥

२७७४. बळी अर्पितां देहासी । द्वारपाळ होशी तयाचा ॥१॥ सांगा थोरपण आहे कोण । घेतिल्यावांचून न देशी तूं ॥२॥ धर्म आधीं पूजा करी । ह्मणोनी घरीं राबती तूं ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसा उदार । घेतां निर्धार देशी तूं ॥४॥

२७७५. न लगे भुक्तिमुक्ति न लगे स्वर्गवास । नको वैकुंठवास देवराया ॥१॥ न लगे योगयाग अष्टांग साधन । न चुके बंधन येणें कांहीं ॥२॥ न लगे इष्टमित्र सोईरे संबंधी । नको ही उपाधि पाठी लाऊं ॥३॥ एकाजनार्दनीं चुकवोनी पाल्हाळ । करीं मज मोकळ गुरुराया ॥४॥

२६७६. जय गोविंदा परमानंदा ऐक माझे बोल । निर्गुणरूपें असतां तुझें कांहींच नव्हे मोल । मग तूं माया धरूनी अती जाहलासी सबळ । नसतें देवपण अंगीं आणुनी चाळविसी केवळ ॥१॥ ऐसा लाघवी तूं रामा । नको चाळवूं आह्मां ॥ध्रु०॥ नसतां तुज मज भेद देवा लटिकें जीवपण देसी । आपुले ठायीं थोरपण आणुनी आमुची सेवा घेसी । नसती अविद्या पाठीं लावुनी संसारीं गोविसी । नाना कर्में केलीं ह्मणोनी आह्मां कां दंडिसी ॥२॥ मातें भावें भजिजे ऐसा उपदेश करिसी । आपुल्या भक्तां तारिन ह्मणोनी प्रताप बोलसी । निंदक दुर्जन अभक्त त्यातें नरकीं तूं घालिसी । आपुल्या स्वार्थालागुनी दुसरीयातें कां पीडिसी ॥३॥ आपुली महिमा वाढो ह्मणोनी आह्मां भक्त केलें । लक्ष चौऱ्यांयशीं योनी देउनी संसारीं गोविलें । भावें तूंतें न भजों ह्मणोनी आकस आरंभिलें । तुज मज वैर देवा ऐसें करितां नव्हे भलें ॥४॥ ऐसें तुज मज वैर ह्मणोनी गुरूसी शरण गेलों । देवभक्तपण कोण्या कर्में मग पुसों लागलों । सद्गुरु ह्मणती सर्वही मायिक निश्चयें बोलिलों । देव आणि भक्त एकाचि गोष्टीसी पावलों ॥५॥ मग गुरुकृपें करून तुझें गिळीन देवपण । तुझिया नेणों भक्तीवरी घालिन पाषाण । जीव शिव दोन्ही मिळोनी मग मी सुखें राहीन । तुज मज रूप ना रेखा त्यातें निर्धारीन ॥६॥ ऐसे भक्त बोल ऐकुनी देवा थोर उपजली चिंता । विवे-

कवळें करूनि माझें देवपण उडविलें आतां । यालागीं भिणें भक्तजनासी ऐक्य करुनी तत्त्वतां । एकाजनार्दनीं दरुशन द्यावें लागेल त्वरितां ७

२७७७. संसारकूपीं हरी पडियलों श्रीहरी लाहुनी पैं शरीर । एक पिसें लागे कांहींएक न करवे पंचभूतीक विकार । सुष्टदुष्ट कर्में करितां हे शिणले मळमूत्र दोष जर्जर । ऐसिया जीवातें उद्धरसी ह्मणोनी ब्रीद साजे रघुवीर ॥१॥ यालागीं रामचंद्रा रामचंद्रा । हृदयीं धरली नाममुद्रा ॥ध्रु०॥ आशा तृष्णा दोन्ही सेहाळ नागिणी कामक्रोध हे विखार । त्यांचिया संगती विषयवृद्धी जाली लहरी दुःख दरिद्र । इंगळाचे शेजे अंथुरितां वरी तिडकीया आरुवार । ऐसा हा संसार जाणोनी दुस्तर ठाकियेलें तुझें द्वार ॥२॥ कोळीकें रूप कपटीं धरियलें तें त्वां साचार केलें । साभिमान्या देव गुरुचक्रवर्ती त्रिभुवनीं यश थोरलें । पांखीरु वाचिया लोभाकारणें गणिकेसी कैवल्या दिधलें । दंभ प्रपंच वोळंगतां जीव तया तूं सायुज्य देसी आपुलें ॥३॥ श्रीवत्स ब्राह्मणें हालासी पापरा आतां तूंतें पद मिरविरी दातारा । चरण स्पर्शें त्वां आहिल्या उद्धरली विस्मयो थोर सुरनरां । जे गती देवकिये तैसीच पुतने विश्राम एक वोवरा । तुझें मुद्रांकित न भीयें कळिकाळा तूं स्वामी सारंगधरा ॥४॥ वनीं सिंहाचें भय दाखविलें अजातें बैसविली गजस्कंधीं । परमपुरुषा तुझें नाम उच्चारितां वोळंगताती रिद्धीसिद्धी । उपमन्या आरतें क्षीरसिंधु दिधला येवढी प्रसन्नबुद्धी । न गणितां रावणु शरणागतु केला लंका निरोपीली आधीं ॥५॥ नरसुर किन्नर पन्नगयक्ष त्रासियले संसारें । जाणोनी शुकदेव गर्भीं स्थिरावला भयाभीत बोले उत्तरें । जननीयेच्या कष्टा निष्कृती व्हावया उपदेश केला दातारें । जीवन्मुक्त शुक मुनी जना वरिष्ठ जपतांची ध्यानीं दोन अक्षरें ॥६॥ ऐसा सहस्रमुखें वर्णितां नातुडसी गा देवा धांडोळितां सिद्ध पंथ । जगद्वंधु दीनानाथ समुद्धरण द्रौपदीचा वेळाईत । सुदामियाच्या दो पोह्याकारणें स्नेहें पसरिसी हात । एकाजनार्दनीं जवळीं बोलाउनी उच्छिष्ट प्रसाद देत ॥७॥

---

## भक्ति.

२७७८. भक्ताचिया काजा । उभा पंढरीचा राजा ॥१॥ घेऊनियां परिवार । उभा तिष्ठे निरंतर ॥२॥ शोभे गोपाळाची मांदी । रुक्मिणी सत्यभामा आदी ॥३॥ शोभे पुढें भीवरा नीर । भक्त करती जयजयकार ॥४॥ एकाजनार्दनीं ध्यान । चिमणें रूप गोजिरें ठाण ५

२७७९. पायांवरी ठेवितां भाळ । गेली तळमळ सकळही ॥१॥ बैसलें रूप डोळां आधीं । गेली उपाधी सकळ ॥२॥ एकाजनार्दनीं मंगळ जाला । अवघा भरला हृदयीं ॥३॥

२७८०. गोजिरें ठाण विठोबाचें । आवडी साचें बैसली ॥१॥ आणखी न धांवे कोठें मन । समचरण पाहतांचि ॥२॥ नाहीं आन दुजी वासना । आवडी चरणा बैसलीसे ॥३॥ एकाजनार्दनीं मन । सांडीन कुर्वंडी करून ॥४॥

२७८१. आलिंगनालागीं उतावेळ मन । देखेन चरण विठोबाचे ॥१॥ मना समाधान मना समाधान । मना समाधान राहे मना२ देखिलिया मूर्ति सांवळी सगुण । मग नाहीं बंधन मना तुज ॥३॥ एकाजनार्दनीं मन आवरिलें । दृढ तें ठेविलें विठ्ठलपायीं ॥४॥

२७८२. पायीं जडलें माझें मन । चित्त जालें समाधान ॥१॥ तुमच्या नामाचा महिमा । आजी पावन केलें आह्मा ॥२॥ कृपा केली तुह्मीं । लावियेलें आपुले नामीं ॥३॥ एकाजनार्दनीं पूर्ण कृपा । तेणें मार्ग जाला सोपा ॥४॥

२७८३. कुर्वंडीन काया मन । समचरण देखोनियां ॥१॥ ऐसा वेधी वेधक कान्हा । विठु मना बैसलासे ॥२॥ नावडे कांहीं दुजें चित्तीं । श्रीविठ्ठलमूर्ति पाहतांचि ॥३॥ एकजनार्दनीं ध्यान । सुकुमार गोजिरें ठाण ॥४॥

२७८४. वेधोनी नेलें आमुचें मन । लागलें ध्यान अंतरीं ॥१॥ दृष्टी धांवे पहावया । आलिंगना बाह्या उतावेळ ॥२॥ चरण उतावेळ चालतां पंथ । दुजा हेत नाहीं मनासी ॥३॥ एकाजनार्दनीं डोई पायीं । दुजा भाव नाहीं इंद्रियां ॥४॥

२७८५. येणें पांडुरंगें लावियेला चाळा । बैसलासे डोळां निव-

डेना ॥१॥ मनाचिये मनें घातिलेंसे ठाण । नोहे उत्थापन कोणीकडे ॥२॥ वेधकु वेधकु पंढरीचा राणा । एकाजनार्दना शरण होय ॥३॥

२७८६. देवासी कांहीं नेसणें नसे । जेथें तेथें देव उघडाची दिसे ॥१॥ देव निलाजरा देव निलाजरा । देव निलाजरा पहा तुम्ही ॥२॥ न लाजे जेथें नाहीं गांव । पांढरा डुकर झाला देव ॥३॥ एकाजनार्दनीं एकल्या काज । भक्ति तेणेंची नेली लाज ॥४॥

२७८७. हरीचें पहातां श्रीमुख । सुखावलें मन नित्य नवा हर्ष ॥१॥ परमप्रिय वो श्रीहरी । ध्याता ध्यान ध्येय सर्व हरी ॥२॥ एकाजनार्दनीं पहातां हरी । हरीरूप दिसे चराचरीं ॥३॥

२७८८. राजीवाक्ष प्रभु रुक्मिणीरमण । मनोहर ध्यान श्रीकृष्णाचें ॥१॥ शंखचक्रगदा पीतांबरधारी । नमिला कंसारी प्रेमभावें ॥२॥ मोक्ष अधिष्ठान पुण्य कीर्ति स्थान । पतितपावन पांडुरंग ३ एकाजनार्दनीं देवाधिदेव । चित्तीं वासुदेव राहो सदा ॥४॥

२७८९. आनंद अद्वय नित्य निरामय । सांवळा भासताहे मजलागीं ॥१॥ वेधु तयाचा माझिया जीवा । काया वाचा मनोभावा लागलारे ॥२॥ वेधलेंरे मन झालें उन्मन । देखतां चरण गोडवाटे ॥३॥ पहातां पहातां पारुषला जीव । एकाजनार्दनीं देव कळों आला ॥४॥

२७९०. अष्ट धातु वेगळा देखिला पुतळा । जिवींचा जिव्हाळा श्रीविठ्ठल ॥१॥ तयाचे चरणीं माझा दंडवत । घडो आणि चित्त जडो नामीं ॥२॥ एकाजनार्दनीं देखिला डोळां । जीवीं जीवनकळा विठ्ठल देवो ॥३॥

२७९१. सर्वसुखाची उघडली खाणी । श्रीमुख नयनीं पहातां ॥१॥ मोक्षसुख आम्हां न लगे गा देवा । विश्रांतीसी ठेवा आणिकासी ॥२॥ धनसुख मज कासया हें पोटीं । पाहिजे लंगोटी सर्वभावें ॥३॥ स्त्रीसुख संसार कासया वेरझार । नको हा पसर मज देवा ॥४॥ एकाजनार्दनीं नाशिवंत सुख । पहातां तुझें मुख इच्छा पुरती ॥५॥

२७९२. नाम घेतां रूप आठवलें सांवळें । ही खूण गोपाळें दिली मज ॥१॥ येणें जन्में कृष्ण दाटोनी टाकणें । आडवस्ती येणें चुकविली ॥ २ ॥ चुकविली वस्ती एकाजनार्दनें । संसार सांडणें सांडोनियां ३

२७९३. तुमचें नामसंकीर्तन । हेंचि माझें संध्यास्नान ॥१॥ तुमच्या पायाचें वंदन । हेंचि माझें अनुष्ठान ॥२॥ तुमच्या पायाचा साक्षेप । हाचि माझा कालक्षेप ॥३॥ तुमच्या प्रेमें आली निद्रा । हीच माझी ध्यान मुद्रा ॥४॥ एकाजनार्दनीं सार । ब्रह्मरूप हा संसार ॥५॥

२७९४. भुक्तिमुक्तिस कारण । हरीचे जन्मकर्म गुण ॥१॥ हरि-कीर्तनाची जोडी । सकळ साधनें होती बापुडीं ॥२॥ शिळा तारिल्या सागरीं । गोवर्धन उचलिला करीं ॥३॥ निमाला गुरुपुत्र आणिला । मुखें दावाग्नि प्राशिला ॥४॥ तो सांवळा श्रीहरी । एका-जनार्दनीं चरण धरीं ॥५॥

२७९५. पतितपावन नाम श्रीविठ्ठलाचें । आणीक मी साचें नेणें कांहीं ॥१॥ पतितपावन नाम वदें वाणी । विठ्ठलावांचुनी कांहीं नेणें ॥२॥ पतीतपावन नामें तारिली गणिका । अजामेळ देखा सरता केला ॥३॥ पतीतपावन नाम जनीं वनीं । एका-जनार्दनीं नाम वाचे ॥४॥

२७९६. आम्हासी तो पुरे विठ्ठलची एक । वाउगाची देख दुजा न मनीं ॥१॥ ध्यान धरूं विठ्ठल करूं तयाचें कीर्तन । आणिक चिंतन नाहीं दुजें ॥२॥ ध्येय ध्याता ध्यान खुंटला पैं शब्द । विठ्ठल उद्बोध सुख आम्हां ॥३॥ एकाजनार्दनीं विठ्ठल भरला । रिता ठाव उरला कोठें सांगा ॥४॥

२७९७. भीवरेचे तीरीं उभा । धन्य शोभा विठ्ठल ॥१॥ विटेवरी समचरण । तेथें मन गुंतलें ॥२॥ संत जाती तया ठाया । मजही गांवा त्या न्यावें ॥३॥ उपकार करा साचा । दाखवा दीनाचा सोयरा ॥४॥ एकाजनार्दनीं बापमाय । वंदूं पाय तयाचे ॥५॥

२७९८. धवधवीत वैकुंठनाथ । भक्तवत्सल शोभत ॥१॥ तयाचे पायीं माझें मन । राहो वृत्तिसह जडोन ॥२॥ नेणें आणीक दुजा छंद । वाचे आठवीन गोविंद ॥३॥ एकाजनार्दनीं कटीं कर । उभा चंद्रभागे तीर ॥४॥

२७९९. सायासाचा श्रम न करूं पसारा । विठ्ठलची बरा वाचे

गातां ॥१॥ गोडपणें मिठी पडलीसे जीवा । वायामनें देवा दुजा नाहीं ॥२॥ या विठ्ठलापरतें न करीं साधन । देखेन समचरण विटेवरी ॥३॥ एकाजनार्दनीं विठ्ठलाची भेटी । सरलीसे तुटी गर्भवास ४

२८००. मागें एक पुढें एक । दोनी मिळोनि विठ्ठल देख ॥१॥ ऐसी होतांची मिळणी । दिलें संसारासी पाणी ॥२॥ एक एक पहातां दिठी । होय विठ्ठलेंसी भेटी ॥३॥ एक सांडूनि दुजा नाहीं । एकाजनार्दनीं ध्याई ॥४॥

२८०१. आम्हा नादीं विठ्ठलु छंदीं विठ्ठलु । हृत्पदीं विठ्ठलु मिळतसे ॥१॥ आह्मा धातु विठ्ठलु मातु विठ्ठलु । गातु विठ्ठलु आनंदें ॥२॥ आह्मां राग विठ्ठलु रंग विठ्ठलु । संग विठ्ठलु वैष्णवांचा ॥३॥ आह्मा ताल विठ्ठलु मेळ विठ्ठलु । कल्लोळ विठ्ठलु कीर्तनें ॥४॥ आह्मा श्रुति विठ्ठलु श्रोता विठ्ठलु । वक्ता विठ्ठलु वदनीं ॥५॥ आह्मा मनीं विठ्ठलु ध्यानीं विठ्ठलु । एकाजनार्दनीं अवघा विठ्ठलु ॥६॥

२८०२. ध्येय ध्याता ध्यान विठ्ठल संपूर्ण । ज्ञेय ज्ञाता पूर्ण विठ्ठल माझा ॥१॥ योगयाग तप विठ्ठलनामजप । पुण्य आणि पाप विठ्ठल बोला ॥२॥ उन्मनी समाधी विठ्ठल बोला वाणी । तारील निर्वाणीं विठ्ठल माझा ॥३॥ मज भरंवसा कायामनेंवाचा । एकाजनार्दनीं त्याचा शरणागत ॥४॥

२८०३. एक विठ्ठल वदतां वाचे । आणिक साचें नावडती १ बैसलासे ध्यानीं मनीं । विठ्ठलावांचुनी दुजें नेणें ॥२॥ जावें तिकडे विठ्ठल भरला । रिता ठाव नाहीं उरला ॥३॥ एकाजनार्दनीं भावें । विठ्ठल ह्मणतां पाठीं धांवे ॥४॥

२८०४. गातों एका ध्यातों एका । अंतर नाहीं पहातों एका ॥१॥ अगुणीं एका सगुणीं एका । गुणातीत पाहातों एका ॥२॥ जनीं एका वनीं एका । निरंजनीं देखों एका ॥३॥ संत जना पढिये एका । जनार्दना कडीये एका ॥४॥

२८०५. वाद विवाद अतिवाद । नावडे कोणाचाही समंध ॥१॥ बोल एक आह्मां बोलणें । वाचे विठ्ठलुची म्हणें ॥२॥ आणिकाची चाड चित्तीं । नाहीं नाहीं गा त्रिजगतीं ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । विठ्ठल भरलासे व्यापुनी ॥४॥

२८०६. एक विठ्ठल चिंतन । आणिक दुजें नेघे मन । ऐसें घडतां साधन । जोडे सर्व तयासी ॥१॥ हेचि एकविधा भक्ति । येणें जोडे सर्व मुक्ती । पर्वकाळ विश्रांती । तेथें घेती सर्वदा ॥२॥ तीर्थे वोढवती माथा । वंदिताती सर्वथा । तपांच्या चळथा । घडताती आपेआप ॥३॥ घडतें यज्ञाचें पुण्य । आणिक तया नाहीं बंधन । शरण एकाजनार्दन । निश्चय ऐसा जयाचा ॥४॥

२८०७. देव विठ्ठल तीर्थ विठ्ठल । अवघा विठ्ठल भरलासे ॥१॥ जन विठ्ठल वन विठ्ठल । जळीं स्थळीं विठ्ठल भरलासे ॥२॥ भाव विठ्ठल देव विठ्ठल । अवघा विठ्ठल भरलासे ॥३॥ एकाजनार्दनीं मनीं विठ्ठल । जप तप ध्यान विठ्ठल ॥४॥

२८०८. एकपणें पाहतां सृष्टी । भरला दृष्टीं विठ्ठल ॥१॥ नाहीं द्वैताची भावना । बैसला ध्याना विठ्ठल ॥२॥ मीतूंपणा वोस ठाव । बैसला सर्व विठ्ठल ॥३॥ ध्यानीं विठ्ठल मनीं विठ्ठल । एकाजनार्दनीं अवघा विठ्ठल ॥४॥

२८०९. रिता ठाव न दिसे पाहतां । भरला पुरता विठ्ठल ॥१॥ जनीं वनीं विजनीं देखा । विठ्ठल सखा भरलासे ॥२॥ पहातां पाहणें परतलें । विठ्ठलें व्यापिलें सर्वत्र ॥३॥ नाहीं पाहण्यासी ठाव । अवघा भाव विठ्ठल ॥४॥ एकाजनार्दनीं व्यापक । विठ्ठल देख त्रिभुवनीं ॥५॥

२८१०. मागें पुढें विठ्ठल भरला । रिता ठाव नाहीं उरला ॥१॥ जिकडे पहावें तिकडे आहे । दिशादुम भरला पाहे ॥२॥ एकाजनार्दनीं सर्व देशीं । विठ्ठल व्यापक निश्चयेंशीं ॥३॥

२८११. विठ्ठलावांचुनी आणिकाचें ध्यान । नाहीं आम्हां चिंतन दुजियाचें ॥१॥ आमुचे कुळींचें विठ्ठलदैवत । कुळधर्म समस्त विठ्ठल देव ॥२॥ विठ्ठलावांचूनि नेणों क्रियाकर्म । विठ्ठलावांचुनी धर्म दुजा नाहीं॥३॥एकाजनार्दनीं विठ्ठल भरला। भरुनी उरला पंढरीयें॥४॥

२८१२. उच्चार फुकाचा नाम हें विठ्ठल । नाहीं कांहीं मोल द्रव्य वेंचे ॥१॥ जाग्रतीं सुषुप्तिं स्वप्नीं विठ्ठलनाम ध्यानीं । गाऊं तें कीर्तनीं दिननिशीं ॥२॥ एकाजनार्दनीं केला लागपाठ । तेणें सोपी वाट वैकुंठींची ॥३॥

२८१३. रूप तेंचि नाम नाम तेंचि रूप । अवघा संकल्प एकरूप ॥१॥ पहातां पहाणें हरपलें देहीं । देहींच विदेही होउनी ठेलों ॥२॥ सांगतां नवल पाहतां सखोल । बोलतां अबोल चोज वाटे ३ एकाजनार्दनीं बोलण्या वेगळा । उभा तो सांवळा विटेवरी ॥४॥

२८१४. पाहतां पाहतां भुललें मन । धरिले चरण हृदयीं॥१॥ येथें वेधिला जीव प्राण । ब्रह्मज्ञान नावडे ॥२॥ तीर्थांचें जें अधिष्ठान । पुण्यपावन चंद्रभागा ॥३॥ सकळ देवांचा देव उभा । एकाजनार्दनीं गाभा लावण्याचा ॥४॥

२८१५. वाचे विठ्ठल बोलावें । मग पाऊल टाकावें ॥१॥ ऐसा ज्याचा नेमधर्म । मुखीं विठ्ठलाचें नाम ॥२॥ सर्वकाळ वाचे । विठ्ठलनाम वसी साचे ॥३॥ कुळधर्म आमुचा । ह्मणे एकाजनार्दनाचा ४

२८१६. माझ्या मना लागो छंद । नित्य गोविंद गोविंद १ तेणें देह ब्रह्मरूप । निरसेल नामरूप ॥२॥ तुटेल सकळ उपाधि । निरसेल आधिव्याधी ३ गोविंद हा जनीं वनीं । ह्मणे एकाजनार्दनीं ४

२८१७. शब्दा आदि मध्य अंतीं । उच्चारितां व्यक्ताव्यक्तीं ॥१॥ विठ्ठल विठ्ठल जिव्हारीं । मुक्ति होईल कामारी ॥२॥ विश्वीं विठ्ठल उघडा पाहे । मुक्त होतां वेळ काय ॥३॥ एकाजनार्दनीं ठसा । विठ्ठल उभा नामासरिसा ॥४॥

२८१८. तंतुपट जेवीं एकत्व दिसती । तैसी भगवद्भक्ति सर्वाभूतीं ॥१॥ सर्वत्रीं व्यापक विठ्ठल विसांवा । ह्मणोनी त्याच्या गांवा मन धांवे ॥२॥ एकाजनार्दनीं व्यापक विठ्ठल । तेथें नाहीं बोल आन दुजा ॥३॥

२८१९. लाडिके विठोबाचे आम्हीं । गाऊं नित्यनेमीं नाम तुझें ॥१॥ उत्तम उत्तम साधन हें नाम । गातां गीतीं प्रेम वाटे जीवीं ॥२॥ न कळेचि वेदां उपनिषद्बोधा । त्या हरि गोविंदा जपों आह्मीं ॥३॥एकाजनार्दनीं मंगळामंगळ । न लगे आह्मा मोल उच्चारितां ४

२८२०. बहुत प्रकारें भक्तहि असती । देवहि भेटती तयां तैसे ॥१॥ तैसा नोहे माझा पंढरीचा राव । देवाधिदेव मुकुटमणी ॥२॥ एकविध तया शरण पैं जातां । मोक्ष सायुज्यता पाठीं लागे ॥३॥

न लगे धरणें पारणें करणें । उपवासी राहणें दंडमुंड ॥४॥ सुखेंचि जाउनी पायीं घाला मिठी । एकाजनार्दनीं भेटी लाभ मग ॥५॥

२८२१. गाऊं तरी एक विठ्ठलचि गाऊं । ध्याऊं तरी एक विठ्ठलचि ध्याऊं ॥१॥ पाहूं तरी एक विठ्ठलचि पाहूं । आणिका न गोऊं वासनाही ॥२॥ आठवूं तो एक विठ्ठल आठवूं । आणिक न सांठवूं हृदयामाजी ॥३॥ विठ्ठलावांचुनी मनीं नाहीं आन । सर्वभावें प्रमाण विठ्ठल मज ॥४॥ एकाजनार्दनीं जडला जिव्हारीं । विठ्ठल चराचरीं व्यापूनि ठेला ॥५॥

२८२२. सुखें सुख सोज्वळ पाहतां दृष्टीं । आनंदीं आनंदमय तेणें सृष्टी ॥१॥ देखिला देखिला वैष्णवांचा रावो । देवाधिदेवो श्रीविठ्ठल ॥२॥ गोपाळ गजरीं नाचती आनंदें । लीला विनोदें प्रेमरसें ॥३॥ भावाचा अंकित उगा राहे उभा । धन्य त्याची शोभा काय वानूं ॥४॥ पाहतां पाहतां मन धालें सृष्टी । जनार्दनाचा एका परमानंदें पोटीं ॥५॥

२८२३. परिपूर्णपणें उभा । दिसे कर्दळीचा गाभा । अंगींचिया प्रभा । धवळलें विश्व ॥१॥ धन्य धन्य पांडुरंग । आह्मां जोडला वोसंग । कीर्ति गातां निसंग । अनुवाद तयाचा ॥२॥ तें सुख सांगतां कोडी । पापें पळती बापुडीं । यमधर्म हात जोडी । नयेचि तया गांवा ॥३॥ ऐसें एकविधभावाचे । संतचरण वंदितीं-साचे । एकाजनार्दनीं त्यांचें । दर्शन दुर्लभ ॥४॥

२८२४. आजी दिवाळी दसरा । श्रीसाधुसंत आले घरा ॥१॥ पायीं घालूं मिठी । आनंदें नाचूं वाळुवंटीं ॥२॥ पाहूं हरीचें ध्यान । तेणें मना समाधान ३ एकाजनार्दनीं भाव । विटे उभा विठ्ठलराव ४

२८२५. जगाचें जीवन मनाचें मोहन । योगियांचें ध्यान विठ्ठल माझा ॥१॥ द्वैताद्वैताहूनि वेगळा । श्रीविठ्ठल कळा पौर्णिमेच्या ॥२॥ न कळे आगमां नेणवेचि दुर्गमा । एकाजनार्दनीं आह्मां सांपडला ३

२८२६. सद्गदीत कंठ बाष्प पैं दाटत । जया भेटीलागीं हृदय फुटत ॥१॥ तो देखिलावो तो देखिला । सबाह्य अभ्यंतरीं व्यापुनियां राहिला ॥२॥ सबराभरीत भरुनी पंढरीये उभा । सभोंवतीं

दाटी संतांची शोभा ॥३॥ ऐसा लावण्य पुतळा देखिला दृष्टी । एका जनार्दनीं सुख न समाय सृष्टीं ॥४॥

२८२७. मन माझें वेधलें मन माझें वेधलें । पहातां भलें सच्चिदानंद ॥१॥ आनंदीआनंद मनासी पैं झाला । देखिला सांवळा पांडुरंग ॥२॥ एकाजनार्दनीं उघडाचि देखिला । आनंद तो झाला मनीं माझ्या ॥३॥

२८२८. कमलदलाक्ष गोपी जीवनलक्ष । तो अलक्षा न बैसे लक्ष तो देखिलावो ॥१॥ मनमृग आमुचा वेधोनी गेला । पाहतांचि डोळा श्रीकृष्ण ॥२॥ सहजची आवडी पाहतां समदृष्टी । वेधोनी गेली सृष्टी पाहतां गे माय ॥३॥ एकाजनार्दनीं परात्पर शोभला । तेणें मज वेधें वेध लाविला गे माय ॥४॥

२८२९. सलीलकमलदलाक्ष राजीवलोचनु । परे परता पहातां निवे आमुचें मनु ॥१॥ कान्हया परम गोजरीया । कान्हया परम गोजरीया ॥ध्रु०॥ तनुगन वेधलें चित्त विगुंतलें । पाहतां पाहतां मना समाधान जालें ॥२॥ ऐसा कमल गर्भीचा कंदु उभा परमानंदु । एकाजनार्दनीं वेधु मजलागे माय ॥३॥

२८३०. आजी दिवाळी दसरा । आलों विठ्ठलाचे द्वारा ॥१॥ पाहुनियां देव तीर्थ । आनंदें आनंद लोटत ॥२॥ नाठवे कांहीं आन दुजें । विठ्ठलावांचुनी मनीं माझे ॥३॥ आशा केली तें पावलों । एकाजनार्दनीं धन्य जालों ॥४॥

२८३१. निळा पंढरपुरचा लावण्य पुतळा । देखिलासे डोळां विठ्ठल देव ॥१॥ जीव वेधला वो जीव वेधला वो । पाहतां पाहतां जीव वेधला वो ॥२॥ एकाजनार्दनीं पाहतांचि देव । वेधिला जीव परतेना गाव ॥३॥

२८३२. इंद्रियें कुंठीत जाली । विठु माउली पहातां ॥१॥ वेधलें मन दुजें नेणें । विसरलें पेणें ताहानभूक ॥२॥ मदमत्सर समूळ गेला । ऐसा लागला वेध त्याचा ॥३॥ काम क्रोध पळाले दुरी । आशा तृष्णा झडकरी लपाल्या ॥४॥ मन मनाधीन जालें । एकाजनार्दनीं रूप देखिलें ॥५॥

२८३३. दृष्टीं पाहतां विठोबासी । आनंद होय सुखराशी ॥१॥

ऐसा अनुभव मना । पाहें पाहें पंढरी राणा ॥२॥ एका दरुशनें मुक्ती । देतो रखुमाईचा पती ॥३॥ एकाजनार्दनीं नमन । गोजिरें विटे समचरण ॥४॥

२८३४. भेदबुद्धि पालटली । कृपा या विठ्ठलीं केली मज ॥१॥ प्रकाश जाहला देहादेहीं । वासना प्रवाहीं वहावली ॥२॥ विषयांचें तें लिगाड । जाहलें देशोधड आपोआप ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । कायावाचा आणि मन ॥४॥

२८३५. विसर तो अवघा जाहला । या विठ्ठला पाहतां ॥१॥ निवारला क्रोधकाम । जाहला तम शांत तो ॥२॥ इंद्रियांची होती चाली । निवांत राहिली एकरूप ॥३॥ दुजेपणाचा भेद गेला । एका ठेला जनार्दनीं ॥४॥

२८३६. सर्व सिद्धी मनोरथ । पंढरीनाथ पहातां ॥१॥ दैन्य दारिद्र्य तें गेलें । सुंदर पाउलें पहातां ॥२॥ विषयांतें पळ सुटला । सुंदर सावळा पाहतां ॥३॥ काम क्रोध विलया गेले । श्रीमुख चांगलें न्याहालितां ॥४॥ एकाजनार्दनीं बरें जाहलें । सुंदर देखिले समचरण ॥५॥

२८३७. देखणा जाहलों देखणा जाहलों । देखणा जाहलों विठ्ठला ॥१॥ जन्ममरण निरसलें । पहाता पाहणें हारपलें ॥२॥ तुटली आशापाश बेडी । हेचि जोडी जोडली ॥३॥ एकाजनार्दनीं देव । धरिला ठाव न सोडीं ॥४॥

२८३८. जन्ममरणाचें तुटलें सांकडें । कैवल्य रोकडें उभें असे ॥१॥ डोळियाचा डोळा उघड दाविला । संदेह फिटला उरी नुरे ॥२॥ एकाजनार्दनीं संशयचि नाहीं । जन्ममरण देहीं पुन्हां न ये ॥३॥

२८३९. कमळनेत्र पहातां मन माझें भुललें । योगी ध्याती ज़यातें रूप पंढरीये आलें १ आनंदु वो परमानंदु ध्यातां । समाधी उन्मनीं वोवाळणी तत्वतां ॥२॥ योगयाग तप न लगे आचरण कांहीं । सुलभ सोपारा वसे सर्वांठाईं ॥३॥ वेदशास्त्र श्रमलें पुराणें भांडती । शेषादिकां न कळे कुंठित मती ॥४॥ एकाजनार्दनीं पहात आनंदें मन । तद्रूपचि झालें जनीं सर्व जनार्दन ॥५॥

२८४०. धन्य धन्य विठ्ठल देव । पाहतां निरसे भेव काळाचें ॥१॥ जाउनी घाला पायीं मिठी । उदार हा जगजेठी ॥२॥ दरुशनें तारी जडजीव । निवारी भेव यमाचें ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । ध्यानीं मनीं विठ्ठल ॥४॥

२८४१. नागर गोमटें रूप तें गोजिरें । उभें तें साजिरें भीमातटीं ॥१॥ पहातां विश्रांती देहा होय शांति । अनुपम्य मूर्ति विठ्ठल देव ॥२॥ भक्ताचीया काजा राहिलासे उभा । कैवल्याचा गाभा बालमूर्ति ॥३॥ आनंदाचा कंद उभा परमानंद । एकाजनार्दनीं छंद मज त्याचा ॥४॥

२८४२. गोमटें गोजिरें पाउलें साजिरीं । धरियलीं गोजिरीं विटेवरी ॥१॥ वेध तो तयाचा मनें कायावाचा । दुजा छंद साचा नाहीं मना ॥२॥ इंद्रियें धांवतां आकळती ठायीं । विठोबाचें पायीं ठेवियलें ॥३॥ एकाजनार्दनीं वेधलेंसे मन । धरुनी चरण दृढ ठेलों ॥४॥

२८४३. उपासना धरूनि जीवीं । आलों गांवीं विठोबाच्या॥१॥ उभयतांच्या दरुशनें । जाहलें पारणें जीव शिवा ॥२॥ कष्टलों होतों दाही दिशा । पहातां आशा निमाली ॥३॥ केला परिहार श्रम । उरला नाहीं भवभ्रम ॥४॥ जडलें सदा पायीं मन । आतां न करीं साधन ॥५॥ जाहलों जीवें भावें दास । एकाजनार्दनीं पुरली आस ॥६॥

२८४४. पाहतां पाहतां परतलें मन । जालें समाधान चित्तीं माझे ॥१॥ संतांचे संगतीं लाभ येवढा झाला । पंढारीये पाहिला विठ्ठल देवो २ एकाजनार्दनीं मनींच बैसला । नवजे संचला दीपु जैसा ३

२८४५. न माये ध्यानीं योगिया चिंतनीं । नाचतो कीर्तनीं संतांपुढें ॥१॥ डोळियाची धणी फिटली पारणीं । उभा तो सज्जनीं पंढरीये ॥२॥ एकाजनार्दनीं देखियेला डोळां । परब्रह्म पुतळा बाईये वो ॥३॥

२८४६. इच्छा केली तें पावलों । देखतांचि धन्य जाहलों ॥१॥ होतें सुकृत पदरीं । तुमचे चरण देखिले हरी ॥२॥ गेलें भय आणि चिंता । कृतकृत्य जाहलों आतां ॥३॥ आजी पुरला नवस । एकाजनार्दनीं जाहलों दास ॥४॥

२८४७. धरिला देव आवडी मिठी । नोहे तुटी जन्मोजन्मीं ॥१॥ हाचि मुख्य भाव साचा । तुटला जन्माचा विसर ॥२॥ एकपणें पाहतां पोटीं । एकाजनार्दनीं जाहली भेटी ॥३॥

२८४८. अवघे यारे चला जाऊं । विठ्ठल रखुमाई पाहूं ॥१॥ अवघे ते भाग्याचे । नाम घेती विठ्ठलाचें ॥२॥ अवघे ब्रह्मज्ञानी । शरण एकाजनार्दनीं ॥३॥

२८४९. अवघें साधनें साधिलें । अवघें विठ्ठलरूप जालें ॥१॥ अवघें कर्म नेणती धर्म । अवघा तया परब्रह्म ॥२॥ अवघी सिद्धि समाधी । अवघी तुटली आधिव्याधि ॥३॥ अवघें जालें एकरूप । एकाजनार्दनीं स्वरूप ॥४॥

२८५०. अवघे ते दैवाचे । विठ्ठल विठ्ठल वदती वाचे ॥१॥ अवघा धंदा दुजा नाहीं । वाचे विठ्ठल रखुमाई ॥२॥ अवघा संसार करिती । वाचे अवघे विठ्ठल म्हणती ॥३॥ अवघीं कर्में घडलीं तया । अवघे विठ्ठलचि पायां ॥४॥ अवघा एकाजनार्दन । अवघा जनीं जनार्दन ॥५॥

२८५१. अवघेंची सुख तयासी जोडलें । अवघे पाउलें देखतांची ॥१॥ अवघें ब्रह्मरूप नाहीं कांहीं चिंता । अवघाचि देखतां पांडुरंग ॥२॥ अवघे ते धन्य क्षेत्रवासी दैवाचे । एकाजनार्दनीं वाचे विठ्ठल वदती ॥३॥

२८५२. अवघा सुखाचा आनंद । अवघा विटेवर परमानंद ॥१॥ अवघें चराचर सुख । अवघे या जालिया विमुख ॥२॥ अवघें डोळे भरुनी पहा । अवघे सुखें पूर्ण व्हा ॥३॥ अवघा अंतरीं आठवा । एकाजनार्दनीं सांठवा ॥४॥

२८५३. अवघे संतां एकमेळ । अवघा देव तो विठ्ठल ॥१॥ अवघे प्रेमरसाचे । अवघे विठ्ठल वदती वाचे ॥२॥ अवघे एकभावी । एकाजनार्दनीं सोहंभावी ॥३॥

२८५४. सदा सुरवर सुख तें इच्छिती । ऐसा लक्ष्मीपती कां रे न भजा ॥१॥ सोइरा धाइरा आन दुजा नाहीं । गुरु पिता पाहीं हाचि बंधु ॥२॥ सज्जन सांगाती आन नाहीं आम्हां । एकाजनार्दनीं प्रेमा वसे देहीं ॥३॥

२८५५. एक मागें एक पुढें । उभे रोकडे असती ॥१॥ चला जाऊं तया ठाया । पाहूं सखया आवडीं ॥२॥ एका एकाचें करूनि मीस । रहिवासले सावकाश ॥३॥ बहु युगें जाहलीं पहातां । खालीं न बैसती उभयतां ॥४॥ आनंदीं आनंद मना होय । एका-जनार्दनीं पाहुनी धाय ॥५॥

२८५६. योगी ध्याती जया चिंतिती मानसीं । तो हृषिकेशी पंढरीये ॥१॥ जाऊं लवलाहें पाहूं पैं चरण । क्षेमालिंगन देऊं सुखें ॥२॥ एकाजनार्दनीं पहातां रूपडें । ब्रह्म फाडोवाडें विटेवरी ॥३॥

२८५७. नीळवर्ण घनशाम । आत्माराम विटेवरी ॥१॥ चला जाऊं तया गांवा । उगवूं गोंवा तांतडी ॥२॥ भेटलिया मनोरथ । पुरती अर्थ मनाचे ३ साधे साधन फुकटची । एकाजनार्दनीं भाक साची ४

२८५८. पहा पहा विठ्ठल मुख । हरे जन्ममरण दुःख ॥१॥ पहातां राउळाची ध्वजा । पूर्वज उद्धरती सहजा ॥२॥ कळस देखतां नयनीं । होय पातकांची धुणी ॥३॥ करितां चंद्रभागा स्नान । कोटि तीर्थांचें मार्जन ॥४॥ पुंडलिका घेती भेटी । तयां वास तो वैकुंठीं ॥५॥ एकाजनार्दनीं प्रदक्षणा । पार नाहीं त्यांच्या पुण्या ६

२८५९. भक्त देव एके ठायीं ते आवडी । घेऊनियां गुढी जाऊं तेथें ॥१॥ पाहूं चरणकमळ वोवाळूं श्रीमुख । होईल तेणें सुख चौदेहांसी ॥२॥ संतांचे ते भार गाती नाचताती । आनंदें डुलती विठ्ठल वाचे ॥३॥ एकाजनार्दनीं आनंद सोहळा । पाहोनि धालों डोळा डोळीयाचा ॥४॥

२८६०. योगयाग तप जयासाठीं करणें । तें उभें केणें पंढरीसी ॥१॥ कउलाची पेठ पंढरीचा हाट । मिळाले घनदाट वारकरी ॥२॥ पताकांचे भार गर्जती हरिदास । होउनी उदास सर्वभावें ॥३॥ एकाजनार्दनीं नाहीं कामक्रोध । अवघा गोविंद हृदयीं त्यांचे ॥४॥

२८६१. पुढें गेले हरीचे दास । त्यांची आस आम्हांसी ॥१॥ त्यांचि मार्गीं आम्ही जाऊं । वाचे गाऊं विठ्ठला ॥२॥ संसाराचा न करूं धंदा । हरुषें सदा नाम गाऊं ॥३॥ एकाजनार्दनीं डोळे । पहाती पाउलें कोंवळीं ॥४॥

२८६२. प्रोग्याचें ध्यान बैसलेंसे मौन । तो हा निधान विटेवरी ॥१॥ विठ्ठल सांवळा पाहूं चला डोळां । धरुनी बाळलीळा कटीं कर ॥२॥ संतांचा समुदाव आरल्यांची दाटी । नामघोष सृष्टी न समाय ॥३॥ आषाढी कार्तिकी आनंद सोहळा । येती नरनारी बाळा पहावया ॥४॥ एकाजनार्दनीं पुरला मनोरथ । विठ्ठल पहतां चित्त गुंतलेंसे ॥५॥

२८६३. न लगे कांहीं यासी मोल । वेंचितां बोल फुकाचे ॥१॥ विठ्ठल विठ्ठल वदा वाचे । नोहे आणिकांचें कारण ॥२॥ नाचा प्रेमें वाळुवंटीं । घाला मिठी संतांसी ॥३॥ एकाजनार्दनीं उभा । विठ्ठल शोभा अनुपम्य ॥४॥

२८६४. अवघे रंगले रंगीं । अवघे त्या पांडुरंगीं ॥१॥ अवघा दुजा भाव नाहीं । अवघे विठ्ठलची पाहीं ॥२॥ अवघे आनंदें नाचती । अवघे रंगीं त्या गाती ॥३॥ अवघे भाळेभोळे । अवघे प्रेमाचे आगळे ॥४॥ अवघा जनार्दन । एकाजनार्दनीं भजन ॥५॥

२८६५. नाचेन आनंदें विठ्ठलनाम छंदें । परते भेदाभेद सांडोनियां ॥१॥ जाईन पंढरी नाचेन महाद्वारीं । वाचे हरिहरी रामकृष्ण ॥२॥ साधन आणीक नेणें मी सर्वथा । एका पंढरीनाथावांचुनी कांहीं ॥३॥ एकाजनार्दनीं दृढ हा निश्चय । मुखीं नाम गाय सदोदित ॥४॥

२८६६. प्रेमळ प्रेमळ अंतरीं प्रेमळ । नाहीं काळ वेळ तयालागीं ॥१॥ प्रेमभावें गाय विठ्ठलचि ध्याय । मग सुखा उणें काय संसारीया ॥२॥ जनार्दनाचा एका रंगला चरणीं । निजरंगीं रंगोनी मिळोनि गेला ॥३॥

२८६७. त्रिभुवना परती पंढरिये पेंठ । उभा तो वैकुंठ विटेवरी ॥१॥ पहा चला जाऊं पंढरीये । नवस पुरती सये अंतरींचे ॥२॥ उभा विटेवरी घेउनी कुंथी । शंख चक्र गदा पद्म हातीं शोभती ३ राही रुक्मिणी उभ्या दोही दो बाहीं । चामरें मयूरपिच्छ ढाळिती ठायीं ४ एकाजनार्दनीं पाहतां रूप । पाहतां पाहतां जालें मन तद्रूप ५

२८६८. परलोकींचा सखा उभा विटेवरी । भक्त साह्यकारी पांडुरंग ॥१॥ चंद्रभागे तटीं शोभे वाळुवंटीं । देखिलासे दृष्टी पांडुरंग २ एकाजनार्दनीं भेटतां तयासी । रिद्धीसिद्धी दासी होती मग ३

२८६९. गोमटें नागर कटीं धरूनि कर । उभा तो सुकुमार वैकुंठींचा ॥१॥ रूपाचें रूपस पाहतां सावकाश । धणी धाय मनासे तया पाहतां ॥२॥ नाठवे कल्पना मनाचिया मना । बुद्धी ते चरणा विनटली ॥३॥ एकाजनार्दनीं इंद्रियांची चाली । सर्व हारपली पंढरी पाहतां ॥४॥

२८७०. उपवास पारणें न लगे समाधि । वायांचि उपाधि कोण धरी ॥१॥ आम्हां विष्णुदासां कळलेंसे वर्म । मुखीं गावें नाम हातीं टाळी ॥२॥ आनंदें बागडे जाती पंढरीसी । पहाती विठोबासी दृष्टीभरी ॥३॥ एकाजनार्दनीं मनाचें उन्मन । एका दरुशनें मुक्तिपद ॥४॥

२८७१. देव विसरला देवपणासी । देखोनि भक्तांसी भुलला ॥१॥ नावडेचि वैकुंठ धाम । तो निष्काम कीर्तनीं नाचतो ॥२॥ नावडेचि शेषशायी आसन । उभा जघन धरूनि विटे ॥३॥ ऐसा प्रेमाचा भुकेला । एकाजनार्दनीं धाला ॥४॥

२८७२. जघन प्रमाण दावीत श्रीअनंत । यारे यारे म्हणत भेटावया ॥१॥ आवडीची धणी घ्यारे प्रेमभावें । संतचरणां द्यावें आलिंगन ॥२॥ कट धरूनि करीं समाचि पाऊलीं । उभा वनमाळी भक्तांसाठीं ॥३॥ जीवांचें जीवन मनाचें मोहन । सगुण हें ध्यान भक्तीकाजा ॥४॥ रूपाचें रूपस निर्गुणावेगळें । पहातां तो संतमेळे उभा असे ॥५॥ विटे नीट उभा आनंदाचा कंद । पाहतां परमानंद सुख वाटे ॥६॥ एकाजनार्दनीं भक्तांचिया काजा । उभारूनि भुजा वाट पाहे ॥७॥

२८७३. नेणतियासी नेणता तो सान । जाणतिया जाणपण धरूनि ठेला ॥१॥ योगियांचें मांदुस सज्जनांचें स्थळ । श्रम तो केवळ पाहतां जाय ॥२॥ जाणते नेणते येती बरवेपरी । दरुशनें उद्धरी जडजीव ॥३॥ एकाजनार्दनीं सगुण निर्गुण । जाणता नेणता सर्व आपणचि जाण ॥४॥

२८७४. सांवळें कोवळें ढवळें ना पिंवळें । रंगे रंगावेगळें पंढरीगे माये ॥१॥ चांदिणें जैसें शोभतें नभीं । तैसा कट धरूनि

नभीं चंद्र गे माये ॥२॥ विटेवरी नीट जघनीं कर । उभा देखे परात्पर गे माये ॥३॥ एकाजनार्दनीं पाहतां तयासी । मन चकोर तृप्त झालें गे माये ॥४॥

२८७५. सर्वांघटीं बिंबोनि ठेला । तो हा आला पंढरीये १ सर्वांघटीं ज्याची वस्ती । ते हीं मूर्ति विटेवरी ॥२॥ सर्वां ठायीं भरूनि उरे । पंढरिये पुरे मापासी ॥३॥ जनार्दनाचा एका ह्मणे । धन्य येणें पंढरी ॥४॥

२८७६. त्रिपुटीविरहित कर कटीं उभा । त्रैलोक्याची शोभा शोभे गे माये ॥१॥ परे परता वैखरीये आरुता । पश्यंती निर्धारितां न कळे गे माये ॥२॥ मध्यमा मध्यमीं उभा तो स्वयंभ । अद्वयानंद कोंभ कर्दळीचा गे माये ॥३॥ एकाजनार्दनीं आहे तैसा भला । हृदयीं सामावला माझ्या गे माये ॥४॥

२८७७. जिकडे जावें तिकडे देवचि सांगातें । ऐसें केलें नाथें पंढरीच्या ॥१॥ शब्द तेथें झाला समूळचि वाव । गेला देहभाव हारपोनी ॥२॥ अंतरीं बाहेरीं एकमय जाहलें । अवघें कोंदाटलें परब्रह्म ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसी जाहली वृत्ति । वृत्तीची निवृत्ति चिदानंदीं ॥४॥

२८७८. व्यापक तें नाम अनंत ब्रह्मांडीं। मना सोस सांडीं कल्पनेचा ॥१॥ कल्पनाविरहित नाम तूंचि गायें । सर्व सुख पाहें विठ्ठलपायीं ॥२॥ ठसावेल मूर्ति पाहतां अनुभव । पांचांचा मग ठाव कैंचा तेथें ३ एकाजनार्दनीं संपूर्ण अघवा । भीमातीरीं थडवा उभा असे ४

२८७९. सर्व इंद्रियांचें पुरलें कोड । नाम वाड ऐकतां ॥१॥ हरुषें नाचतां वाळुवंटीं । गेली कसवटी पळुनी ॥२॥ पंचभूतें स्थिर झालीं । जीवशिवा एक चाली ॥३॥ एकाजनार्दनीं मंगळ झाला । अवघा भेटला श्रीविठ्ठल ॥४॥

२८८०. तुमचे पायीं ठेवितां भाळ । पावलों सकळ अंतरींचें ॥१॥ आतां पुरली वासना । आठवितां तुमचे गुणा ॥२॥ जन्मांचें सार्थक । पाहतां तुमचें श्रीमुख ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । धन्य नाम तुमचें वदनीं ॥४॥

२८८१. मार्ग सोपा पंढरीचा । सांपडला साचा उत्तम ॥१॥ नाहीं पुसायाचें काम । वाचे नाम मुखीं गाऊं ॥२॥ नाहीं कोठें आड काठी । साधन कपाटीं पंचाग्न ॥३॥ न लगे योगयाग तप । वाचे जप विठ्ठल ४ त्रिअक्षराचें काम । एका निष्काम जनार्दनीं ५

२८८२. आलिंगोनी देव भक्त । सरते एकरूपीं होत ॥१॥ तें हें पहा पुंढरपुर । देव भक्त तीर्थ माहेर ॥२॥ आलियासी दान नामामृतचि पान ॥३॥ जैसा ज्याचा हेत । पुरवितसे रुक्मिणी-कांत ॥४॥ एकाजनार्दनीं शरण । दाखवा पंढरी पावन ॥५॥

२८८३. येथोनी आनंदुरे । कृपासागर तो गोविंदुरे ॥१॥ महाराजाचे राउळीं । वाजे ब्रह्मानंद टाळी ॥२॥ आनंदले भक्त जन । ह्मणे धन्य रघुनंदन ॥३॥ लक्ष्मी चतुर्भुज जाली । प्रसाद घेउनी बाहेर आली ॥४॥ एकाजनार्दनीं नाम । पाहतां निवे आत्माराम ५

२८८४. भक्तीच्या पोटा मुक्ति पैं आली । भक्तीनें मुक्तीतें वा-ढविलें ॥१॥ भक्ति ते माता मुक्ति ते दुहिता । जाणोनि तत्त्वतां भजन करी २ भक्ति सोडोनि मुक्ति वांछिती वेडी । गूळ सोडोनी कैसी जे गोडी ॥३॥ संतोषोनि भक्ति ज्यासी दे मुक्ती । तोचि लाभे येर व्यर्थ कां शिणती ॥४॥ एकाजनार्दनीं एक भाव खरा । भक्ति मुक्ति दाटूनी आलिया घरा ॥५॥

२८८५. भक्ति असो मुक्ति घालारे बाहेरी । बहुतां चाळविलें चाळायाची थोरी ॥१॥ भक्ति ते राहो मुक्ति ते जावो । मुक्तीमाजी भावो नाहीं नाहीं ॥२॥ मुक्ति चाळा लाऊनि सेखीं वोसंडी । नेणों ऐसें किती केले पाषांडी ॥३॥ मुक्तीचिनी योगें वामदेव शुक । त्यां-च्याही विकल्प मानिताती लोक ॥४॥ नाम संकीर्तन भक्ति मुक्तीसी धाक । संवादें दोघेही राहो माझी भाक ॥५॥ उपजोनियां पोटीं भक्ति ते आसी । मातृहत्यारी मुक्ति कवण पोसी ॥६॥ एकाजना-र्दनीं सेवितां चरणरज । मुक्ति सेवा करीं सांडूनियां लाज ॥७॥

२८८६. भक्ति प्रेमाविण ज्ञान नको देवा । अभिमान नित्य नवा तयामाजी ॥१॥ प्रेम सुख देईं प्रेम सुख देईं । प्रेमेंविण नाहीं समाधान ॥२॥ रांडवेनें जेवि शृंगार केला । प्रेमेंविण जाला

ज्ञानी तैसा ॥३॥ एकाजनार्दनीं प्रेम अति गोड । अनुभवी सुरवाड जाणतील ॥४॥

२८८७. तुझिया चरणीं अनुपम्य सुख । हें तों अलौलिक रमा जाणे ॥१॥ जाणती ते भक्त प्रेमळ सज्जन । अभाविक दुर्जन तयां न कळे ॥२॥ भक्तियुक्त ज्ञान तेथें घडे भजन । वांयां मग शीण जाणिवेचा ॥३॥ एकाजनार्दनीं आवडे ते बोल । भक्तीविण फोल नावडती ॥४॥

२८८८. नवल दावियेलें सोंग । अवघा एक पांडुरंग ॥१॥ हें तों आलें अनुभवा । विठ्ठल देवा पाहतांचि ॥२॥ मन पवनांची धारणा । तुटली वासना विषयांची ॥३॥ एकाजनार्दनीं परिपूर्ण । एका एकपण देखतां ॥४॥

२८८९. सोळा सहस्र गोपी भोगुनी ब्रम्हचारी । ऐशी अगाध कीर्ति तुमची श्रीहरी ॥१॥ दीन आम्ही रंक वंदितों चरणा । सांभाळीं दिनालागीं मानसमोहना ॥२॥ एकाजनार्दनीं धन्य धन्य लाघव । एकरूपें असोनि दिसों नेदीं कैसें वैभव ॥३॥

२८९०. अकळ अनुपम्य तुझी लीला । न कळे अकळा सर्वांसी ॥१॥ वेदशास्त्रां न कळे पार । षट्निर्विकार दर्शनें ॥२॥ जों जों धरूं जावा संग । तों तों विरंग उपाधि ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । रंकाहुनी मी रंक ॥४॥

२८९१. ऐक्य तें जालीया मीतूंपण नाहीं । पौरुष हा कांहीं नाहीं नामीं ॥१॥ नाहीं चतुर्देह तूर्यादी उन्मनी । स्वयंभ ती खाणी उभी असे ॥२॥ चित्त जडलिया तेथें काय उणें । लज्जीत साधनें होती देखा ॥३॥ एकाजनार्दनीं नाहीं मीतूंपण । व्यापक तें जाण सर्वांठायीं ॥४॥

२८९२. खंडन मुंडन दंडन करूनि ध्याती रूप । तें आम्हां सोपें झालें वर्णितां चिद्रूप ॥१॥ तो देखिला वो देखिला बाई पहातां पहाणें विसरून गेलें ठक पडलें सकळां वो ॥२॥ नेति नेति शब्द भुलल्या वेडावल्या श्रुति । आगमनिगमां न कळे चोज निर्गुणीं ॥३॥ एकाजनार्दनीं सकळ ब्रम्ह हो । अनुपम्य शोभा कर्दळीचा गाभा ॥४॥

२८९३. कळा ते कुसरी नव्हे हें शाब्दिक । अणुरेणु एक भरुनी उरला ॥१॥ तोचि डोळेभरी पहा श्रीहरी । परे परता दुरी ठसावला ॥२॥ एकाजनार्दनीं शब्दावेगळा असे । तो उभा दिसे कीर्तनरंगीं ॥३॥

२८९४. पाहतां पाहतां वेचलेंसे मन । तेणें समाधान जीवशिवां ॥१॥ जीवाचें जीवन मनाचें मोहन । वाचेसी मौन्य सदा पडे ॥२॥ परादिकां ज्याचा न कळेचि अंत । सर्व गुणातीत भेदरहित ३ एकाजनार्दनीं त्रिगुणापरता । ओतप्रोत सर्वथा भरलासे ४

२८९५. जय विश्वव्यापका विश्वमूर्ति वंदन । वर्णितां थकले सहा अठराजण । मुनिजन धुंडिती साधिती साधन । नव्हे दरुशन तयांसी ॥१॥ तो तूं लाघव सूत्रधारी । करसी गोकुळामाजी चोरी । धरितां न सांपडसी निर्धारीं । आगम निगमां सरी न पवेचि ॥२॥ न कळे न कळे कवणा महिमान । शेषादिक श्रमले जाहले आसन्न । शरण एकाजनार्दन । कायावाचामन दृढेंसी ॥३॥

२८९६. व्यापक हा जनार्दन । जगचीं भरला संपूर्ण ॥१॥ मागें पुढें आहे उभा । काय वानूं त्याची शोभा ॥२॥ भरुनी उरला । सर्वांठायीं तो संचला ॥३॥ शरण एकाजनार्दनीं । व्यापक तो जनीं वनीं ॥४॥

२८९७. काय वानूं हरीचा महिमा । आगमां निगमां अतर्क्य १ वेदशास्त्रें शिणोनी ठेलीं । पुराणें निवांत राहिलीं ॥२॥ दरुशनें तटस्थ होऊन । धरुनी ठेलीं तीं मौन ॥३॥ श्रुती अनुवादा जो नये । त्यासी एकाजनार्दनीं ध्याये ॥४॥

२८९८. दीपकाळिकेमाजी कळा । तैसा परब्रह्म पुतळा ॥१॥ असोनियां नसे जगीं । जैसा प्राण वायु संगीं ॥२॥ करवी खेळवी नाना खेळां । परी आपण आलिप्त सकळां ॥३॥ एकाजनार्दनीं सूत्रधारी । खेळ खेळोनी अलिप्त निर्धारीं ॥४॥

२८९९. आमुची तों येवढी आस । होऊं दास हरीचे ॥१॥ मना मागें न जाऊं देखा । सांपडला शिक्का उत्तम ॥२॥ त्रैलोक्याचा धनी देव । आम्हां भेव नाहीं कोठें ॥३॥ जाहलों बळियें शिरोमणी । एका चरणीं जनार्दनाचे ॥४॥

२९००. कोणासवें आमुचें काय काज । पंढरीराज कैवारी १ उभा राहे मागें पुढें । निवारी सांकडें भक्तांचें ॥२॥ आघात घात निवारी । पीतांबरीं करी छाया ॥३॥ ऐसा अनुभव मज यावा । धांवें राया पंढरीच्या ॥४॥ एकाजनार्दनीं भाव । धर-लिया धांवे देव ॥५॥

२९०१. व्यापक जनार्दन व्यापूनि राहिला । अखंड भरला हृदय पुटीं ॥१॥ पाहतां पाहणें परतें गेलें दुरी । अवघा चराचरीं जनार्दन ॥२॥ व्यापक व्यापला अक्षयीं संचला । भरुनी उरला जळीं स्थळीं ३ एकाजनार्दनीं रिता नाहीं ठाव । अवघा देहीं देव जनार्दन ४

२९०२. भोळयाभाविकांसी देख । अवघा एक विठ्ठल ॥१॥ दुजा नाहीं आन कोण्ही । पाहतां तिहीं त्रिभुवनीं ॥२॥ जन्मम-रणाचें सांकडें । नाहीं कोडें मुक्तीचें ॥३॥ मोक्ष तो उभा जोडोनी हात । एकाजनार्दनीं तिष्ठत ॥४॥

२९०३. एकपणें असे सर्वांठायीं वसे । योगी ज्या ध्यातसे हृदयकमळीं ॥१॥ तें रूप साजिरें पहातां गोजिरें । मन तेथें मुरे पहातां पाहतां ॥२॥ खुंटली भावना तुटली वासना । साधनें तीं नाना हारपलीं ॥३॥ संकल्प विकल्प मुळींच उडाला । एकाज-नार्दनीं धाला एकपणें ॥४॥

---

## भाव.

२९०४. देव भुलला भावासी । सोडोनियां वैकुंठासी ॥१॥ उघडा आला पंढरपुरा । तो परात्पर सोइरा ॥२॥ पाहूनियां पुंडलिका । भुलला तयाच्या कौतुका ॥३॥ उभा राहिला विटेवरी । एकाजनार्दनीं हरी ॥४॥

२९०५. भावाचेनी भक्ती थोर । भावें तुटे वेरझार ॥१॥ भावें अंकित देव भक्ताचा । वेदशास्त्र बोले वाचा ॥२॥ भावें गुरु-शिष्य दोन्ही । भावयुक्त सर्व गुणीं ॥३॥ भावें जाले भक्तिपंथ । भावें पुरे मनोरथ ॥४॥ एकाजनार्दनीं भाव । भावें दिसे देहीं देव ५

२९०६. भावाचिये बळें होवनी लहान । आपुलें थोरपण

विसरला ॥१॥ न म्हणे यातिकुळ तें सुशीळ । उत्तम चांडाळ हो कां कोण्ही ॥२॥ अट्टाहास्यें करितां नामाचा उच्चार । उतरीं पैल पार भवनदीचा ॥३॥ एकाजनार्दनीं भक्तांची आवडी । घाली-तसे उडी वैकुंठाहुनी ॥४॥

२९०७. जीवभाव जेणें अर्पियेला देवा । तयाची ते सेवा देव करी ॥१॥ न म्हणे नीच अथवा उंचपण । भावासी कारण मुख्य देवा २ देव भावासाठीं लागे पाठोपाठीं । एकाजनार्दनीं भेटी देतो देव ३

२९०८. चरणामृता देव स्वादला । वटपत्रीं तो बाळ जाला ॥१॥ अभिनव भक्ती नेली गोडी । चुरचुरा पावे चोखी आवडी २ भक्तिरसाची लागली गोडी । तोंडींचा अंगुष्ठ बाहेर न काढी ॥३॥ एकाजनार्दनीं सांगतों भावो । आपुली गोडी आपण घ्यावो ॥४॥

२९०९. एका भावासाठीं । देव धांवे उठाउठीं ॥१॥ पोहे सुदाम देवाचे । भक्षी आवडीनें साचे ॥२॥ खाऊनियां भाजी पान । दिधलें भोजन ऋषींसी ॥३॥ आवडीनें कण्या खाय । प्रेम न समाय अंतरीं ॥४॥ गौळियांचें उच्छिष्ट खाये । एकाजनार्दनीं धाये ॥५॥

२९१०. प्रेमें भक्ताची आवडी । म्हणोनियां धुतो घोडीं ॥१॥ ऐसा प्रेमाचा भुकेला । सेवक जाहला बळीद्वारीं ॥२॥ उच्छिष्ट फळें भिल्लणीचीं । खाये साचीं आवडीनें ॥३॥ एकाजनार्दनीं उदार । तो हा सर्वेश्वर विटेवरी ॥४॥

२९११. राम भावाचा भुकेला । सांडोनी दुर्योधन सदनाला ॥१॥ विदुर गृहाप्रति गेला । विश्रांती तेथें पावला २ शबरीचीं फळें भक्षी । क्षीरनिधी शयन साक्षी ॥३॥ एकाजनार्दनीं निश्चय ऐसा । देव भक्ताधीन राहसा ॥४॥

२९१२. जें वेदांसी नातुडे श्रुतींसी सांकडें । तें उभें वाडें-कोडें पंढरीये ॥१॥ न माये चराचरीं योगियांच्या ध्याना । तया ह्मणती कान्हा नंदाचा जो ॥२॥ आगम निगम लाजोनी राहिले । तया बांधिती वहिलें उखळासी ॥३॥ काळाचा जो काळ भक्ता प्रतिपाळ । तया भेडविती बागूल आला ह्मणोनी ॥४॥ बारा चौदा सोळा अठरा विवादती । तो गायी राखी प्रीतीं गोकुळांत ॥५॥ एकाजनार्दनीं भक्तीचा भुकाळु । खाय तुळशीदळु भाविकांचें ॥६॥

२९१३. स्वामीसी तो पुरे एक भाव गांठीं। वाउगा श्रम नेहटी वांयां जाय ॥१॥ भावासाठीं देव अंकित अंकिला। राहिला उगला बळीचे द्वारीं ॥२॥ अर्जुनाचे रथीं सारथी होउनी। राहे मोक्षदानी भावासाठीं ॥३॥ विदुराचे घरीं आवडीनें भक्षी। कण्या साक्षेपेंसी खातो देव ॥४॥ पोहे सुदाम्याचे खाउनी तुष्टला। एकाजनार्दनीं दिला सुवर्णगांव ॥५॥

२९१४. भावें घातली कास देव झाला दास। सोशी गर्भवास भाविकांचे ॥१॥ भावचि कारण भावचि कारण। यापरतें साधन आणिक नाहीं ॥२॥ भावाचेनि बळें जीवपणें बोंवळें। मन हें सोंवळें ब्रह्म साम्य ॥३॥ एकाजनार्दनीं भावचि कारण। सच्चिदानंदावरी खूण दाविली ते ॥४॥

२९१५. भाव भजनातें निफजवी। भक्त देवातें उपजवी ॥१॥ आर्ता भजनीं देव केला। भक्त वडिल देव धाकुला ॥२॥ सेवा करणें हा संकल्प। भक्त देवाचाही बाप ॥३॥ भक्त कळवळा देवाचा। देव झाला त्या भक्ताचा ॥४॥ देव भक्ताचे पोटीं। झाला ह्मणोनी आवड मोठी ५ एकाजनार्दनीं नवलाव। कैसा भक्ताचि झाला देव ६

२९१६. एका भावें कार्यसिद्धी। एका भावें तुटे उपाधी। एका भावें आधिव्याधी। जन्मजरा पाश तुटे ॥१॥ एकाभावें करी भजन। एकाभावें संत सेवन। एकाभावें वेद वचन। पाळितां तुटे भव पीडा ॥२॥ एकाभावें योगयाग। एकाभावें तप अष्टांग। एकाभावें देव तें सांग। तेथें द्वैत नको बापा ३ एकाभावें रिघे शरण। एकाभावें एकाजनार्दन। एकाभावें धरीं चरण। कायावाचामनेंशीं ॥४॥

२९१७. योगी रिगाले कपाटीं। हटयोग साधिती आटी ॥१॥ परि तयांसी दुर्लभ। तो गोकुळीं जाहला सुलभ ॥२॥ यज्ञादिकीं अवदाना नये। तो गोपाळांचें उच्छिष्ट खाये ॥३॥ सदा ध्याती जपी तपी ज्यासी। तो नाचे कीर्तनीं उल्हासीं ॥४॥ एकाजनार्दनीं प्रेमळ। भोळ्याभाविकां निर्मळ ॥५॥

२९१८. असोनी सबराभरी। बाह्य आणि अंतरीं। संपुष्टा माझारीं। ह्मणती देव ॥१॥ कल्पनेचा देव। ऐसा जया भाव।

तो न करी निर्वाहो आज्ञालागीं ॥२॥ सुक्षेत्रीं पुण्य अनु क्षेत्रीं पाप । न चले हा संताप कल्पनेचा ॥३॥ काशी हो पंढरी तीर्थमाला करी । सर्वत्र नरहरी तोचि भाव ॥४॥ एकाजनार्दनीं सर्व सिद्धि असे । नाथिलेंचि पिसें मतवाद्या ॥५॥

२९१९. जो जया चित्तीं भाव । तैसा तैसा होय देव । येथें संदेहो । धरणें न लगे ॥१॥ द्रौपदी स्मरतां माधव । धांव घेतली लवलाहे । जया जैसा भाव । तैसा देव होतसे ॥२॥ अशोक वनीं सीता । शुद्धि जातां हनुमंता । भावेंचि तत्त्वतां । कार्यसिद्धी ॥३॥ समरंगणीं तो अर्जुन । मोहिलासे गोत देखोन । तेथेंचि जनार्दन । भावें गीता सांगे ॥४॥ ऐसा भावाचा लंपट । सांडोनी आलासे वैकुंठ । एकाजनार्दनीं नीट । विटे उभा राहिला ॥५॥

२९२०. जैसा जैसा जया भाव । तैसा तैसा पावे देव ॥१॥ हा तो अनुभव पहा । देहीं पहा विदेहीं ॥२॥ शुद्ध करावें तें मन । जनीं पहा जनार्दन ३ एकाजनार्दनीं भाव । देहीं वरातसे देव ॥४॥

२९२१. देवासी तों पुरे एकभाव । नेणें वैभव दासाचें ॥१॥ जया चित्तीं जी वासना । तैशी कामना पुरवणें ॥२॥ नाहीं पडत गोवागुंती । आपणचि हातीं करीतुसे ॥३॥ एकाजनार्दनीं अंकीत । राहे तिष्ठत द्वारीं त्याच्या ॥४॥

२९२२. अंगावरी आलिया घाव । अवघा देव निवारी ॥१॥ कायावाचा शरण जातां । पुंपक्षी अनाथा विठ्ठल ॥२॥ मुख्य आधीं पाहिजे भाव । तेणें देव कव घाली ॥३॥ एकाजनार्दनीं भावापाठीं । भावे उठाउठीं देव मागें ॥४॥

२९२३. महालाभ हाचि आहे । जो या गाये विठ्ठलासी ॥१॥ प्रेमभरित सदा कंठ । अंगीं बळकट भावना ॥२॥ हेंचि वैराग्याचें सार । वांयां कासया वेरझार ॥३॥ एकाजनार्दनीं भाव । अवघा पाठीं पोटीं देव ॥४॥

२९२४. समसाम्य सर्वांभूतीं । ज्यांसी घडे भगवद्भक्ती ॥१॥ जालिया सद्गुरुकृपा । सर्व मार्ग होय सोपा ॥२॥ हृदयीं ठसतांची भावो । प्रगटे देवाधिदेवो ॥३॥ भक्ता भावार्थें विकला । एकाजनार्दनीं देखिला ॥४॥

२९२५. झालिया गुरुकृपा सुगम । सर्वत्र ठावें परब्रह्म ॥१॥ तेथें नाहीं जन्ममरण । भवबंधन असेना ॥२॥ ऐसा धरितां विश्वास । काय उणें मग तयास ॥३॥ एकाजनार्दनीं भाव । स्वयें आपणचि होय देव ॥४॥

२९२६. सकळ साधनांचें सार । जनार्दन इतका उच्चार ॥१॥ येणें घडे सर्व कर्म । नको भेदाभेद वर्म ॥२॥ सांडा द्वैताचा भाव । तेणें सर्व दिसे वाव ३ एकाजनार्दनीं भाव । भाव तेथें वसे देव ४

२९२७. आरशाअंगीं लागतां मळ । मुख न दिसेचि निर्मळ ॥१॥ मळ तो झाडूनि पाहतां । मुख दिसे निर्मळता ॥२॥ पाहतां शुद्धभाव रीती । परमार्थ हाचि चित्तीं ॥३॥ एकाजनार्दनीं हा विचार । आरशासारिखा प्रकार ॥४॥

२९२८. शुद्धभाव चित्तीं । तरी कांहीं न लगे युक्ति ॥१॥ न लगे आणिक विचार । शुद्ध भाव हाचि सार ॥२॥ भावाविण वांझें । साधनें तीं अवघीं ओझें ॥३॥ एकाजनार्दनीं भाव । पाववी अक्षय तो ठाव ॥४॥

२९२९. अभाग्य न भजती भगवंतीं । त्यासी पृथ्वी असे जडत्व देती । जळें दिधली त्या अधोगती । तेजें दिधली त्या संतापवृत्ति ॥१॥ ऐशा कैसेनि भेटे भगवंतु । नरदेहीं मुकले निजस्वार्थु । जन्म मरणाचें भोगिती आवर्तु । त्यासी विमुख होय हृदयस्थु ॥२॥ वायूनें दिधलें त्या चंचळत्व । नभें दिधलें त्यां भावशून्यत्व । महत्तत्त्वें हरिलें निजसत्व । मायें दिधलें त्या ममत्व ॥३॥ सभाग्य भावें भजती भगवंतीं । त्यांसी पृथ्वी देतसे निज शांती । जळें दिधली मधुर रसवृत्ती । तेजें दिधली निजतेज प्रभादीप्ति ॥४॥ ऐशा सहजें प्रसन्न होय देवो । जेणें भूतांचा पालटे देहभावो । निजीं निजाचा वाढे निर्वाहो । जनीं विजनीं अखंड ब्रह्म भावो ॥५॥ वायु उपरमें दे निश्चळत्व । नभें दिधलें त्या अलिप्तत्व । महत्तत्वें दिधलें शोधित सत्त्व । मायें दिधलें सद्विद्या परमतत्त्व ॥६॥ एकाजनार्दनीं निज भक्ति । तैं अलभ्य लाभु होय प्राप्ती । भूतें महाभूतें प्रसन्न होती । तेणें न भंगे ब्रह्मस्थिति ॥७॥

२९३०. भाव लागला भगवंतीं । हरिरूप पवित्र जगती । पाहतां कर्माकर्म गती । ब्रह्मस्थिती अखंड ॥१॥ भक्ति ह्मणे सोहं-शक्ति । सांडीं भवभय आसक्ती । पाहतां निजभाव विरक्ती । सर्वांभूतीं भगवंता ॥२॥ करितां कर्मांचें देहाचरण । कर्म सबाह्य चैतन्य । देहविदेह अवसान । गमनागमन खुंटलें ॥३॥ एका-जनार्दनीं एकपण । अनन्यभावें पैं शरण । जन्ममरण आलें मरण । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥४॥

२९३१. जो जो धरसील भाव । तें तें देईल देव । ये अर्थीं संदेह । मानूं नको ॥१॥ भावें भक्ति फळे । भावें देव मिळे । निजभावें सोहळे । स्वानंदाचे ॥२॥ एकाजनार्दनीं । भावाच्या आवडीं । मनोरथ कोडी । पुरवीं तेथें ॥३॥

२९३२. भावेंविण देव नयेचि पैं हातां । वाउगें फिरतां रानो-रान ॥१॥ मुख्य तें स्वरूप पाहिजे तो भाव । तेणें आकळे देव निःसंदेह ॥२॥ संतसमागम नाम तें पावन । वाचे नारायण ह्याचि भाव ३ एकाजनार्दनीं सोपा मंत्र राम । गातां जोडे धाम वैकुंठींचें ४

२९३३. अवघे अवघे ते देव । अवघे अवघे एक भाव ॥१॥ अवघे अवघे प्रेमळ । अवघे अवघे निर्मळ ॥२॥ अवघे अवघे भावाचे । अवघे अवघे प्रेमाचे ॥३॥ अवघा एका अवघा एका । अवघा अवघा जनार्दन एका ॥४॥

२९३४. देवासी तो पुरे । एक तुळशीपान वरें ॥१॥ नाहीं आणिक आवडी । भावासाठीं घाली उडी ॥२॥ कण्या भाजी पान फळें खाय । न पाहे यातीकुळ स्वयें ॥३॥ प्रीतिनें दहींभात । उच्छिष्ट गोवळयांचें खात ॥४॥ भक्तिसुखें भुलला हरी । एकाजनार्दनीं निर्धारीं ॥५॥

२९३५. भावें करारे भजन । भावें करा नामस्मरण ॥१॥ भावें जावें पंढरीसी । भावें नाहावें भीमरथीसी ॥२॥ भावें करा प्रदक्षिणा । भावें करा जागरणा ३ भावें व्रत एकादशी । एका शरण जनार्दनासी ४

२९३६. आह्मासी विश्वास पुरे एक भाव । या विठ्ठलावांचोनि देव न सर्गों कोण्हा ॥१॥ विश्रांतीचें घर संतांचें माहेर ।

करिती निर्धार वेदशास्त्रें ॥२॥ जनार्दनाचा एका प्रेमें तो आठवी। विठ्ठल सांठवी हृदयामाजी ॥३॥

२९३७. पाउला पाउली चिंतावी माउली । विठाई साउली आदि अंतीं ॥१॥ नोहे परता भाव नोहे परता भाव । आतुडेचि देव हातीं मग ॥२॥ बैसलासे दृढ हृदय मंदिरीं । सबाह्याभ्यंतरीं कोंडोनियां ३ एकाजनार्दनीं जडला विठ्ठल । नोहे तो निर्बळ आतां कधीं ४

२९३८. बहु मतें बहु मतांतरें । आज्ञा निर्धारें नावडती ॥१॥ अविनाश आहे सुख पंढरीसी । यालागीं तयासी न विसंबों ॥२॥ विठ्ठल देवो जेथें उभे । पुढें शोभे पुंडलीक ॥३॥ एकाजनार्दनीं भ्रमर । कमळ परिकर विठोबा ॥४॥

२९३९. देव प्रसन्न जाला माग ह्मणे वहिला । भक्त घरोघरीं विचार पुसों गेला ॥१॥ भाव कीं भ्रांती आळस कीं भक्ती । विचारूनि व्यक्ती ठायीं ठेवा ॥२॥ अरे हें गुह्यगोप्य कुडें करूं नये उघडें । तरी द्वारोद्वार पुसूं जाय वेडें ॥३॥ विलंब करितां पहाहो उदास जाला देवो । निवालीया खंति न घाली ह्मणे धावो ॥४॥ शिकविलें नायकती वरिलें तें करिती । आपुलेनि कर्में आपण गुंतताती ॥५॥ एकाजनार्दनीं शीतळ भाव । आळसेंचि देव दुऱ्हाविला ॥६॥

२९४०. सर्वां ठायीं ज्याची सत्ता । तो भक्ताधीन तत्वता ॥१॥ ज्याची आज्ञा प्रमाण । बारा अंगुळें विचरे प्राण ॥२॥ आज्ञा ज्याची धडफुडी । पर्वत बैसका न सोडी ॥३॥ ज्याचे आज्ञेविण । पवनु न चाले एक क्षण ४ जो सर्वांसी आधार । एकाजनार्दनीं विश्वंभर ५

२९४१. भक्त देवातें भजती । देव भक्तीं धरीं प्रीती ॥१॥ ऐसा एकमेकांचा ठावो । भक्ताअंगीं देव पहाहो ॥२॥ अलंकार एक सुवर्ण । तैसें नाहीं दुजेपण ॥३॥ एका आधीं एक पाठीं । एका-जनार्दनीं रहाटी ॥४॥

२९४२. एक एकाच्या भावा । गुंतुनी ठेले अनुभवा ॥१॥ प्रेम न समाये गगनीं । धन्य धन्य चक्रपाणी ॥२॥ उद्धरी पतिता । मोक्ष देतो सायुज्यता ३ एका शरण जनार्दनीं । उदार हा जगदानी ४

२९४३. आधीं देव पाठी भक्त । ऐसें मार्गें आलें चालत ॥१॥ हेंही बोलणेंची वाव । भक्ता आधीं कैंचा देव ॥२॥ भक्त शिरो-

मणी भावाचा । देव लंपट जाला साचा ॥३॥ भक्तासाठीं अवतार । ऐसा आहे निर्धार ॥४॥ वडील भक्त धाकुला देव । एकाजनार्दनीं नाहीं संदेह ॥५॥

२९४४. सप्रेम करितां भजन । नोहे भवाचें बंधन ॥१॥ भक्ताचे आधीन देवो । नाहीं नाहीं हो संदेहो ॥२॥ भक्तीची एवढी गोडी । वैकुंठाहुनी घाली उडी ॥३॥ भक्तामाजी देव असे । देवा-अंगीं भक्त दिसे ४ ऐशी परस्परें मिळणी । शरण एकाजनार्दनीं ॥५॥

२९४५. देव भक्त दोन्ही समची सारखे । पहातां पारिखें न दिसे दुजें ॥१॥ भक्ताचे अंगीं देव असे । देवाचे हृदयीं भक्त वसे ॥२॥ ऐशी परस्परें मिळणी । शरण एकाजनार्दनीं ॥३॥

२९४६. भक्तावांचुनी देवा । कैंचें रूप कैंचें नांवा ॥१॥ भक्तीं धरूनि आवडी । देवा लाविलीसे गोडी २ भक्तावांचुनी पुसे कोण । देवा नाहीं महिमान ॥३॥ भक्तीं करूनि निर्धार । देवा धरविला अवतार ॥४॥ उभयतां नोहे तुटी । एकाजनार्दनीं मिठी ॥५॥

---

२९४७. देव म्हणे भक्तांसी आवडीं । मी झालों तुमचा गडी ॥१॥ सांगाल तें करीन काम । मजवर ठेवा तुमचें प्रेम ॥२॥ भाव मज द्यावा । आणीक मज नाहीं हेवा ॥३॥ आवडीनें देव बोले । भक्ता-माजी स्वयें खेळे ॥४॥ खेळतां गोपाळीं । एकाजनार्दनीं गोकुळीं ॥५॥

२९४८. माझा भक्त मज अंतरीं । मी सदा बाहेरी तिष्ठतसें ॥१॥ ऐशी परस्परें खूण । जाणती तें ब्रह्मज्ञान २ माझी सायुज्यता मुक्ति । घेउनी बळें मीच देती ॥३॥ सायुज्यापरीस भक्ती गोड । एकाजनार्दनीं धरती चाड ॥४॥

२९४९. बहु बोलाचें नाहीं कारण । मी देह भक्त आत्मा जाण ॥१॥ माझा देह शरीर जाण । भक्त आंत पंचप्राण ॥२॥ नांदे सहज भक्त आंत । मी देह भक्त देहातीत ॥३॥ एकाजनार्दनीं भक्त देवपणा मी भक्तांकित ॥४॥

२९५०. नामरूप मज आणिलें जिहीं । त्यांचिया उपकारा नोहे उतराई ॥१॥ भक्ताचे उपकार कशानें फेडी । यालागीं त्याचे उच्छिष्ट काढी ॥२॥ भक्ताचेनी पालटें येतो गर्भवासा । उपकार

उतराई नोहे कैसा ॥३॥ एकाजनार्दनीं उतराई नोहे । यालागीं भक्तासी न विसंबे जीवें ॥४॥

२९५१. मज भक्त आवडता फार । ऐसा माझा निर्धार ॥१॥ भक्ताअंगीं मीच वसें । माझा भक्त मज माजीं असे ॥२॥ मज आणलें नामरूपा । भक्त सखा माझा तो ३ एकाजनार्दनीं निर्गुण । भक्तें सगुण मज केलें ॥४॥

२९५२. तुमचे अप्रमाण होतां बोल । मग फोल जिवित्व माझें ॥१॥ कासया वागवूं सुदर्शन । नाहीं कारण गदेचें ॥२॥ तुमचा बोल व्हावा निका । हेंचि देखा मज प्रिय ॥३॥ मज यावें उणेपण । तुमचें थोरपण प्रकाशूं द्या ॥४॥ एकाजनार्दनीं देव । स्वयमेव बोलती ॥५॥

२९५३. माझी ब्रिदावळी । कदाकाळीं न संडी मी ॥१॥ तुह्मां पडतां अंतर । मज वाटे हुरहूर ॥२॥ तुमची न होतां भेटी । मज दुःख पोटीं अनिवार ॥३॥ अंकित अंकिलों तुमचा । एकाजनार्दनीं सत्य साचा ॥४॥

२९५४. तुह्मांसाठीं उणेपण । स्वयें मजलागून येऊं द्या ॥१॥ प्रतिज्ञा तुमची न्यावी सिद्धी । मधीं उपाधी येऊं नेदी ॥२॥ घेउनी हातीं सुदर्शन । आलें विघ्न निवारीं ॥३॥ दारवंटा राखीन तुमचा । एकाजनार्दनीं साचा ब्रीद माझें ॥४॥

२९५५. देव गूज सांगे भक्तां । अंकित अंकिता तुमचा मी ॥१॥ तुह्मांलागीं अवतार । धरणें साचार मजलागीं ॥२॥ तुह्मां न यावें उणेपण । माझें थोरपण कोण वानी ॥३॥ ह्मणोनि गळां घाली मिठी । एकाजनार्दनीं पडली गांठी ॥४॥

२९५६. भावें करितां माझी भक्ती । मी आतुडें भक्ताहातीं ॥१॥ माझे भक्तीपरतें । साधन नाहीं वो निरुतें ॥२॥ माझे भक्तीचें महिमान । भक्त जाणती सज्ञान ॥३॥ एकाजनार्दनीं भाव । स्वयें बोलतसे देव ॥४॥

२९५७. जो जो कोणी भजनीं बैसे । तेथें मी दिसे तैसाची ॥१॥ उपासनेचा निर्वाहो । सर्वांभूतीं देवाधिदेवो ॥२॥ हो का

माझी प्रतिमा मूर्ति । अंतर्ज्योति मी वसें ॥३॥ तेथें करितां भावें भक्ति । एकाजनार्दनीं मुक्ति तयासी ॥४॥

२९५८. जे भजती मज जैसे । मी ही तया तैसा असे ॥१॥ जयां जैशी पैं वासना । मीही तैसा होय जाणा ॥२॥ हो का माझी प्रतिमा मूर्ति । आदरें करितां माझी भक्ति ॥३॥ मी जनीं असोनी निराळा । एकाजनार्दनीं अवलीला ॥४॥

२९५९. मज जे अनुसरले काया वाचा मनें । त्यांचें चालवणें सर्व मज ॥१॥ ऋणवई त्यांचा अनंत जन्मांचा । जे गाती वाचा कीर्ति माझी ॥२॥ तयांचिया द्वारीं लक्ष्मीसहित । उभा मी तिष्ठत याचकपणें ॥३॥ सर्व जडभारी जाणें योगक्षेम । एकाजनार्दनीं नेम जाणा माझा ॥४॥

२९६०. मजसि जेणें विकिलें शरीर । जाणें मी निर्धारें अंकित त्याचा ॥१॥ त्याचें सर्व काम करीन मी अंगें । पडो नेदीं व्यंगें सहसा कोठें ॥२॥ एकाजनार्दनीं त्याचा मी अंकित । राहें पैं तिष्ठत त्याचे द्वारीं ॥३॥

२९६१. सर्व कर्म मदर्पण । करितां मन शुद्ध होय ॥१॥ न्यून तें चढतें जाण । करी संपूर्ण मी एक ॥२॥ माझ्या ठायीं ठेउनी मन । करी कीर्तन आवडीं ॥३॥ मन ठेउनी माझ्या ठायीं । वसो कोठें भलते ठायीं ॥४॥ एकाजनार्दनीं मन । करा मजची अर्पण ॥५॥

२९६२. साक्षात्कार होतां । साच बद्धता तुरे तत्त्वतां ॥१॥ माझा होतां अनुभव । कल्पनेसी तुरे ठाव ॥२॥ माझे देखतां चरण । संसारची तुरे जाण ॥३॥ माझी भक्ति करितां । दोष तुरेचि सर्वथा ॥४॥ सर्वाठायीं मी वसें । एकाजनार्दनीं भेद नासे ॥५॥

२९६३. भाविकांच्या उदकासाठीं । रमा नावडे गोमटी ॥१॥ भाविकांचें उदक घेतां । मज समाधान चित्ता ॥२॥ भाविकांचे उदकापुढें । मज वैकुंठही नावडे ॥३॥ ऐशी भाविकांची गोडी । एकाजनार्दनीं घाली उडी ॥४॥

२९६४. स्वर्ग नरक ब्रह्मलोक । यांची प्रीति सांडोनी देख ॥१॥ भावें करितां माझी भक्ति । भाविक आपेंआप उद्धरती ॥२॥ गव्हांची राशी जोडिल्या हातीं । सकळ पक्कान्नें त्याचीं होतीं ॥३॥ द्रव्य जा-

हलें आपुले हातीं । सकळ पदार्थ घरां येती ॥४॥ एकाजनार्दनीं बोध । सहज घडे एकविध ॥५॥

२९६५. माझा शरणागत न दिसे केंविलवाणा । ही तों लाज जाणा माझी मज ॥१॥ एकविध भावें आलिया शरण । कर्म धर्म जाण पूर्ण त्याचें ॥२॥ समर्थाचे मुला काय खावयाची चिंता । तैसें मी त्या तत्वता न विसंबें ॥३॥ एकाजनार्दनीं हा माझा नेम । आणीक नाहीं वर्म भावेंविण ॥४॥

२९६६. माझा भक्त मज भीतरीं । मी स्वयें असें तया माझारीं ॥१॥ बहु बोलाचें नाहीं कारण । मी देह तो आत्मा जाण ॥२॥ माझिया भक्तीसी जे लागले । ते मचि होउनी ठेले ॥३॥ एकाजनार्दन अभेद । तया हृदयीं मी गोविंद ॥४॥

२९६७. पूजी माझिया भक्तातें । तेणें संतोष होत मातें ॥१॥ भक्त माझा मी भक्ताचा । ऐसी परंपरा साचा ॥२॥ देवभक्तपण । वेगळीक नाहीं जाण ॥३॥ भक्त जेवतांची धालों । एकाजनार्दनीं लाधलों ॥४॥

२९६८. वमिल्या मिष्टान्ना । परतोनी श्रद्धा न धरी रसना॥१॥ ऐसे आठवतां माझे गुण । मिथ्या ठायीं नसे भान ॥२॥ जेथें कर्माचे परिपाठी । हे तों पुन्हां नये गोष्टी ॥३॥ येव्हडें कथेचें महिमान । एकाजनार्दनीं शरण ॥४॥

२९६९. भावें करितां माझी भक्ति । विषयवासना जळोनि जाती ॥१॥ चालतां माझे भक्तिपंथीं । सकळ साधनें जळोनि जाती ॥२॥ माझिया निजभक्ता । न बाधेचि संसारव्यथा ॥३॥ प्रल्हादा गांजितां जगजेठी । मी प्रगटलों कोरडे काष्टीं ॥४॥ द्रौपदी गांजितां तात्काळीं । कौरवांचीं तोंडें केलीं काळीं ॥५॥ गोकुळीं गांजितां सुरपती । गोवर्धन धरिला हातीं ॥६॥ अर्जुन प्रतिज्ञेचे वेळीं । म्यां लपविला हेळी ॥७॥ अंबऋषीचे गर्भवास । म्यां सोशिले सावकाश ॥८॥ भक्त चरणींची माती । एकाजनार्दनीं वंदिती ॥९॥

---

## भक्तवत्सलता.

२९७०. जीं जीं भक्त बोलती वचनें । तीं तीं प्रमाण करणें देवा ॥१॥ याजसाठीं अवतार । धरी मत्स्य कांसव सूकर ॥२॥

भक्तवचना उणेपण । येऊं नेदी जाण निर्धारें ॥३॥ स्वयें गर्भ-वास सोशी । अंबऋषिकारणें ॥४॥ एकाजनार्दनीं ब्रीद साचा । वागवी भक्ताचा अभिमान ॥५॥

२९७१. अंबऋषिराया पाडिले सायास । सोसी गर्भवास स्वयें देव ॥१॥ उच्छिष्टही खातां प्रायश्चित्त असे । गोपाळाचे ग्रास खाय हरी ॥२॥ एकाजनार्दनीं भक्ताचा अंकित । म्हणोनी तिष्ठत विटेवरी ॥३॥

२९७२. भक्तालागी अणुमात्र व्यथा । ते न साहवे भगवंता ॥१॥ करुनी सर्वांगाचा वोढा । निवारीतसे भक्त पीडा ॥२॥ होउनी भक्ताचा अंकितु । सारथीपणें तो करीतु ॥३॥ प्रल्हादासी दुःख मोठें । होतांची काष्ठीं प्रगटे ॥४॥ ऐसा अंकित चक्रपाणी । एका शरण जनार्दनीं ॥५॥

२९७३. भक्तपणा सान नव्हेरे भाई । भक्ताचे पाय देवाचे हृदयीं ॥१॥ भक्त तोचि देव भक्त तोचि देव । जाणती हा भाव अनुभवी ॥२॥ दान सर्वस्वें उदार बळी । त्याचे द्वार राखे सदा वनमाळी ३ एकाजनार्दनीं मिती नाहीं भावा । देवचि करितो भक्ताची सेवा ४

२९७४. वाहे भक्तांचे उपकार । न संडी भार त्यांचा तो ॥१॥ ह्मणे इहीं थोरपण आह्मां । ऐसा वाढवी महिमा भक्तांचा २ एका-जनार्दनीं कृपाळ । दीनाचा दयाळ विठ्ठल ॥३॥

२९७५. मिठी घालूनियां भक्तां । ह्मणे शिणलेती आतां ॥१॥ धावे चुरावया चरण । ऐसा लाघवी आपण ॥२॥ योगियासी भेटी नाहीं । तो आवडीनें कवळी बाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं भोळा । भक्तां आलिंगी सांवळा ॥४॥

२९७६. देवासी तो आवडे भक्त । नाहीं हेत दुसरा ॥१॥ बळी सर्वस्व करी दान । त्याचें द्वारपाळपण केलें त्वां ॥२॥ धर्म सदां होय उदास । त्याचे घरीं तुझा वास ॥३॥ तुझा भक्त अंब-ऋषी । त्याचे गर्भवास सोशिसी ॥४॥ तुह्मीं उदार जगदानी । शरण एकाजनार्दनीं ॥५॥

२९७७. शुद्ध करूनियां मन । नारायण चिंतावा ॥१॥ मग उणें नाहीं कांहीं । प्रत्यक्ष पाहीं अनुभव ॥२॥ आठवितां उप-

मन्यु बाळ । दिला क्षीरसागर सुढाळ ॥३॥ ध्रुवें चिंतिलें चरणा । अढळपदीं स्थापिलें जाणा ॥४॥ बिभीषणें केला नमस्कार । तया केलें राज्यधर ॥५॥ विष पाजितां पूतना । पाठविली वैकुंठ-सदनां ॥६॥ गणिकेनें आठविलें । तिसी वैकुंठीं बैसविलें ॥७॥ हीनयाती कुब्जादासी । जाहली प्रिय ती देवासी ॥८॥ अर्जुनाच्या भावार्थासाठीं । रथ हांकी जगजेठी ॥९॥ गोपाळांची आवड पोटीं । उच्छिष्टासाठीं लाळ घोटी ॥१०॥ विदुराच्या भक्षी कण्या । तेणें आवडी मानी मना ॥११॥ एका शरण जनार्दनीं । दासां न विसरे चक्रपाणी ॥१२॥

२९७८. अष्टांगयोग साधिती साधनीं । तो हरिकीर्तनीं नाचे बापा ॥१॥ यज्ञादिकीं अवदान नेघे वो माये । तो उभा राहुनि क्षीरापती खाये ॥२॥ पवन कोंडोनि योगी जाती निराकारी । तो हरी धर्माघरीं पाणी वाहे ॥३॥ सनकसनंदन जया ध्याताती आवडी । तो अर्जुनाचीं घोडीं धुतो हरी ॥४॥ एकाजनार्दनीं भक्तांचा अंकीत । ह्मणोनि तिष्ठत विटेवरी ॥५॥

२९७९. देव धांवे मागें न करी आळस । सांडितां भवपाश मायाजाळ ॥१॥ सर्वभावें जे कां शरण रिघती । तयांचें वोझें श्रीपती अंगें वाहे ॥२॥ नको भुक्तिमुक्ति सदा नामीं हेत । देव तो अंकित होय त्यांचा ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसा ज्यांचा भाव । तयां घरीं देव पाणी वाहे ॥४॥

२९८०. देवासी आवडे भक्त समागम । त्याचें सर्व काम करी अंगें ॥१॥ भक्तकाजालागीं अवतार धरी । नांदे भक्तांघरीं स्वयें देव ॥२॥ भक्तांविण देवा कांहींचि नावडे । भक्त तो आवडे सर्व-काळ ३ एकाजनार्दनीं भक्तांचा अंकित । देव सदोदित स्वयें होत ४

२९८१. नातुडे जो योगी ध्याना । तो समचरणा पंढरीये ॥१॥ भोळा सुलभ भाविकांसी । दर्शनें सर्वांसी सारखा ॥२॥ अभेदाच्या न धांवे मागें । भाविकां लागे पाठोपाठी ॥३॥ शुद्ध देखतांचि भाव । एकाजनार्दनीं उभा देव ॥४॥

२९८२. उदार देव उदार देव । नाशी भेव भक्तांचें ॥१॥ प्रऱ्हादाचें निवारी घात । राखिला जळांत अग्नीसी ॥२॥ पांडवांचें करी काम । निवारी दुर्गम स्वअंगें ॥३॥ गौळीयांचीं गुरें राखी । आपण शेखीं एकला ॥४॥ येतां शरण एकपणें । एकाजनार्दनीं ऐसें देणें ॥५॥

२९८३. दयाळु उदार पंढरीराव । भाकितां कींव पुरवी इच्छा ॥१॥ ऐसा याचा अनुभव । आहे ठाव मागोनियां ॥२॥ जे जे होती शरणागत । पुरवी आर्त तयांचें ॥३॥ उपमन्यु ध्रुव बाळ । दिधलें अढळपद त्यांतें ॥४॥ पुराणीं तों व्यासें बहु । वर्णिलें दावूं कासया ॥५॥ एकाजनार्दनीं एकचि भाव । तेणें देव तुष्टत ॥६॥

२९८४. दयेचें धाम नेघे कोणचाही श्रम । हरी वर्णी सप्रेम दृढ निजभावें ॥१॥ प्रसन्न होउनी दिनातें पहातो । आवडी उद्धरितो भाविकांसी ॥२॥ एकाजनार्दनीं भक्तिसी भुलला । म्हणोनि वेडावला भक्तामागें ॥३॥

२९८५. सुपूं लागे सांवत्यासी । न पाहे यातीसी कारण ॥१॥ घडी मडकीं कुंभाराचें । चोख्यामेळ्याचें ढोर वोढी ॥२॥ सजन कसायाचें विकी मांस । दामाजीचा दास स्वयें होय ॥३॥ एकाजनार्दनीं जनीसंगें । दळूं कांडूं लागे आपण ॥४॥

२९८६. देखावया भक्तपण । रूप धरिलें सगुण ॥१॥ तो हा पंढरीचा राणा । वेदा अनुमाना नये तो ॥२॥ भाविकांचें पाठीमागें । धांवे लागें लवलाहीं ॥३॥ खाये तुळशीपत्र पान । न म्हणे सान थोडें तें ॥४॥ एकाजनार्दनीं हरी । आपुली थोरी विसरे ॥५॥

२९८७. दहा अवतार घेत भक्तांचिया काजा । तो हा विटेवरी राजा पंढरीचा ॥१॥ भक्तांचें उणें न पाहे आपण । उच्छिष्ट काढी धर्माघरीं न लाजे जाण ॥२॥ अर्जुनाचीं घोडीं रणांगणी धुतलीं । भक्ता नये उणें कृपेची माउली ॥३॥ एकाजनार्दनीं भक्तांचिया काजा । विटेवरी उभा राहिला सहजा ॥४॥

२९८८. एकपणें एकला दिसे । उभा असे विटेवरी ॥१॥ नेणतीयासाठीं लहान । होय आपण स्वइच्छें ॥२॥ जाणतांचि

लागे चाड । न धरीं भीड तयाची ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । भवमोचन तारक ॥४॥

२९८९. एका घरीं चोरी लोणी । एका घरीं वाहे पाणी ॥१॥ एका घरीं बांधिला राहे । एका घरीं चिमणा होय ॥२॥ एका घरीं ब्रह्मचारी । एका घरीं भोगी नारी ॥३॥ एकाघरीं सुखें नाचे । एका घरीं प्रेम त्याचें४ऐसा व्यापला दोहीं घरीं । एकाजनार्दनीं श्रीहरी५

२९९०. एका द्वारीं द्वारपाळ । एका घरीं होय बाळ ॥१॥ एका घरीं करी चोरी । एका घरीं होय भिकारी ॥२॥ एका घरीं युद्ध करी । एका घरीं पूजा बरी ॥३॥ एका घरीं खाय फळें । एका घरीं लोणी बळें ॥४॥ एका एकपणें एकला । एकाजनार्दनीं प्रकाशला ५

२९९१. एकाचिया चाडें । उगवी बहुतांचें कोडें ॥१॥ म्हणोनी उभा विटेवरी । पाउलें समाचि साजिरीं ॥२॥ एकासाठीं गर्भवास । एकाद्वारीं रहिवास ॥३॥ एका घरीं उच्छिष्ट काढी । एकाचीं रणीं धूत घोडीं ॥४॥ एका द्वारीं भिकारी होय । एका घरीं भाजी खाय ५ एका एकपणें हरी । एकाजनार्दनीं दास्य करी ॥६॥

२९९२. ज्याची प्रतिज्ञा निर्धारीं । देवा हरी आणियेलें ॥१॥ तो हा शांतनूचा रावो । भीष्म देवो संग्रामीं ॥२॥ शस्त्र न धरी ऐसा बोल । साचा केला संग्रामीं ॥३॥ विकळ पडतांची अर्जुन । धरिलें सुदर्शन हस्तकीं ॥४॥ ऐसा कृपेचा कळवळा । एकाजनार्दनीं पाळी लळा ॥५॥

२९९३. भक्त चरणींचे रजःकण । हृदयीं वाहे नारायण ॥१॥ भक्तां पडतां संकट । देव अंगें सोशी कष्ट ॥२॥ गांजितां प्रल्हादा नेहटीं । स्वयें प्रगटला कोरडे काष्ठीं ॥३॥ द्रौपदी गांजितां तात्काळीं । कौरवांचीं तोंडें केलीं काळीं ॥४॥ गोकुळीं गांजितां सुरपती । गोवर्धन धरिला हातीं ॥५॥ अर्जुनातें संकटप्राप्ति । दिवसां लपवी गभस्ती ॥६॥ अंबऋषीचे गर्भवास । स्वयें सोशी हृषिकेश ॥७॥ एकाजनार्दनीं दास । होय भक्तांचा सावकाश ॥८॥

२९९४. कासया साधन तपाचिया हावा । पाचारितां धांवा येतो लवलाही ॥१॥ ऐसा अंकिला धांवे वचानासाठीं । पहा जंग-

जठीं भक्तकाजा ॥२॥ संकटीं पडली गजानंक मिठी । धांवे उठा-उठीं श्रीदासाठीं ॥३॥ अळीकर धोंकुट ध्रुव बैसे वनीं । तयासी तत्क्षणीं अढळ केलें ॥४॥ पडतां संकट द्रौपदी करी धांवा । धांवे लवलाह्या सारुनी ताट ॥५॥ एकाजनार्दनीं भक्तकाज कैवारी । धांवे सत्वरीं आपुल्या लाजा ॥६॥

२९९५. अवरोधें विरोधें करितां हरिभक्ती । सायुज्यता मुक्ति देणें तया ॥१॥ ऐसा कृपाळु लक्ष्मीचा पती । पुराणें वर्णिती महिमा ज्याचा ॥२॥ विष पाजूं आली पूतना राक्षसी । अक्षयपदासी दिलें तिसी ॥३॥ अगबग केशी असुर वधिले । सायुज्यता दिलें पद त्यांसी ॥४॥ एकाजनार्दनीं भक्तांचा कैवारी । ब्रीद हें साचारीं मिरवतसे ॥५॥

२९९६. ज्ञानराजासाठीं स्वयें भिंत वोढी । विसरुनी प्रौढी थोरपण ॥१॥ तो हा महाराज चंद्रभागे तीरीं । कट धरुनी करीं तिष्ठतसे ॥२॥ नामदेवासाठीं जेवीं दहींभात । न पाहे उचित आन दुजें ॥३॥ गोरियाचे घरीं स्वयें मडकीं घडी । चोखियाची वोढी गुरें ढोरें ॥४॥ सांवत्या माळ्यासी खुरपूं लागे अंगें । कबीराचे मागें शेले विणी ॥५॥ रोहिदासासवें चर्म रंगूं लागे । सजण कसायाचें अंगें मांस विकी ॥६॥ नरहरि सोनारा घडूं फुंकूं लागे । दामाजीचा वेगें पाडीवार ॥७॥ जनाबाईसाठीं वेंचितसे शेणी । एकाजनार्दनीं धन्य महिमा ॥८॥

२९९७. भक्तांच्या उपकारासाठीं । नोहे पालट उतराई ॥१॥ ज्ञानोबाची भिंत वोढी । उच्छिष्टपात्रें काढी धर्माघरीं ॥२॥ जेवीं नामदेवासंगें साचें । सुदाम्याचे पोहे भक्षी ॥३॥ विष पितो मिराबाईसाठीं । विदुराच्या हाटीं कण्या स्वयें ॥४॥ एकाजनार्दनीं अंकितपणें । द्वार राखणें बळीचें ॥५॥

२९९८. दासासी संकट पडतां जडभारी । धांवे नानापरी रक्षणार्थ ॥१॥ पडतां संकटीं द्रौपदी बहीण । धांवे नारायण लव-लाहें ॥२॥ सुदामियाचें दरिद्र निवटिलें । द्वारकेतुल्य दिलें ग्राम त्यांसी ॥३॥ अंबऋषीसाठीं गर्भवास सोसी । परीक्षितीसी रक्षी

गर्भामाजी ॥४॥ अर्जुनाचे रथीं होउनी सारथी । उच्छिष्ट भक्षिती गोवळ्याचें ॥५॥ राखितां गोधनें मेघ वरुषला । गोवर्धन उचलिला निजबळें ॥६॥ मारुनी कंसासुर सोडिले पितर । रक्षिले निर्धारें भक्त जन ॥७॥ एकाजनार्दनीं आपुलें ह्मणवितां । धांवे हरी सर्वथा तयालागीं ॥८॥

२९९९. भक्तासी संकट पडतां । धांवे देव तत्त्वतां लवलाहें ॥१॥ ऐसा अनुभव आहे । देव लवलाहें धांवत ॥२॥ द्रौपदी पडतां संकटीं । धांवे उठाउठीं देव तेव्हां ॥३॥ पडतां संकट प्रल्हादासी । कोरडे काष्टेंसी देव जाहला ॥४॥ पडतां संकट गजेंद्रासी । हाकेसरसी उडी घाली ५ एकाजनार्दनीं निर्धार । स्मरतां साचार धांवत ६

३०००. मानी भक्तांचे उपकार । धरी गौळ्याघरीं अवतार ॥१॥ प्रेमें नाना छंदें नाचे । उणें पडों नेदी साचें ॥२॥ अंगें धांव घाली । ऐशी कृपेची माउली ३ एकाजनार्दनीं साचा । देव अंकित भक्तांचा ४

३००१. मानी भक्ताचे उपकार । म्हणोनी धरी अवतार ॥१॥ उच्छिष्ट काढी धर्माघरीं । नीच काम करी गौळ्याचें ॥२॥ अर्जुनाचे रथीं बैसे । सारथ्य सरसें करीतसे ॥३॥ एकाजनार्दनीं अंकितपणें । द्वार राखणें बळीचें ॥४॥

३००२. भाविकांची आवड मोठी । धांवे पाठीं रानोरान ॥१॥ कण्या खाये विदुराच्या । उच्छिष्ट गोवळ्याचें परमप्रिय ॥२॥ उच्छिष्ट फळें भिल्लीणींचीं । खाये रुचीं आदरें ॥३॥ पोहे खाये सुदाम्याचे । कोरडे फके मारी साचे ॥४॥ ऐशी भक्ताची आवडी देवा । एकाजनार्दनीं करी सेवा ॥५॥

३००३. उत्तम अन्न देखतां दिठीं । ठेवी पोटीं जतन तें ॥१॥ तान्हुल्याची वाहे चिंता । जेवीं माता बाळातें ॥२॥ न कळे तया उत्तम कडू । परी परवडु माता दावी ॥३॥ एकाजनार्दनीं तैसा देव । घेत धांव भक्तांघरीं ॥४॥

३००४. वत्साचिये ओढी जैशी । धेनु अपैशी येत घरां ॥१॥ तैसा भक्तांघरीं नारायण । धांवें आपण वोढीनें ॥२॥ मुंगियांच्या घरां मूळ । धाडी समूळ कोण तो ॥३॥ एकाजनार्दनीं देव । घेत धांव आपणचि ॥४॥

३००५. यातीकूळ कांहीं नाणी तो मनासी । धांवे त्याचे पाठीसी लागवेगें ॥१॥ आपुले ह्मणविल्या न देखे पारिखें । रक्षी त्या कौतुकें आपुले काजा ॥२॥ एकाजनार्दनीं पहा अनुभव । धांवतसे देव लवलाहें ॥३॥

३००६. चातकाची ताहान किती । तृप्ति करूनि निवर्वी क्षितीं ॥१॥ धेनु वत्सातें वोरसे । घरीं दुभतें पुरवी जैसें ॥२॥ पक्वान्न सेवूं नेणती बाळें । मातामुखीं घाली बळें ॥३॥ एकाजनार्दनीं बोले । एकपण माझें नेलें ॥४॥

३००७. बाळकाचे छंद जाण । माता पुरविती आपण ॥१॥ बोबडे बोलतां तें बोल । माते आनंद सखोल ॥२॥ मागें जें तें दे आपण । आळ पुरवी त्यासी देऊन ॥३॥ एकाजनार्दनीं ममत्व तें । नोहे लौकिकापुरतें ॥४॥

३००८. भक्तिभावार्थे अर्पिला । देव रावोगीं धरिला ॥१॥ रानींची रानट वनमाला । भक्तीं आणुनी घातली गळां ॥२॥ भक्त अर्पितां आवडी । देव जाणे त्याची गोडी ॥३॥ भक्तभाव जाणोनि पाही । एकाजनार्दनीं राहे देहीं ॥४॥

३००९. देवो विसरे देवपण । अर्पी वासना भक्तांसी ॥१॥ भक्त देहीं सदा वसे । धर्म अर्थ अर्पितसे ॥२॥ जे जे भक्ताची वासना । पुरवी आपण त्याचि क्षणा ॥३॥ एकाजनार्दनीं अंकित । उभा तेथेंचि तिष्ठत ॥४॥

३०१०. जे जे भक्तांची आवडी । तयां संकटीं घाली उडी । वाढवी आपुली आपण गोडी । करी जोडी नामाची ॥१॥ होय तयांचा अंकित । नेणे लहान थोर मात । आपुले आपण पुढें धांवत । न सांगतां करी सर्व ॥२॥ एकाजनार्दनीं कनवाळ । पतितपावन ह्मणवी दयाळ । माता स्नेहें परीस सबळ । भक्तांलागीं स्वयें रक्षी ३

३०११. जे जे वेळे जें जें लागे । तें न मागतां पुरवी वेगें ॥१॥ ऐसा भक्ताचा अंकित । राहे द्वारीं पैं तिष्ठत ॥२॥ आवडी गौळियांची मोठी । गायी राखी जगजेठी ॥३॥ भक्ति भावार्थें भुकेला । एकाजनार्दनीं विकला ॥४॥

३०१२. भक्ता जैसा मनोरथ । पुरवी समर्थ गुरुराव ॥१॥ नित्य ध्यातां तयाचें चरण । करी संसारा खंडन ॥२॥ वानूं चरणाची पवित्रता । उद्धार जडजीवां तत्वतां ॥३॥ अवचट लागतांचि कर । एकाजनार्दनीं उद्धार ॥४॥

३०१३. आम्हां सकळां देखतां । पुरवी लळे तो सर्वथा ॥१॥ जें जें मागावें तयासी । तें तें देतो निजभक्तांसी ॥२॥ न मने अंकिताचा शीण । राहे द्वारपाळ होऊन ॥३॥ घोडें धुतलें रणांगणीं । एका शरण जनार्दनीं ॥४॥

३०१४. अंकित भक्ताचा । नीजकाम करी सांचा ॥१॥ काढी धर्माघरीं । उच्छिष्ट पात्रें निर्धारीं ॥२॥ कुब्जेसी रतला । एकाजनार्दनीं भला ॥३॥

३०१५. भक्ताचिये काजें । देव करितां न लाजे ॥१॥ हा तो पहा अनुभव । उदार पंढरीचा राव ॥२॥ नविचारी यातीकुळ । शुची अथवा चांडाळ ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । एकाभावें निंबलोण ४

३०१६. भक्ताचिया घरीं । नीच काम देव करीं ॥१॥ धर्माघरीं उच्छिष्ट काढी । अर्जुनाची धुतो घोडीं ॥२॥ विदुराच्या भक्षी कण्या । द्रौपदी धांवण्या धांवतु ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । एकपणें जनार्दन ४

३०१७. अंकित अंकिला । देव भक्ताचा पैं जाला ॥१॥ पहा पुंडलीकासाठीं । उभा असे वाळुवंटीं ॥२॥ युगें अठ्ठावीस जालीं । न बैसे अद्यापि तो खालीं ॥३॥ न बैसेची उभा असे । एकाजनार्दनीं भक्ति पिसें ॥४॥

३०१८. भक्त अर्पितां सुमनमाळा । घाली आवडीनें गळां ॥१॥ ऐसा आवडीचा भुकाळू । श्रीविठ्ठल दीनदयाळु ॥२॥ भक्तें भावार्थें अर्पितां । तें आवडे पंढरीनाथा ॥३॥ भक्तासाठीं विटेवर । समपद कटीं कर ॥४॥ ऐशी कृपेची कोंवळी । एकाजनार्दनीं माउली ५

३०१९. पार नाहीं जयाच्या गुणा । तो उभा श्रीपंढरीचा राणा ॥१॥ नवल गे माय भक्तांचेसाठीं । कटीं कर ठेवुनी उभा वाळुवंटीं ॥२॥ न ह्मणे तया कोणते बोल । उगा राहिला

न बोले बोल ॥३॥ एकाजनार्दनीं भक्ताची आस । धरुनी उभा तिष्ठे जगदीश ॥४॥

३०२०. कृपाळूपणें उभा विटेवरी । पाहे अवलोकोनी दृष्टीभरी ॥१॥ न पुरेचि धणी न बैसे खालीं । उभा राहे समचि पाउलीं ॥२॥ युगें जाहलीं नोहे लेखा । एकाजनार्दनीं भुलला देखा ॥३॥

३०२१. भोळा देव भोळा देव । उंच नीच नेणे भाव ॥१॥ चोखियाच्या मागें धांवे । सेले कबिराचे विणावे ॥२॥ खुरपूं लागे सांवत्यासी । उणें येवों नेदी कोणासी ॥३॥ विष पिणें धाउनी जाणें । भाविकाची भाजी खाणें ॥४॥ कण्याची तो आवडी मोठी । एकाजनार्दनीं लाळ घोटी ॥५॥

३०२२. भक्तदरुशनें देव ते तोषती । तेणें आनंद चित्तीं देवाचिये ॥१॥ भक्ताची स्तुति देवासी आनंद । भक्तनिंदा होतां देवा येतसे क्रोध ॥२॥ भक्त संतोषता देवासी सुख । एकाजनार्दनीं देवा भक्तांचा संतोष ॥३॥

३०२३. देव पुजिती आपुले भक्ता । मज वाढविलें ह्मणे उचिता ॥१॥ ऐसा मानी उपकार । देव भक्तीं केला थोर ॥२॥ देवाअंगीं नाहीं बळ । भक्त भक्तीनें सबळ ॥३॥ देव एक देशीं वसे । भक्त नांदती समरसें ॥४॥ भक्ताची देवा आवडी । उणें पडों नेदी अर्धघडी ॥५॥ नाहीं लाज अभिमान देवा । एकाजनार्दनीं करी सेवा ॥६॥

३०२४. भक्त नीच म्हणोनी उपहासिती । त्यांचे पूर्वज नरका जाती ॥१॥ भक्त समर्थ समर्थ । स्वयें बोले वैकुंठनाथ ॥२॥ भक्तासाठीं अवतार । मत्स्य कूर्मादि सूकर ॥३॥ यातिकुळ न पाहे मनीं । एका शरणजनार्दनीं ॥४॥

३०२५. अभेद भजनाचा हरीख । देव भक्त जाहले एक १ कोठें न दिसे भेदवाणी । अवघी काहाणी बुडाली ॥२॥ हारपले देवभक्तपण । जनीं जाहला जनार्दन ॥३॥ देव भक्त नाहीं मात ॥ मुळींच खुंटला शब्दार्थ ४ एकाजनार्दनीं देव । पुढें उभा स्वयमेव ५

३०२६. देव भक्तपणें नाहीं दुजा भाव । एकरूप ठाव दोहीं

अंगीं ॥१॥ दुजेपण नाहीं दुजेपण नाहीं । दुजेपण नाहीं दोही अंगीं ॥२॥ एकाजनार्दनीं देव तेचि भक्त । सबाह्य नांदत एकरूपी ॥३॥

३०२७. देव आणि भक्तां एकचि विचार । दुजें पाहे तयां घडे पातक साचार ॥१॥ वेद आणि श्रुती सांगती पुराणें । देव आणि भक्त एकरूपपणें ॥२॥ एकाजनार्दनीं जया समता दृष्टी । भक्ता पाहातां देवा होतसे भेटी ॥३॥

३०२८. भक्ताविण देवा । कैंचें एकपण सेवा ॥१॥ भक्ताची सेवा देव करी । देव तिष्ठे भक्तद्वारीं ॥२॥ भक्ताचे अंकीत । लक्ष्मीसह देव होत ३ एकाजनार्दनीं भक्त । देवा हृदयीं धरीत ४

३०२९. जेथें जेथें भक्त वसे । तेथें देव नांदे अपैसें ॥१॥ ह्याचि पहा अनुभव । नका ठाव चळूं देऊं ॥२॥ बैसले ठायीं दृढ बैसा । वाचे सहसा विठ्ठल ॥३॥ एकाजनार्दनीं ठाव । धरितां देव हातीं लागे ४

३०३०. वचन मात्रासाठीं । प्रगटला कोरडे काष्ठीं ॥१॥ ऐसी कृपाळु माउली । भक्तासाठीं धांव घाली ॥२॥ कृपेचा कोंवळा । राखे भक्ताचा तो ळळा ॥३॥ एकाजनार्दनीं डोळा । पहा विठ्ठल सांवळा ॥४॥

३०३१. भक्ताची अणुमात्र व्यथा । न सहावे भगवंता ॥१॥ अंबऋषीसाठीं । गर्भवासा येत पोटीं ॥२॥ प्रल्हादाकारणें । राहुख स्तंभीं गुरगुरणें ॥३॥ गोपाळ राखिले वनांतरीं । तेथें उचलिला गिरी ॥४॥ राखिले पांडव जोहरीं । काढिले बाहेरी विवरद्वारें ॥५॥ ऐसा भक्ताच्या अंकित । एकाजनार्दनीं तया ध्यात ॥६॥

३०३२. देव दासाचा अंकित । म्हणोनी गर्भवास घेत ॥१॥ उणें पडों नेदी भक्ता । त्याची स्वयें वाहे चिंता ॥२॥ अर्जुनासाठीं वरी । स्वयें शस्त्र घेत करीं ॥३॥ प्रल्हादाकारणें । स्तंभामाजी गुरगुरणें ॥४॥ बळिया द्वारीं आपण । रूप धरी गोजिरें सगुण ॥५॥ ऐसा अंकित भावाचा । एकाजनार्दनीं साचा ॥६॥

३०३३. शरणागता नुपेक्षी हरी । ऐसी चराचरीं कीर्ति ज्याची ॥१॥ बिभिषणें नमस्कार केला । राज्यधर केला श्रीरामें ॥२॥ उपमन्या दुधाचा पैं छंद । क्षीरसागर गोविंद त्या देतु ॥३॥

ध्रुव बैसविला अढळपदीं । गणिका बैसली मोक्षपदीं ॥४॥ ऐसी कृपेची साउली । एकाजनार्दनीं माउली ॥५॥

३०३४. होउनी भक्तांचा अंकित । पुरवितसे मनोरथ । ऐशी हे प्रचीत । उघड पहा ॥१॥ देव भक्ताचा अंकिला । धांवे आपण न- हिला । भक्ताचिया बोला । उणें पडों नेदी ॥२॥ उपमन्यूचिया काजासाठीं । क्षीरसिंधु भरूनि वाटी लाविली त्याचे होटीं । आपु- ला म्हणोनी ॥३॥ वनीं एकटें ध्रुवबाळ । तयासी होउनी कृपाळ । दिधलें पद अढळ । आपुलीया लाजा ॥४॥ प्रल्हाद पडतां सांकडीं । खांबांतून घाली उडी । दैत्य मारी कडो विकडीं । आपुलिया चाडा ॥५॥ पडतां संकट पांडवासी । जाहला सारथी धुरेरी । मारविलीं बापुडीं कैसी । कौरवें सहकुल ॥६॥ ऐसा भक्ताचिया काजा । धांवे न धरत लाजा । एकाजनार्दनीं दुजा । एकपणें एकटु ॥७॥

३०३५. द्वारकेमाजी श्रीकृष्ण । एकदा करी देवार्चन । उद्धवें कर जोडोन । केला प्रश्न श्रीकृष्णा ॥१॥ सर्व देवांचा तूं देव । ईश्वरा न कळे तुझा भाव । शिणले सर्व ऋषी गणगंधर्व । परी तूं नाकळ सर्वथा ॥२॥ तुह्मी बैसोनि एकांतीं । काय करितां श्रीपती । हें होतें पुसणें माझे चित्तीं । बहु दिवस श्रीहरी ॥३॥ ऐकोनी उद्धवाची मात । तया बोले जगन्नाथ । एकाजनार्दनीं विनवीत । सावधान परियसा ॥४॥

३०३६. ऐके उद्धवा प्रेमळा । सांगतों जीवाचा जिव्हाळा । तूं भक्तराज निर्मळा । शुचित्तें ऐकें ॥१॥ मी बैसोनी आसनीं । पूजा करितों निशिदिनीं । ते पूज्य मूर्ति तुजलागुनी । नाहीं ठाउकी उद्धवा ॥२॥ जयाचेनि मातें थोरपण । वैकुंठादि हें भूषण । तयाचे पूजेचें महिमान । एक शिव जाणे ॥३॥ येरा न कळेचि कांहीं । वाउगे पडती प्रवाहीं । उद्धवा तूं पुशिलें पाही । ह्मणोनी तुज सांगतों ॥४॥ माझें जें आराध्यदैवत । तें कोण ह्मणसी सत्य । भक्त माझे जीवींचे हेत । जाणती ते ॥५॥ तयांविण मज आवड । नाहीं कोणता पोवाड । माझा भक्त मज वरपड । कायावाचा- मनेंसी ॥६॥ माझें विश्रांतीचें स्थान । माझे भक्त सुखनिधान ।

कायावाचा मन । मी विकिलों तयांसी ॥७॥ ते हे भक्त परियेसी । उद्धवा सांगे हृषिकेशी । एकाजनार्दनीं सर्वांसी । तेंचि वदतसे ॥८॥

३०३७. ऐकोनी कृष्णाचें बोलणें । उद्धव संतोषला तेणें । ह्मणे कृपा करुनी मंज दाखवणें । भक्ताचें मंदीर ॥१॥ मग धरूनि उद्धवाचा हात । स्वयें दावी श्रीकृष्णनाथ । आणिकांसी नोहे तें प्राप्त । हरिभक्ताविण ॥२॥ देवें देवघर उघडिलें । सन्मुख उद्धवा बैसविलें । देव सांगतसे वहिलें । तया उद्धवाप्रति ॥३॥ एकाजनार्दनीं प्रेम । भक्ताचें ऐकतां नाम । प्राणी होती निष्काम । अहर्निशीं जपतां ४

३०३८. मुख्य आदिनाथ प्रणवाचें निज । पार्वतीतें बीज उपदेशिलें ॥१॥ सनकसनंदन अत्रि कपिलमुनी । नारदादी शिरोमणी भक्तराज ॥२॥ व्यास आणि वसिष्ठ वाल्मिकादिक । ध्रुव प्रल्हाद देख शिरोमणी ३ एकाजनार्दनीं भक्ताचें महिमान । स्वयें नारायण वाढवित ४

३०३९. उद्धव अक्रूर गोपाळ संवगडे । हनुमंतादीक बागडे भक्त देखा १ गुहक बिभिषण नळ नीळ देखा । ऐशी भक्तमालिका शोभतसे २ एकाजनार्दनीं घेतां त्यांचें नाम । सर्व हरती कामक्रोधादिक ३

३०४०. गोपाळ गौळणी शोभती त्या मूर्ती । तें सुख परीक्षिती संतजन ॥१॥ ऐसे अपरंपार भक्त ते असती । स्वयेंचि श्रीपती दावितसे २ एकाजनार्दनीं भक्ताचा तो मेळ । दावीत सकळ वैभव हरिभक्तां ३

३०४१. पुढें कलीमाजी होणार जे भक्त । ते मूर्तिमंत उद्धव पाहे ॥१॥ पहातां पहातां समाधी उन्मनी । गेलासे बुडोनी सुखामाजी २ एकाजनार्दनीं नाठवेचि कांहीं । देहींचा विदेही होउनी ठेलों ३

३०४२. द्वारकेहुनी धांवणें । केलें पुंडलिकाकारणें ॥१॥ ऐसा कृपाळु उदार । उभा विटे शामसुंदर ॥२॥ न बोले ह्मणोनी पाहे पुढें । चित्त ठेविलें तिकडे ॥३॥ एका ह्मणे जनार्दनीं । धन्य पुंडलीक मुनी ४

३०४३. नाना अवतार घेशी भक्तासाठीं । कृपाळु जगजेठी ह्मणोनियां ॥१॥ मत्स्य कूर्मरूप धरूनियां देवा । साधिलें केशवा भक्तकाज २ एकाजनार्दनीं भक्ताचा कैवारी । गाती वेद चारी तुह्मालागीं ३

३०४४. उतरावया धरा भार । घेतिला अवतार इहीं जगीं ॥१॥ ते हे बळिये रामकृष्ण । केलें कंदन दैत्यासी ॥२॥ केला जो जो

कीर्तिघोष । उच्चारितां निर्दोष होती प्राणी ॥३॥ एकाजनार्दनीं कृपाळु । भक्त स्नेहाळू समर्थ ते ॥४॥

३०४५. उतरावया धरा भार । धरी अवतार कृपाळु ॥१॥ पाळीतसे भक्तलळा । नोहे वेगळा वेगळीक ॥२॥ जया आवडे जें कांहीं । देतां न ह्मणे थोडें कांहीं ॥३॥ पुरवी इच्छा जैसी आहे । मच्छ कच्छ तयासाठीं होय ॥४॥ ऐसा कृपेचा कोंवळा । एकाजनार्दनीं पाहूं डोळा ॥५॥

---

## अद्वैत.

३०४६. नोहे ब्रह्मज्ञान लेंकुरांचा खेळ । अवघाचि कोल्हाळ आशाबद्ध ॥१॥ वाढवुनी जटा ह्मणती ब्रह्मज्ञानी । परी पतना लागुनी न चुकेचि ॥२॥ लावुनी विभूती बांधूनियां मठा । ब्रह्मज्ञान चेष्टा दाविताती ३ माळा आणि मुद्रा लेवुनियां सांग । ब्रह्मज्ञान सोंग दाविताती४एकाजनार्दनीं संत सेवेवीण।ब्रह्मज्ञान खूण न कळेचि५

३०४७. अष्टांग साधन धूम्रपान अटी । ब्रह्मज्ञानासाठीं करिताती ॥१॥ परी तें न लभे न लभे सर्वथा । वाउग्याची कथा बोलताती ॥२॥ शाब्दिकाच्या शब्द कुंठित ते ठायीं । वाउगें कांहीं बाहीं बोलूं नये३एकाजनार्दनीं संतकृपा होतां। ब्रह्मज्ञान तत्वतां घर रिघे ४

३०४८. ब्रह्मज्ञानालागीं ब्रह्मादिक पिसें । तें तुह्मां आह्मां कैसें आकळेल ॥१॥ प्रत्यक्ष परब्रह्म श्रीरामचंद्र । वसिष्ठ मुनींद्र गुरु त्याच्या ॥२॥ कृष्ण बळीराम संदीपना शरण । तेणें गुह्य ज्ञान कथियेलें ॥३॥ प्रत्यक्ष वामांकीं असोनी पार्वती । वेळोवेळां विनंति करीतसे ॥४॥ सुलभ नव्हे देवा सुलभ नव्हे जीवा । सुलभ गौरवा न कळेचि॥५॥ एकाजनार्दनीं श्रीगुरुवांचून । ब्रह्मज्ञान खूण न कळेचि ॥६॥

३०४९. ब्रह्मज्ञानासाठीं वेदशास्त्र पुराण । करितां श्रवण नातुडेची ॥१॥ नातुडेचि कदा गीता भागवती । वाचितां हो पोथी जन्मवरी ॥२॥ द्वारका पट्टन क्षेत्र वाराणसी । करितां तीर्थाटनासी प्राप्त नोहे ॥३॥ प्राप्त नोहे गुरुमंत्र तंत्र घेतां । शब्दज्ञान कथितां प्राप्त नोहे ॥४॥ ज्यासी पुनरावृत्ति स्थिर नोहे बोध । अखंडीत भेद

मनामाजी ॥५॥ ज्याचें जन्मांतर सरूनियां जाये । तेथें स्थिर होय गुरुबोध ॥६॥ एकाजनार्दनीं ऐसा जो का पुरुष । कोटीमाजी एक ब्रह्मज्ञानी ॥७॥

३०५०. ब्रम्हज्ञान वाचें सांगतां नये । जैं कृपा होये श्रीगुरूची ॥१॥ लाभेल लाभेल ब्रम्हज्ञान क्षणीं । वाउगी काहाणी बोलुती काय ॥२॥ हृदयींच बोध ठसतां अंतरीं । कामक्रोध वैरी पळताती ॥३॥ तैसें ब्रम्हज्ञान कळलिया वरी । सर्वभावें वैखरी गुण वानी ॥४॥ एकाजनार्दनीं वंदू गुरुपाय । आणीक उपाय नाहीं नाहीं ॥५॥

३०५१. ब्रह्मज्ञानाची कसवटी । अनुभव नाहीं पोटीं । बोलांची चावटी । वाउगी बापा ॥१॥ शुद्ध ब्रम्हज्ञान । एक आत्मा भूतमात्रीं प्रमाण । विनोदें छळण । कवणाचें न करी ॥२॥ जीव शिवा नाहीं भेद । अवघा नित्य परमानंद । आनंदाचा कंद । तोचि ब्रह्मज्ञानी ॥३॥ एकाजनार्दनीं वर्म । भाविकांसी सुधर्म । अभाविकासी श्रम । जाणीवेचा ॥४॥

३०५२. ब्रम्हज्ञानासाठीं । हिंडताती पाठोपाठीं ॥१॥ नोहे नोहे वा फुकाचें । बोल बोलतां नये साचें ॥२॥ ऐसें आहे तैसें आहे । वाउगा तो भ्रम पाहे ॥३॥ जनार्दन कृपा पूर्ण । तैंचि कळे ब्रम्हज्ञान ॥४॥ एकाजनार्दना शरण । चालून येईल ब्रम्हज्ञान ॥५॥

३०५३. वाउगे ते बोल बोलती चावटी । ब्रम्हज्ञान कसवटी अंगीं नाहीं ॥१॥ संसारीं असोनी अलिप्त नलिनी । तैसा ब्रम्हज्ञानी विरक्त तो ॥२॥ आकाश मंडळीं रवि तो भ्रमला । परि रांझणीं बिंबला नाथिलाचि ॥३॥ एकाजनार्दनीं प्रसादावांचुनी । ब्रम्हज्ञान मनीं न ठसे कधीं ॥४॥

३०५४. अनुतापाविण । नोहे कदा ब्रम्हज्ञान ॥१॥ हें तों मागील रहाटी । अनुताप घ्यावा पोटीं ॥२॥ अनुतापावांचून । कवण तरलासे जाण ॥३॥ अनुताप नाहीं पोटीं । वांयां बोलूं नये गोठी ४ अनुतापावांचून जाण । नाहीं नाहीं ब्रम्हज्ञान ॥५॥ एकाजनार्दनीं अनुताप । होतां निवारे त्रिविधताप ॥६॥

३०५५. निर्गुण निर्विकारु । तोचि जगीं पैं ईश्वरु ॥१॥ नित्य

निर्विकल्प देख । सदा वाहे समाधी सुख २ ऐसें ब्रह्मज्ञान जोडे । तैं गुरुकृपा तेथें घडे ॥३॥ कापूर घातलीया जळीं । स्वयें नुरेची परिमळी ॥४॥ एकपणें तो एकला । एकाजनार्दनीं देखिला ५

३०५६. वर्म जाणे तो विरळा । तयांचीं लक्षणें पैं सोळा । देहीं देव पाहे डोळां । तोचि ब्रह्मज्ञानी ॥१॥ जन निंदो अथवा वंदो । जया नाहीं भेदाभेद । विधि निषेधांचे शब्द । अंगीं न बाणती २ कार्य कारण कर्तव्यता । हें पिसें नाहीं सर्वथा । उन्मनी समाधी अवस्था । न मोडे जयाची ॥३॥ कर्म अकर्माचा ताठा । न बाणेचि अंगीं वोखटा । वाउग्या त्या चेष्टा । करीना कांहीं ॥४॥ शरण एकाजनार्दनीं । तोचि एक ब्रह्मज्ञानी । तयाचे दरुशनीं । प्राणीयासी उद्धार ॥५॥

३०५७. जप तप निष्ठा नेम । ऐसा साधिला दुर्गम ॥१॥ तरी ब्रह्मज्ञान नये हातां । क्रोध भरे अधिक चिता ॥२॥ ब्रह्मज्ञानाची प्रौढी । न घडेचि अर्ध घडी ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । कोठें नाहीं दुजेपण ॥४॥

३०५८. निरपेक्ष निर्द्वंद्व तोचि ब्रह्मज्ञानी । नायकेचि कानीं परापवाद ॥१॥ सर्वदा सबाह्य अंतरीं शुचित्व । न देखे न दावी महत्त्व जगीं वांयां ॥२॥ एकाजनार्दनीं पूर्णपणें धाला । शेजेचा सुराला रसीं उतरे ॥३॥

३०५९. येणेंचि आश्रमें साधती साधनें । तुटती बंधनें यमपाश ॥१॥ काया क्लेश न करणें व्रत तप दान। न लगे हवन तीर्थाटन ॥२॥ संतांचा सांगात गावें रामनाम । सुखें सुख विश्राम लाभे तुजसी ॥३॥ प्रपंच परमार्थ ऐक्यरूपें दोन्ही । तोचि ब्रह्मज्ञानी मनीं समजा ॥४॥ व्यापक तो जगीं व्यापुनी निराळा । एकाजनार्दनीं वेगळा सुख दुःखां ॥५॥

३०६०. भाव अभावना निमाली अंतरीं । वांयां हावभरी नाहीं मन ॥१॥ कामक्रोध ज्याचे दमोनियां गेले । इंद्रियें समरसलीं एके ठायीं ॥२॥ एकपणें सर्व होऊनियां मेळा । रतले गोपाळाचरणीं मन ॥३॥ तोचि ब्रह्मज्ञानी जगामाजी धन्य । एकाजनार्दन चरण वंदी ॥४॥

तिष्ठत ॥३८॥ जेथें राहिले हरि वरिष्ठ । तोचि आश्रम होय श्रेष्ठ । ब्रह्मानंदें पिकली पेठ । ग्राहिक तेथें हरिभक्त ॥३९॥ ऐसें एकादशीचें व्रत । निर्विकल्प जे आचरत । त्याचे घरीं हरि तिष्ठत । कांते सहवर्तमान ॥४०॥ तीर्थव्रताचें पारडें । तुकितां एकादशी पुढें थोडें । तेथेंही जागरण घडे । भाग्य केव्हढें तयांचें ॥४१॥ द्वादशीस शीत मात्र अन्न । तें होय मेरुमंदारासमान । तेथेंही निर्विकल्प ब्राह्मणभोजन । आत्मा गमन तेणें चुके ॥४२॥ द्वादशीच्या अन्नदानीं । देव भक्ताचा जाला ऋणी । यालागीं पैं चक्रपाणी । भक्तवाणी नुलंघी ॥४३॥ द्वादशीचें फळ संधान । अमर्याद पुण्य गहन । कोटीयागांचें श्रेय जाण । निंबलोण करिताती ॥४४॥ द्वादशीच्या ग्रासोग्रासीं । तृप्ति होय यज्ञपुरुषीं । तें फळ लाधलें अंबऋषी । गर्भवासी देव पैं आला ॥४५॥ एवं जालिया पारणें विधी । जो आरंभीं क्षीराब्धी । भक्तामाजी तो आधीं । वैकुंठ पीठीं राहे ॥४६॥ क्षीराब्धीचा प्राप्तकाळ । मिळोनि वैष्णवांचा मेळ । नानापरी करिती गदारोळ । तो सोहळा हरिप्रिय ॥४७॥ एकादशी देव जागरा आला । क्षीरापतिलागीं टोकों लागला । जैसा बुभुक्षू दुकाळला । तैसा वाट पहातसे ॥४८॥ ऐकोनि क्षीरापतीच्या गोष्टी । आवडी देव लाळ घोटी । हरीख न समाय सृष्टीं । उल्हास पोटीं न समाये ॥४९॥ क्षीरापति वाळुवंटीं । संत वैष्णवांची दाटी । देखोनि देवा आवडी मोठी । येत उठाउठीं पै तेथें ॥५०॥ क्षीरापती सेवितां वैष्णव । मुखामाजी मुख घालितो देव । नवल भावार्थाचा भाव । अगम्य पहाहो सुरनरां ॥५१॥ सेवितां क्षीरापतीची गोडी । येरयेरापुढें घालिती उडी । हर्षें नाचतां आवडी । धरिती गोडी उल्हासें ॥५२॥ क्षीरापति घालितां वैष्णवांचे मुखीं । तेणें सुखें देव होय सुखी । धन्य भाग्याचें इहलोकीं । व्रत वोळखी त्या जाली ॥५३॥ पडली वैष्णवाचे पायातळीं । जो सेवी क्षीरापतीची रवाळी । सकळ पापा होय धुळी । हरी जवळी तो पावे ॥५४॥ सेवितां वैष्णवांचें शेष । कलीकल्मषा होये नाश । पायां लागे मोक्षसुख । स्वात्मसुख तो पावे ॥५५॥ यापरी एकादशी । भक्त उद्धरती दोष

पक्षीं । जेथें मोक्षाचिया राशी । तिथित्रया जोडिली ॥५६॥ धरी जरी व्रतासी दृढभाव । तरी सबाह्य प्रगटे देव । करुनी संसार वाव । निजात्म ठाव निजपदीं ॥५७॥ व्रता तपांचें काबाड । सकळ धर्मांचें पुरे कोड । धरलिया एकादशीची चाड । सकळही फळें लाभती ॥५८॥ जो एकादशीचा व्रती । त्यासी तीर्थे पैं सेविती । तेणें पुण्यें भगवत्प्राप्ती । क्षणमात्र न लागतां ॥५९॥ एकादशीच्या उपवासीं । रुक्मांगद सूर्यवंशी । नगरी नेली वैकुंठासी । निज सुखासी पावला ॥६०॥ तैसीच जाणावी द्वादशी । प्रसन्न जाली अंबऋषी । दहा गर्भवास सोशी । उणें भक्तासी येवों नेदी ॥६१॥ ज्यासी असे मोक्षाची चाड । तींहीं नाना साधनें काबाड । सांडोनियां दृढ । व्रत एकादशी करावें ॥६२॥ एकाजनार्दन सांगे । कां शिणाल योगयागें । एकादशीच्या प्रसंगें । देवाचि अंगें लाधला ॥६३॥

## रुक्मांगदाची कथा.

३३६९. ऐका पुण्यपावन व्रताचें महिमान । आचरतां जन दोष जाती ॥१॥ सर्वांमाजी सार व्रत एकादशी । रुक्मांगद सूर्यवंशी करी नेमें ॥२॥ तिथी नेमें व्रत करीत आदरें । पूजन स्मरण जागरे यथाविधी ॥३॥ एकाजनार्दनीं पुण्यपावन व्रत । आदरें आचरत रुक्मांगद ॥४॥

३३७०. कांतीपुरीमाजी राजा रुक्मांगद । एकनिष्ठ शुद्ध पुण्य गांठीं ॥१॥ सहनशीळ दया मूर्तिमंत अंगीं । न भंगे प्रसंगीं सत्त्वधीर ॥२॥ न्यायनीतीं राज्य पाळी ब्राह्मणासी । मूर्तिमंत धर्मासी स्थापियेलें ॥३॥ दीनाचें रक्षण साधूचें पूजन । संतांचें वचन मान्य सदा ॥४॥ एकाजनार्दनीं साधियेला नेम । परि कांहीं कर्म वोढवलें ॥५॥

३३७१. पुण्यवंत जीव भूमी पुण्य देश । श्रीहरीची विशेष भक्ति जेथें ॥१॥ जाणोनियां इंद्र पाठवी विमान । आणवी सुमनें कांतीयेचीं ॥२॥ देवाच्या पूजना सुमनें न मिळतां । राय पाचारीत वनपाळा ॥३॥ सेवक म्हणती सायंकाळीं कांहीं । दिसों येत नाहीं

रात्रीमाजी ॥४॥ रात्रीं जाग्रणा बैसले रक्षक । लाविला व्रतारक अग्नीकाष्ठीं ॥५॥ सावधान ठायीं जागती सर्वही । विमान ते समयीं आलें तेथें ॥६॥ तोडिलीं सुमनें गुप्तरूपें त्यांनीं । विमान तों तेथोनी न चलेची ॥७॥ एकाजनार्दनीं देवदूत कष्टी । न चले त्यांची युक्ति कांहीं केल्या ॥८॥

३३७२. उगवला दिन दूत ते धांवती । सांगती रायाप्रती धरिलें चोरा ॥१॥ उगवले कोटी भानुप्रभा तैसी दिसे । येऊनियां पुसे राजा तेथें ॥२॥ इंद्रें पाठविलें न्यावया सुमनें । तुह्मी पुण्यवंत जाण म्हणोनियां ॥३॥ धन्य ग्राम पुण्यवंत भूमी जन । आह्मा-लागीं विघ्न कां हें आलें ॥४॥ रहावया तुह्मा कोणतें कारण । लागला धूम्र जाण व्रतारकाचा ॥५॥ एकाजनार्दनीं यासी उपाय । पतिव्रता होय एकादशी व्रतीं ॥६॥

३३७३. आणविल्या सर्व गांवींच्या युवती । नुचले कल्पांतीं विमान तें ॥१॥ आतां यासी काय करावा उपाय । येरु म्हणती पाहे ग्रामामाजी ॥२॥ पतिव्रता हो का भलते यातीची । शुद्ध वासनेची एकनिष्ठ ॥३॥ एकाजनार्दनीं घडेल एकादशी । तिचे पुण्य हातीं विमान जाये ॥४॥

३३७४. रात्रीं जाग्रण नामस्मरण चित्तीं । घडली जे तिथी एकादशी ॥१॥ तियेचे हातीं विमानासी गती । चालावया पंथीं वेळ नाहीं ॥२॥ तेव्हां पाचारिल्या अन्य याती नारी । नेणत्या कुमारी होत्या त्याही ॥३॥ तिळभरी नाहीं चालावया रीग । दवंडी पिटी वेगें शीघ्र राजा ॥४॥ एकाजनार्दनीं निघालिया सर्व । तों तेथें अपूर्व नवलाव ॥५॥

३३७५. तरुणी रजकी नूतन यौवनीं । बैसली रुसुनी एकांतासी ॥१॥ धुंडुनियां मातें धाडी सासुरिया । तों म्हणे मी राया ऐसा नोहें ॥२॥ येरी म्हणे मी तों कुळींची निर्दोष । शुद्ध माझा वंश रजकाचा ॥३॥ ऐकिला संवाद दौंडी करें त्याचा । आणि विनोदाचा समाचार ॥४॥ एकाजनार्दनीं धाऊनियां दूत । रायासी तो मात सांगताती ५

३३७६. पाठवुनी दूत आणविलें तिसी । विस्मयो सर्वांसी

होत जाला ॥१॥ साशंकीत राजा लावीं म्हणे हात । विमान क्षणांत उचालिलें ॥२॥ धन्य म्हणे राजा ही माझी प्रजा । रजकाची भाजा धन्य जाली ॥३॥ सांगे सकळांसी एकादशी करा । हरिदिनीं जागरा निजूं नका ॥४॥ एकाजनार्दनीं सांडोनी अभिमान । तेव्हांची कारण साध्य होय ॥५॥

३३७७. निर्धारें नेमेंसी करी एकादशी । तृणजीवन पशूंसी घेऊं नेदी ॥१॥ राष्ट्रमाजी रूढी केली हरिभक्ती । दया सर्वांभूतीं समानची ॥२॥ हरिकीर्तनाच्या भरियेल्या रासी । भेदीत आकाशीं पुण्य जाये ॥३॥ मध्यें आला कांहीं व्रता अंतराय । अपाय तो पाहें मोहनीचा ॥४॥ एकाजनार्दनीं होतां स्त्री संग । नेमा होय भंग तात्काळीक ॥५॥

३३७८. भुलविला राजा लावण्याच्या तेजें । नेम व्रतराज खोळंबिला ॥१॥ राजपत्नीपुत्र नाम धर्मांगद । चालवी सुबुद्ध एकादशी ॥२॥ बहुदिन होतां न कळे रायासी । मोहोनियां पाशीं बांधियेला ॥३॥ पुढें आली जाणा तेव्हां हरिदिनी । लोकांलागीं राणी सांगताहे ॥४॥ धेंडा पिटविला श्रीहरि जागरु । करा निरंतरु निजूं नका ॥५॥ एकाजनार्दनीं नृपें ऐकिलें कानीं । धिग् म्हणोनी प्राणी जन्मा आलों ॥६॥

३३७९. उतरला तळीं टाकियेली शय्या । स्नान केलें तया शीतोदकें ॥१॥ बैसे घालोनियां तृणाचें आसन । सारी नित्यनेम यथाविधी ॥२॥ नेम भंग जाला वर्जिली मोहिनी । नायके तो ध्यानीं बैसलासे ॥३॥ एकाजनार्दनीं अनुतापावांचून । न घडे नामस्मरण काळत्रयीं ॥४॥

३३८०. अनुतापें करी नामस्मरण वाचे । तंव मोहिनी येउनी साचे कर धरी ॥१॥ आडवी मोहिनी उगवतां दिन । सत्त्वाचें हरण करूं पाहे ॥२॥ मज दिली भाक उगवली आजी । प्रतिज्ञा हे माझी खरी जाली ॥३॥ देई मज आज्ञा सोडीं का उदक । सुकृत सम्यक व्रताचें तें ॥४॥ चिंतावला राजा मागे म्हणे पाटलासी । इच्छिले पदार्थांसी देईन मी ॥५॥ येरी म्हणे तुझा कुळींचा

दीपक । तो देई सम्यक मजलागीं ॥६॥ नाहीं चाड मज पदार्थी अनेकां । कापोनियां दे कां मस्तकासी ॥७॥ एकाजनार्दनीं राजिया संकट । न सुचे आणीक कांही तया ॥८॥

३३८१. धांवें देवा तूं निर्वाणीं । तुजविण नाहीं कोण्ही ॥१॥ भुली पडली विषयसुखें । पाल जालों महादुःखें ॥२॥ विसरलों हित । नेणें बुडालें स्वाहित ॥३॥ एकाजनार्दनीं । भुललोंसे नाहीं कोण्ही ४

३३८२. मात कळो सरे पत्नीपुत्रां वेगें । पातलींसे दोघें रायापाशीं ॥१॥ गोंवियला राजा दिसे वेडा झाला । रानीं बोले तिला माग काई ॥२॥ येरी ह्मणे शीर तुझिया पुत्राचें । आपुलीये वाचे रायें दिलें ॥३॥ एकाजनार्दनीं मोहिनीचा शब्द । ऐकोनीं धर्मांगद काय बोले ॥४॥

३३८३. पित्याचिये काजा देह हें वेचावें । तेव्हांची बरवें दिसे लोकीं ॥१॥ सरसावला पुत्र ह्मणे मातेप्रती । वांचवी भूपती सत्त्वाहातीं ॥२॥ तोपेल श्रीपती मज ऐसे किती । पुत्र तुझा होती सत्त्वधीर ॥३॥ एकाजनार्दनीं सत्त्वाचा आगळा । प्रिय तो गोपाळा तोचि एक ॥४॥

३३८४. वोडवोनि मान आला रायापाशीं । निर्भय मानसीं धर्मांगद ॥१॥ घेऊनियां शस्त्र स्मरला अच्युत । उभारिला हात मारावया ॥२॥ अंतकाळीं केल्या देवाचें स्मरण । तेव्हां नारायण धांव घाली ॥३॥ धरियेला हात माथां ठेवी कर । ह्मणे माग वर मज कांहीं ॥४॥ एकाजनार्दनीं नाम आलें मुखा । पांडुरंग सखा होय त्याचा ॥५॥

३३८५. आश्वासिलें भक्ता दिलें सर्व सुख । बैसविले लोक विमानांत ॥१॥ नारीनर पशु जीवजंतु भूतें । विमानीं समस्तें बैसविलीं ॥२॥ पातली मोहनी ह्मणे देवराया । सांडिसी कां वांयां मजलागीं ॥३॥ कोण अपराध घडलासे मज । दीनानाथ साजे नाम तुझा ॥४॥ इंद्र आज्ञेमुळें छळियेलें राया । एकाजनार्दनीं पायां लागतसें ॥५॥

३३८६. आली कृपा तिची दिधलासे वर । राहें निरंतर

मृत्युलोकीं ॥१॥ पुढें हरिदिनी जे कोण्ही करिती । द्वादशीसी घेती निद्रा कांहीं ॥२॥ त्याचें पुण्य फळ तुजलागीं प्राप्त । हो कां जरी आप्त मज प्रिये ॥३॥ तया पुण्यें तुझा होईल उद्धार । देऊनियां वर ठेवियेली ॥४॥ एकाजनार्दनीं उक्ती हे भागवतीं । तुह्मां सर्वांप्रती निवेदिली ॥५॥

३३८७. सकळ नगरी वाहिली विमानीं । वैकुंठभुवनीं पावविली ॥१॥ करा एकादशी जागर कीर्तन । द्वादशी भोजन द्विज पंक्ती ॥२॥ दिवसा सावध हरीचें चिंतन । रात्रीं जागरण कीर्तन सार ॥३॥ एकाजनार्दनीं साधावें हें व्रत । तेणें मोक्ष प्राप्त अर्धक्षणीं ॥४॥

३३८८. व्रतामाजी व्रत एकादशी पावन । दिंडी जाग्रण देवा प्रीय ॥१॥ अष्टही प्रहर हरिकथा करी । वाचे विठ्ठल हरी वदोनियां ॥२॥ टाळ मृदंग वाजती गजरें । विठ्ठल प्रेमभरें नाचतुसे ॥३॥ एकाजनार्दनीं व्रताचा छंद । तेणें परमानंद सुख पावे ॥४॥

३३८९. आषाढी पर्वकाळ एकादशी दीन । हरिजाग्रण देवा प्रीय ॥१॥ निराहारें व्रत जो करी आवडी । मोक्ष परवडी त्याचे घरीं ॥२॥ व्रत आचरती हरिकथा करिती । नामघोष गाती आवडीनें ॥३॥ प्रदक्षणा तीर्थ आदरें सेविती । पूर्वज ते जाती वैकुंठासी ॥४॥ पुंडलिकाचें दरुशन चंद्रभागे स्नान । विठ्ठल दरुशनें धन्य होती ५ एकाजनार्दनीं ऐसा ज्याचा नेम । तया सर्वोत्तम नुपेक्षीतो ६

३३९०. एकादशी एकादशी । जया छंद अहर्निशीं ॥१॥ व्रत करी जो नेमानें । तया वैकुंठींचें पेणें ॥२॥ नामस्मरण जाग्रण । वाचे गाय नारायण ॥३॥ तोचि भक्त सत्य साचा । एकाजनार्दन ह्मणे वाचा ॥४॥

३३९१. व्रत जे करिती तया जे निंदिती । त्यांचे पूर्वज जाती नरकामधीं ॥१॥ भाळे भोळे भक्त वेडें वांकुडें गाती । तया जे हांसती ते श्वानसम ॥२॥ स्वमुखें देव आवडीनें सांगे । तयाचिया मागें हिंडे देवो ॥३॥ एकाजनार्दनीं भोळा देव । भक्ताचा गौरव करीतुसे ॥४॥

३३९२. दशमी व्रताचा आरंभु । दिंडी कीर्तन करा समारंभु १

तेणें तो स्वयंभु । संतोष पावे ॥१॥ एकादशी जाग्रण । हरिपूजन नामकीर्तन । द्वादशी क्षीरापती जाण । वैष्णव जन सेविती ॥२॥ ऐसें व्रत तीन दिन । करी जो आदरें परिपूर्ण । एकाजनार्दनीं बंधन । तया नाहीं सर्वथा ॥३॥

३३९३. क्षीरसागरींचें नावडे सुख । क्षीरापती देख देव आला ॥१॥ कवळ कवळ पहाहो । मुख पसरुनी धांवतो देवो ॥२॥ एकादशी देव आला । क्षीरापतीलागीं टोकत ठेला ॥३॥ द्वादशी क्षीरापती ऐकोनी गोष्टी । आवडी देव देतसे मिठी ॥४॥ क्षीरापती घालितां वैष्णवा मुखीं । तेणें सुखें देह होतसे सुखी ॥५॥ क्षीरापती सेवितां आनंदु । स्वानंदें भुलला नाचे गोविंदु ॥६॥ क्षीरापती सेवितां वैष्णवा लाहो । मुखामाजी मुख घालितो देवो ७ क्षीरापती चारा जनार्दन मुखीं । एकाएकीं तेणें होतसें सुखी ८

३३९४. रुक्मांगदाकारणें एकादशीचा छंद । तेणें परमानंद प्रगटला ॥१॥ अंबऋषीकारणें द्वादशीचा छंद । तेणें परमानंद प्रगटला ॥२॥ प्रल्हादाकारणें हरिनामाचा छंद । तेणें परमानंद प्रगटला ॥३॥ एकाजनार्दनीं एकविध छंद । तेणें परमानंद प्रगटला ४

३३९५. मागें संतीं सांगितलें । तें हें आलें फळासी ॥१॥ जावें शरण विठोबासी । मग सुखासी काय उणें ॥२॥ करावें व्रत एकादशी । द्वादशी क्षीरापती सेवन ॥३॥ नेमें जावें पंढरीसी । तेणें चौऱ्यांयशीं चुकती ॥४॥ एकाजनार्दनीं हेंचि सार । वांयां भार कासया ॥५॥

३३९६. नामस्मरण हरिकीर्तन । एकादशी व्रत हरिजाग्रण । द्वादशी क्षीरापती सेवन । सुकृता त्या पार नाहीं ॥१॥ घडतां तिन्ही साधन । कलिमाजी तो पावन । त्याच्या अनुग्रहें करून । तरती जन असंख्य ॥२॥ एकाजनार्दनाची भाक । पुन्हां जन्म नाहीं देख । साधन आणिक । दुजें नको करणें ॥३॥

३३९७. करा हरिभक्ति संतांचें पूजन । व्रत एकादशी रात्रौ जाग्रण । वासुदेव नामाचें मुखीं उच्चारण । तेणें न होय बंधन यमाचें ॥१॥ रामकृष्ण वासुदेव वदे । रामकृष्ण वासुदेव ॥ध्रु०॥ नित्य वाचे नामावळी । वदेवदे सर्व काळीं । पातकांची होळी ।

क्षणमात्रें होईल ॥२॥ जनांसी तारक वासुदेव नाम । आणीक नको साधन वांयांचि नेम । गायें तूं सुखें जनीं जनार्दन । एकाभावें वंदी एकाजनार्दन ॥३॥

---

## तुळशीमाहात्म्य.

३३९८. वैकुंठाहुनी आली । धन्य तुळशी माउली ॥१॥ वंदिती जया हरिहर । सर्व करिती नमस्कार ॥२॥ देव इंद्रादिक सर्व । तुळशी पूजनें गौरव ॥३॥ ऐशी तुळस माउली । एकाजनार्दनें वंदिली ॥४॥

३३९९. धन्य तुळशीचा महिमा । नाहीं आणीक उपमा ॥१॥ प्रातःकाळीं दरुशन । घडतां पुण्य कोटीयज्ञ ॥२॥ नाम वदतां हे तुळशी । इच्छिलें पुरवी मानसीं ॥३॥ तुळशीनामाचा निजछंद । एकाजनार्दनीं आनंद ॥४॥

३४००. तुळशीचें पान । एक त्रैलोक्या समान ॥१॥ उठोनियां प्रातःकाळीं । वंदी तुळशी माउली ॥२॥ मनींचे मनोरथ । पुरती हेंचि सत्य ॥३॥ तुळशीचे चरणीं । शरण एकाजनार्दनीं ४

३४०१. तुळशी काष्ठाची माळ । गळां घालावी निर्मळ ॥१॥ होतां एकचि स्नान । सर्व तीर्थांचें मार्जन ॥२॥ नित्य वंदितां तुळशी । काळ पळे देशोदेशीं ॥३॥ तुळशीचें पाणी । वसे त्रैलोक्य चरणीं ४ एकाजनार्दनीं ध्याऊं । नित्य पाहूं तुळशीसी ॥५॥

३४०२. तुळशी तुळशी ऐसें नाम । वदतां हरे क्रोधकाम ॥१॥ नाहीं आणीक साधन । एक पूजन तुळशीचें ॥२॥ न लगे तीर्थाटना जाणें । नित्य पूजणें तुळशीसी ॥३॥ योगयाग न लगे कांहीं । तुळशीवांचुनी देव नाहीं ॥४॥ तुळशीचे ठायीं वसे । एकाजनार्दनीं देव भासे ॥५॥

३४०३. देवासी प्रिय तुळशीपान । नोहे कारण यज्ञाचें ॥१॥ संतुष्ट होय नारायण । तुळशीपत्रें पूर्ण अर्पितां ॥२॥ पूजा धूपदीप सर्व उपचार । अर्पितां तुळशीचें पत्र ॥३॥ एकाजनार्दनीं शरण । तुळशीपाशीं नारायण ॥४॥

३४०४. जोडोनियां पाणी । वंदा तुळशी निशिदिनीं ॥१॥ द्वारीं घालुनी वृंदावन । वरी तुळशी बीजारोपण ॥२॥ तया घालितां हो पाणी । पाप जुरेची मेदिनी ॥३॥ तुळशीची सेवा । एकाजनार्दनीं देवा ॥४॥

३४०५. देव तुष्टे एकपानीं । सहस्रपानीं देतुसे ॥१॥ पुरे एक तुळशीपान । नाहीं आणीक कारण ॥२॥ जन्म जन्मांतरींची सेवा । फलद्रूप होय देवा३पूजनाचे भावें जाण । एकाजनार्दनीं तुष्टे आपण ४

३४०६. कोणे एके दिनीं । तुळशी घालितां वो पाणी ॥१॥ देव मानी त्याचा भार । तोडितसे वेरझार ॥२॥ शीणभाग कांहीं । तया श्रेऊं देत नाहीं ॥३॥ ऐसा कृपाळू जनार्दन । एका वंदितसे चरण ॥४॥

३४०७. तुळशी वंदितां मस्तकीं । धन्य धन्य तिहीं लोकीं १ तुळशी करतां नमस्कार । उतरे पार संसार ॥२॥ तुळशीचें नाम घेतां । हरे भवभयाची चिंता ॥३॥ तुळशीचा करतां जप । जुरे पाप जन्मांतरींचें ॥४॥ तुळशीची करतां सेवा । होय देवा प्रीय तो ॥५॥ तुळशीचें अनुष्ठान । एकाजनार्दनीं शरण ॥६॥

३४०८. कलीमाजी सोपा । तुळशी तुळशी मंत्र जपा ॥१॥ नका खटपट आणीक । तुळशी नामें उत्तम देख ॥२॥ आवडीं धरुनी नाम घोका । ह्मणे जनार्दनीं एका ॥३॥

३४०९. पाहूं गेलों तुळशी वन । वृंदावनीं जनार्दन ॥१॥ मूळ डाळ पाहतां पान । तुळशी वास जनार्दन ॥२॥ तुळशीविण कोठें जावों । तुळशीमाजी दिसे देवो ॥३॥ एकाजनार्दनीं भावो । तुळशी जाला कृष्ण रावो ॥४॥

३४१०. तुळशी पाहतां आपोआप । सहज जाय पापताप ॥१॥ तुळशी सेवा रे जननी । जे पढिये जनार्दनीं ॥२॥ करितां प्रदक्षणा मनें । भवरोगा उपशमन ॥३॥ मुळीं निक्षेपितां जळ । कळिकाळा सुटे पळ ॥४॥ जिचे लागतां सिंतोडे । कर्माकर्म समूळ उडे ॥५॥ भावें करितां पूजन । भगवंतीं होय समाधान ॥६॥ मुळीं मृत्तिका कपाळीं । जन्ममरणा होय होळी ॥७॥ सेवी एकाजनार्दन । तुळशी सबाह्य हरी पूर्ण ॥८॥

३४११. धन्य भाग्याचे नारीनर । तुळशी नमस्कार करती ते १ घेतां त्यांचें दरुशन । नोहे पतन पूर्वजां २ नाम जप अहर्निशीं । यम पळे भिउनी त्यांसी ३ ऐसा माहिमा तुळशीचा । एकाजनार्दनीं साचा ४

---

# सत्यभामाव्रत.

## कृष्णदान.

३४१२. कृष्ण सर्वांगीं सुंदर । लावण्य गुण रत्नाकर । सत्यभामा ह्मणे हा वर । जन्मोजन्मीं पावावा ॥१॥ ऐसें विचारिती मनीं । तंव पातले नारदमुनी । चरणां लागली धांवोनि । वरासनीं बैसविले ॥२॥ ऐका विनोद कथा विचित्र । नारद सत्यभामेसीं सांगत । दान दिधलिया कृष्णनाथ । सोडवूं आतां ते नेणें ॥३॥ करूनि षोडशोपचार पूजा । मग ह्मणे जी योगीराजा । तुह्मांसारिखा न देखे दुजा । परियेसीं माझा निर्धारू ॥४॥ मज मनीं ऐसा भावो । जन्मोजन्मीं कृष्ण नाहो । पावावया सुगम उपावो । व्रतें तपें कीं दानें ॥५॥ ऐकोनि हांसे नारदमुनी । ह्मणे हे नाहीं मिनली कृष्ण मिळणी । म्हणोनि जन्मजन्मांतर सोसणी । विषयबुद्धि करीतसें ॥६॥ पाहूनि अधिकाराचा भेदु । तैसाचि उपदेश करिती साधु । इचा झडे गर्व मदु । तैसा विनोद करूं आजी ॥७॥ ह्मणती दिधल्यावांचून नाहीं पावणें । ऐसें बोलती पुराणें । येविषयीं स्मृतिवचनें । पूर्वदत्तें पाविजे ॥८॥ जरी हा कृष्ण दानासी देसी । तरी जन्मोजन्मीं पावसी । हें जरी मानेल मानसीं । तरी कृष्ण दानासीं तूं देईं ॥९॥ सत्यभामा ह्मणे कृष्णासी । तुह्मांसी देईन दानासी । हें जरी मानेल मानसीं । तरी आज्ञा मज द्यावी ॥१०॥ ऐकोनि हासिन्नले देवो । ह्मणे नारदें विंदान मांडिलें पहा हो । जाणोनि तियेचा अभिप्रावो । धन्य भावो प्रिये तुझा ॥११॥ ह्मणे तुझी प्रीति मज बहु । तुज मनीं जैसा जिऊ । तुज तैसा भाऊ । भीमकी मैं नाहीं ॥१२॥ दाना न करीं वो उशीरू । आजिचा पर्वकाळ थोरू । शुद्ध सप्तमी रविवारु । मकरीं सूर्या गुरुयुक्त ॥१३॥ सत्यभामा ह्मणे ब्राह्मणासी । तुह्मासी कृष्ण देईन दानासी । ते ह्मणती गिळील

अनुष्ठानासी । ध्येय ध्यानासी उच्छेदु ॥१४॥ जेणें हिरोनि परात्पर नोवरी । येणें घातली निजमंदिरीं । अहं मामा जीवें मारी । अकर्मैं करी हा कृष्ण ॥१५॥ आह्मी भिक्षुक ब्राह्मण । कृष्णासी पाहिजे मिष्टान्न । कैंचे पीतांबर परिधान । आम्हीं तयासी पुरवावें ॥१६॥ तो सदाचा परदारीं । कर्मैं तितुकीं अकर्मैं करी । विटाळ न व्हावा-याचा घरीं । आम्हां सोंवळें स्वयंपाकीं ॥१७॥ सत्यभामा ह्मणे नारदासी । ब्राह्मण दान न घेती कृष्णासी । काय करूं वो देवऋषि । तूं दानासी अंगिकारीं ॥१८॥ म्हणवुनी धरिले दोनी चरण । कृष्णदानासी तूं पात्र धन्य । आजीचें मानावें वचन । व्रत जेणें परिपूर्ण होय ॥१९॥ नारद ह्मणे भले आतां । व्रतेंतपेंविण कृष्ण ये हातां । कवण सरे मागुता । कर्म करंटा कार्मिष्ठु ॥२०॥ सेवकापदीं स्वामी ठावो । सेवेचा सेवक होइल देवो । न कळे दोहींचा अभिप्रावो । येरी लवलाहो दानाचा ॥२१॥ सत्यभामेनें श्रीकृष्ण । आणिला सालंकृत शृंगारून । आपुलेनि पल्लवें झांकून । नारदा करीं देतसे ॥२२॥ येरी ह्मणे प्रतिग्रहिताम । प्रतिग्रण्हामीं नारद म्हणतां । नमामी म्हणोनि कृष्णनाथा । मग संकल्पें घातला ॥२३॥ नारद ह्मणे रे कृष्णा । बोध बांधुनी घेईं ब्रह्मविणा । तुटों नेदी मुळींच्या खुणा । जिवींचा जिव्हाळा राखावा ॥२४॥ पैल माझिया सिद्ध पादुका । सावधानें जवळी घे कां । येरें वंदिलिया मस्तका । ब्राह्मणाच्या ह्मणवुनी ॥२५॥ अरे हे देवपूजा घेऊनि खांदीं । माझी बांधोनियां त्रिशुद्धि । बोधें बांधूनियां बुद्धि । अलिप्तपणीं वागवावी ॥२६॥ ओंवळेपणें नातळे क्षिती । विटाळ न व्हावा महाभूतीं । पाउला पाउलीं आत्मस्थिति । देव निगुतीं आणावो ॥२७॥ पुढें चालिला नारद । मागें मागें गोविंद । येरू ह्मणे करी मंदमंद । गृहसंबंध न सुटे ॥२८॥ नेणसी वैराग्याची ओढी । सांडीं स्त्रीपुत्राची गोडी । देहगेहाची आवडी । ते खोडी मज नावडे ॥२९॥ नारद ह्मणेरे कृष्णा । शौचविधीसी उदक आणा । मृत्तिका अवलोकुनी नयना । जीवेंविण आणावी ॥३०॥ येरू ह्मणे न दिसे जीऊपद । अवघे भूमंडळींची शुद्ध । क्रोधेंविण कोपला

नारद । वेद विरोध बोलतसे ॥३१॥ अरे हे असीं ब्रह्मचर्याची कसोटी । जीवा जीवनें प्रक्षाळिली गोमटी । सोंवळें पाहोनियां दृष्टी । वरी वाळे घालावी ॥३२॥ येरू ह्मणे न दिसे वोवळें । अवघें त्रिभुवनाचि सोंवळें । विकल्प कल्पना विटाळें । शुद्धासी मळ ह्मणताती ॥३३॥ कृष्णें केले नारदाचे चरण क्षालन । तें तीर्थ मुखीं मस्तकीं वंदून । हृदयीं धरिलें आलिंगून । श्रीवत्सलांछनाहुनी आध ॥३४॥ कृष्णें तीर्थाचें केलें वंदन । कृष्णतीर्थाचें जन्मस्थान । तोहि करी ब्राह्मणपूजन । धरा अमर पूजीजे ॥३५॥ कृष्ण चुरी नारदाचे चरण । ह्मणे मी आजी धन्य धन्य । तुह्मांसी दधिलें दान । परम पावन मी झालों ॥३६॥ अलक्ष दोघांचें महिमान । कवणस्वामी सेवक कोण । ब्रह्मादिकां न कळे जाण । विस्मित जन द्वारकेचे ॥३७॥ जन ह्मणती हा नारद जाण । आह्मां देखतां वंदी श्रीकृष्ण चरण । त्यास हाता आलिया कृष्ण । येणें माणुसपणा सांडियलें ॥३८॥ नीच सेवकाची गती । सेवा घेतो कृष्णा हातीं । बाईलेच्या भिडा श्रीपती । नारद हातीं सांपडला ॥३९॥ नारद कृष्णासी नेतां दुरी । सत्यभामा रुदन करी । अंतरले श्रीहरी । जन्मांतरीं कोण पावे ॥४०॥ नारदें ठकिलें ठकिलें गे फुडी । मजचि बुद्धि ठाकी कुडी । युगासमान जातसे घडी । अति चरफडी मीन जैसी ॥४१॥ सत्यभामेच्या मंदिरीं । मिळाल्या सोळा सहस्र नारी । भली प्रवर्तली सवती मत्सरी । आपणया आपण नाडियेलें ॥४२॥ नाक कापुन आपुलें । वैरियां अपशकुन केलें । तें तुवां साच दाविलें । दाना दिधले निजपती ॥४३॥ मग बोलली नागर जयंती । तुवां आखली आणिली आह्मां भोंवतीं । अवघियां श्रेष्ठ जांबुवंती । जाली सवती तुझेनी ॥४४॥ कृष्णाअंगीं लागली चोरी । सामास घातला विवरीं । आस्वला वरपडा केला श्रीहरीं । पूर्वं वोळखी वांचला ॥४५॥ तंव बोलली मित्रवृंदा । तुझी दुष्टबुद्धि गे सदा । भोगणें सांडूनियां परमानंदा । आजन्मांतर पर इच्छीसी ॥४६॥ अहंभावें सोहं धरणी । तुवां भांडविला सारंगपाणी । कृष्ण पडिला विकल्पा वाणीं । कुडी तूं धरणीं लोळसी ॥४७॥ आजी सदाच्या

समभाग । तेणें उमजला श्रीरंग । भेदुनी अहंभावाचें अंग । वरासनीं श्रीकृष्ण ॥४८॥ तेणें परणिल्या अनंत शक्ती । सोळा सहस्र आणिल्या सवती । हे तंव तुझीच ख्याती । न लाजसी चित्तीं निर्लज्जे ॥४९॥ मग बोलिली लक्ष्मणा । थोर भुलली गे देहाच्या बरवेपणा । केली जन्मांतर तृष्णा । ते तंव कृष्णासी नावडे ॥५०॥ आजन्म न जन्मे श्रीहरी । कैंचा पावसी जन्मांतरीं । नाडलीस दोहींपरी । येथें ना तेथेंसें जालें तुज ॥५१॥ तंव बोलिली कालिंद्री । तुझी दृष्टी गे देहबुद्धी । कृष्ण परमात्मा त्रीशुद्धि । मन बुद्धी नातळे ॥५२॥ त्यासी तूं गे निजकल्पना । आणूं पहासी जन्मबंधना । तुझी तुज गे फळली वासना । दुष्ट बुद्धि ॥५३॥ हांसोनि बोलिली जांबुवंती । जैसा घटामाजी गभस्ती । असोनि अलिप्त चित्तीं । तैसा श्रीपती विषयासी ॥५४॥ भोग भोगुनी अभोक्ता । कर्म करुनी अकर्ता । त्यासी कैंची जन्म कथा । कृष्ण सर्वथा अजन्म ॥५५॥ हा साक्षात्पर ब्रह्म जाण । चिन्मात्रैक चैतन्य घन । त्यासी तूं माणुस ह्मणसी कृष्ण । कुडी कल्पना हे तुझी ॥५६॥ ज्याची जैसी गे भावना । त्यासी तैसी फळे वासना । तुझी तुज भोंवे कल्पना । निजबंधना भवमूळ ॥५७॥ मग बोले सुभद्रा । तुवां कळंक लाविला कृष्ण चंद्रा । तुझी बुडाली ज्ञानमुद्रा । जन्मसमुद्रा पडलीसी ॥५८॥ कृष्ण सबाह्य परिपूर्ण । चिन्मात्रैक चैतन्य घन । तयासी कैसें जन्ममरण । जीवा जीवन श्रीकृष्ण ॥५९॥ तेथें पावली देवकी । म्हणे ज्ञानमूढे सत्राजिताचे लेकी । म्यां नव मास वाहिला कीं । तूं दानासी स्वामिनी ॥६०॥ तुझेनि बापें घातला आळ । विवरीं सूदला माझा बाळ । रीसा वरपडा गोपाळ । निजभाग्यें वांचला ॥६१॥ तुझेनि बापें तुज वर । केला सत्यधामा निर्धार । तूं दाटुनी निघालीस घर । मणी आंदणा म्हणवुनी ॥६२॥ त्या मणियाच्या लोभें जाणा । तुझा बाप मुकला प्राणा । तुवां मारिलें सत्यधामा । आणि पळविला अक्रूर ॥६३॥ जैं आणविलें हनुमंता । तैं तुज म्हणीतलें होयें सीता । नानावेश आणितां । परि सर्वथा नव्हेसी ॥६४॥ लाजा झालीस काळमुखी । तंव पाचारिली भीमकी ।



वचन मात्रें झाली जानकी । रामरूपीं आरूप ॥६५॥ यितें अंतरलें कृष्णसुख । सत्यभामा अधोमुख । मरमर करिती सकळही लोक । तेणें दुःख दुणावे ॥६६॥ जैसी का चोराची माये । धाय मोकलोनी रडोन लाहे । तैशीच दशा होत आहे । आंतचे आंत चरफडी ६७ हें ऐकोनी कोपला बळिभद्र जाणा । म्हणे वारू पालानारे पालाना । घाव घातला निशाणा । धांवे धांवण्या बंधूच्या ॥६८॥ कृष्ण पदांकित वाट । लागे मागे लगबग सुभट । अश्व गजांचें पैं थाट । घडघडाट पैं रथांचे ॥६९॥ आम्ही म्हणों ब्रह्मनिष्ठ नारद । हा तंव विश्वासघातकी मैंद । आमुचा मुगुटमणि गोविंद । ठकवूनियां नेतसे ७० कृष्ण सांगे नारदापुढें । कोपें बळिदेव पातले गाढे । ज्येष्ठ-पणें दडती पुढें । म्यां कवणीकडे पळावें ७१ नारद म्हणे कृष्णासी । तूं स्त्री ना पुरुष होसी । शेखीं नपूंसक नव्हेसी । भवभयासी भीसी तूं ७२ ऐसाचि तूं सदा भ्याड । जरासंध युद्धीं काढिला मोड । काळ यव-ना भेणें आड । मुचकुंदाचे रिघालासी ॥७३॥ कृष्ण कांपतसे गद्‌-गदां । नारद हांसे खदखदां । सेवक बळेंविण गोविंदा । नामरूप तुज नाहीं ॥७४॥ अवघी आपुलीच जाणसी । आपण आपणींया कां भीसी । तूं राहें माझे पाठिसी । मी कळिकाळासी पैं जाणें ॥७५॥ नारद ह्मणे यादवांसी । अभिमान धरावा देवासी । ते आपण या दिधलें दानासी । संबंध तुह्मासी पैं नाहीं ॥७६॥ देउनी मागुती घेसी दानासी । ते तंव होती रवरववासी । तेथुनी निर्गती नाहीं त्यासी । जेवी आचळ पां धर ॥७७॥ कृष्ण मज दिधला दाना । हें काय समस्त नेणां । छळणोक्ति करतां ब्राम्हणा । कुळक्षयो पावाल ॥७८॥ जारे पुसा सत्यभामेसी । प्रत्यक्षासी साक्ष या कृष्णासी । ठकऊनि नेईन यादवांसी । तरी दंडासी पैं लाभें ॥७९॥ तेथें पातले वसुदेव उग्रसेन । समस्त यादव मिळोन । धरिले नारदाचे चरण । जीवदान द्यावें आह्मां ॥८०॥ कृष्णाच्या पालटासी । जें मागाल तें देवऋषी । तें देउनी पदार्थासी । परी कृष्णासी सोडावें ॥८१॥ नारद म्हणे मज म्हातारपण । म्हणऊन कृष्ण घेतला दान । एकालिया न करवे गमन । हा सांगाती जीवाचा ॥८२॥ एक म्हणे ती

देऊं साठा । नारद म्हणे तो काय करंटा । चालों नेणे आमुच्चिया वाटा । फुकट पोटा कोण घाली ८३ आमुच्या चाली कृष्णासी चालणें । आमच्या कर्मकर्तव्यपणें । आमुच्या गुणें होय सगुण । धर्मसंरक्षण श्रीकृष्ण ८४ पाहतां श्रीकृष्णाचें मुख । फिकें होय समाधि सुख । स्वप्नीं न देखीजे दुःख । हरीखें हरीख कोंदाटे ८५ ऐसी कृष्णाची आस केली मोठी । म्हणोनि जीवेंभावें घातली मिठी । तुह्मी आह्मां भोंवतें शेवटीं । दिधलें दान मागतसां ॥८६॥ जळो जळो हें आमुचें दुःख । आशा सांडिली निःशेष । तुह्मांसी तंव द्यावें दुःख । अज्ञान मूर्ख ह्मणाल ॥८७॥ कृष्णाच्या पालटासी । कवण मागों पदार्थेंसी । जें जें उचित मानेल तुह्मांसी । शुद्ध वस्तु मज द्यावी ॥८८॥ श्रीकृष्ण पालटा सीमंतमणि । नेघों ह्मणती नारदमुनी । होईल सत्राजिताचे वानी । देहघातनी पैं लाभे ॥८९॥ जितुकें केलें कृष्णाचें तुक । तितुकें देऊनि कनक । नारद म्हणे आवश्यक । किती आग्रह करावा ॥९०॥ तुला उभविली झडझडा । कृष्ण बैसविला पारडां । सुवर्ण घालावें जंव पुढां । तंव सत्यभामा पातली ॥९१॥ ह्मणे मी कृष्ण दिधला दाना । तरी मी सोडवीन जाणा । मज मर्यादा नाहीं धना । मणी आंदणा बापाचा ॥९२॥ कृष्ण सोडवीन अभिमानेसी । ह्मणवुनी घाली कनकरासी । कृष्ण न तुके अहंकारासी । लगड मासी तैसें सोनें ॥९३॥ निःशेष सोनें सरलिया देखा । सत्यभामा अधोमुखा । तंव उठलिया यदुनायका । सोळा सहस्र सहमेळीं ॥९४॥ कृष्ण सोडवावा आपण । उपरा उपरी घालिती सुवर्ण । धनासमान नाहीं कृष्ण । नाहीं होणें कल्पांतीं ॥९५॥ गजामुखीं जैसी राई । तैसें सोनें झालें पाहीं । गोपिका म्हणती अगे आई । आतां काई घालावें ॥९६॥ विशेष द्रव्य वेंचलियावरी । लाजलिया सोळा-सहस्र नारी । धर्मवंता नातुडे श्रीहरी । सखा हरी दीनाचा ॥९७॥ घातलें द्वारकेचें भांडार । कुमरा कुमरींचे अळंकार । सकळ सुनांचे शृंगार । तुळा भार तरी नव्हेचि ॥९८॥ नगर नागरिक लोक । देती आपुलालें कनक । द्वारका निर्धन केली देख । तुळा जोख तऱ्ही नव्हे ॥९९॥ मोहें पातली देवकी । माझा बाळ मीच सोडवीं



निकीं। म्हणवुनी वरुषली कनकीं। वसुदेवा अच्युत ॥१००॥ मोहें घातलें कनक। मोहासमान नव्हे कृष्णतुक। मेरूपुढें जेंवी मशक। तैसें कनक होउनी ठेलें ॥१॥ रुपें तांबें पितळ। सिसें कांसें वाटोळ। धातु घातलिया सकळ। तुळा आढळ ते न ढळे ॥२॥ कृष्ण स्थूळ सूक्ष्म ना अचाट। सर्व सर्वांगीं निघोट। मेरूपरिस घनदाट। धराधरू बैसलासे ॥३॥ वस्त्रें भूषणें याचीं फेडा। कांहीं भार होईल थोडा। एक म्हणती कृष्णाचि कुडा। येणें वेडा लाविलें ॥४॥ भोळी सत्यभामा बापुडी। नारदें बुद्धि दिधली कुडी। कृष्ण अनुमोदनी फुडी। आपणा दान देवाविलें ॥५॥ एक ठकु एक महा ठक। ठकिले द्वारकेचे लोक। तरी न सुटे यदुनायक। तुळा तुक अपुरें ॥६॥ रत्नप्रवाळें मुक्ताफळें। तुका घातलें सकळें। नारदें केलें वाटोळें। तरी गोपाळ न सुटे ॥७॥ सुचले कृष्णाचें पारडें। धाये मोकलूनि देवकी रडे। वैरीण सत्यभामेनें केलें कुडें। उपाव पुढें दिसेना ॥८॥ मागें देखिलें ना ऐकिलें। तें तुवां दान इया केलें। भ्रतारासी दान दिधलें। ना ऐकिलें पुराणीं ॥९॥ देवकी धरी नारदाचे चरण। म्हणे मज दे गा पुत्रदान। नाहीं वालभरी सुवर्ण। तुझी आण वहातसें १० नारद म्हणे भीमकीपासीं। आहेत कनकाच्या राशी। वेगीं बोलावा तियेसी। ते कृष्णासी सोडवील ॥११॥ सत्य जनीं जनार्दन। सकळासी मानलें हें वचन। भीमकीचें शुद्ध पुण्य। कृष्ण सोडवण ते करील ॥१२॥ उद्धव पाठविला भीमकीपाशीं। साष्टांग नमन केलें तियेसी। मग सांगे वृत्तांतासी। येरी मानसीं हासिन्नली ॥१३॥ सपर्वत समूळ धरा। न पुरे कृष्णाचिया भारा। नारद लाघवी खरा। गर्व परिहारा यादवांच्या ॥१४॥ दोघांनाही दोन्हीपण। नारद तोचि नारायण। कवण जाणे हें विंदान। विचित्र खूण दोघांची ॥१५॥ मग जाऊनि वृंदावना। केली तुळसीस प्रदक्षिणा। पक्वदळ घेतलें जाणा। अपक्व तुका पैं नये ॥१६॥ ते घालुनी कनक ताटीं। वरी झांकुनी क्षीरोदक दुटी। निजात्मभावें गोरटी। चरित्र दृष्टी पाहूं आली ॥१७॥ केलें नारदासी नमन।

घेतलें चरणतीर्थ प्रार्थुन । मग शोडशोपचारीं पूजा करोन । जवळी पैं आली ॥१८॥ भिन्नभावें भजे देवासी । गंगा तळपे सागरीं जैसी । निजभावें कृष्णचरणासी । तुळा तुळसी ठेविले ॥१९॥ भावार्थाचें बळ गाढे । उचललें कृष्णाचें पारडें । सुवर्ण अधिक जालें पुढें । तें काढिती लवलाहे ॥२०॥ भीमकी भावार्थाची देख । तुळसीदळ एकलें एक । देवासमान झालें तुक । पडिलें ठक सुरनरां २१ भावार्थी विकला देव । अर्थासि या नाहीं संदेह । जयासी जैसा भाव । तैसा देव तयासी २२ केवळ तुळसीच्या दळीं । सोडविला वनमाळी । धन्य धन्य भीमक बाळी । पीटली टाळी एकदांची ॥२३॥ ऐका भावार्थाचा भावो । भावें सोडविला देवो । भावार्थी संदेहो । अगम्य भावो भीमकीचा ॥२४॥ कृष्ण देव तैं हे देवता । कृष्ण राम तैं हे सीता । कृष्ण वसंत तैं हे सुगंधता । सर्वांगीं समरस ॥२५॥ कृष्ण मंत्र हे मातृका । कृष्ण देव हे वेदिका । कृष्णयज्ञ हे यज्ञसीखा । अनन्यपणें दोघेंची २६ कृष्ण पुरुष हे प्रकृती । कृष्ण चैतन्य हे चित्‌शक्ती । कृष्ण परमात्मा हे परमज्योति । अनन्य स्थिती दोघांची ॥२७॥ कृष्ण ज्ञेय तैं तें ज्ञान । कृष्णध्येय तें तें ध्यान । कृष्ण साध्य तैं हें साधन । अनन्यपणें पतिव्रता ॥२८॥ सुवर्ण अधिक जाले जोखनी । काढूनि टाकिलें धरणी । कर पदक कंकणीं । नाना अलंकार स्त्रियांचे ॥२९॥ तेथें मीनलिया नारी । जैशा आमिषालागीं घारी । झोंबताती परस्परीं । माझें तुझें म्हणउनी ॥३०॥ एकी म्हणती माझा चुडा । दुजी म्हणे ओळख फुडा । तिजी म्हणे याचा जोडा । पाहें माझा मजपाशीं ॥३१॥ एकी ह्मणती गे फळगटे । तुझे कांखेचें माझें ताट । तिजी म्हणे संपुष्ट । माझें आंदणें बापाचें ॥३२॥ एकी म्हणे हें माझें कारलें । तिजी म्हणे ही खेंकीं सजिलें । तिजी म्हणे डोळां दांतवण नाहीं केलें । बुरसा स्वार्थ इचा घाण तो ॥३३॥ येरी म्हणे गे मोटी चोखट । सलोभ ईश्टा माखले वोंठ । बोल घाण ताहीं मठ । सांडीं खटपट देईं माझे ॥३४॥ एकी म्हणती माझी जडीत जाळी राखडीसी । दुजी ह्मणे डोळ्यांची आंबीली पुसीं ।

तिजी ह्मणे नयनीं विटाळसी जालीसी । जालासी रजकीं न लावीसी विटाळ ॥३५॥ येरी ह्मणे कटकटा मठ । ह्मणो ये आंबट । किती करशील खटपट । माझा वाटा नीट देई ॥३६॥ येरी म्हणे माझें पदक । दुजी ह्मणे वोजी वोळख । तिजी ह्मणे जीवा सुख । बोलोन कां करिसी ॥३७॥ अगे हे माझे हातसर । दुजी ह्मणे परती सर । तिजी ह्मणे मरमर । ते अलंकार पैं माझे ॥३८॥ एकी ह्मणे तें हे माझेचि रूपें । कृष्ण घडिले हे सोपे । दुजी ह्मणे माझेनि बापें । मज आंदण दिधलें ॥३९॥ तुझे हातींची माझी झारीं । तुझा गळाची माझी सरी । फुकट चावटी बेरी । तेल्या घरीं घाण्याची ॥४०॥ सुनेस म्हणे देवकी । अगे अगे ओढाळाचे लेंकी । ते अलंकार माझे कीं । तूं कैसेनी नेतेसी ॥४१॥ येरी ह्मणे मा मीसे । तुह्मांसी लागलें धनापिसें । ह्मातारपणें घेतलीत सोसें । माझें माझें ह्मणतसां ४२ यापरी जन विगुंतले सुवर्णी । रुक्मिणी घेउनी गेली कृष्णा । बाप धनलोभाची तृष्णा । निजपति कृष्णा विसरल्या ॥४३॥ मोह रचिला विधातेनी । कनक आणि कामिनी । जो विन्मुख यापासुनी । तोचि जनीं जनार्दन ॥४४॥ नारदें नमस्कारिली ती भीमकी । ह्मणे कृष्ण अनुभवीं तूंचि एकी । भली उतरलीस तुकीं । परम सुखी मी झालों ॥४५॥ दोघां केली प्रदक्षिणा । नमस्कारुनी कृष्णचरणा । मग वाहुनी ब्रह्मवीणा । उर्ध्व पंथें चालविला ॥४६॥ ऐसी कृष्णलीला विचित्र । महा पातकीयां करी पवित्र । जे आवडीं गाती कृष्णचरित्र । धन्य धन्य जिवीत्व तयांचें ॥४७॥ एकाजनार्दनीं नमन । संकल्पेंसी केलें दान । तेणें निरसिलें मीतूंपण । कथा कीर्तन तो सेवी ४८

---

## श्रीदत्तात्रयजन्म.

२४१३. ऐका दत्तात्रय आख्यान । पार्वतीस सांगे त्रिलोचन । सकळ पतिव्रतामाजी पूर्ण । अनुसूया जाण पतिव्रता ॥१॥ ऐकोनी शिवाची वाणी । गदगदां हांसे भवानी । आह्मां सींघीवरती त्रिभुवनीं । श्रेष्ठ कोणी असेना ॥२॥ गर्व देखोनीं पार्वतीचा । बोले त्रिलोचन तेव्हां वाचा । नारद सांगेल महिमा तिचा । तेव्हां तुज

कळेल ॥३॥ ऐकोनी पार्वती मनांत । नारदाची मार्गप्रतिक्षा करीत । तंव तो मुनी अकस्मात् । पावला तेथें ते क्षणीं ॥४॥ देखोनियां नारदमुनी । शोडशोपचारें पूजी भवानी । आह्मां तिघींवरती त्रिभुवनीं । आणीक कोणी असेना ॥५॥ ऐकोनी हांसला नारदमुनी । ऐकें पार्वती चित्त देऊनी । अनुसूया अत्री पत्नी । तुह्मां तिघीहुनी पतिव्रता ॥६॥ तुह्मां तिघींचे पुतळे करुनी । बांधिले असे वामचरणीं । असंख्य सामर्थ्य त्रिभुवनीं । समतुल्य कोणी असेना ७ तों पार्वती झाली चिंताग्रस्त । नारदातें उपाय पुसत । तो ह्मणे प्रार्थी विश्वनाथ । तो तेथवरी जाईल ॥८॥ नग्न होऊनि घालीं भिक्षा भोजन । तेणें होईल तिचें छळण । त्रिदें तुमचे देईल सोडून । मग गर्व सहजचि गळेल ॥९॥ पार्वतीसी ऐसें सांगोनी । स्वयें वैकुंठासी येत तत्क्षणीं । देखोनी लक्ष्मी संतुष्ट मनीं । मग पूजी आदरें तयातें ॥१०॥ कर जोडुनी करी विनंती । कांहीं नवल सांगा स्थिती । मागें झाली जे रीती । वदला प्रती विनोदें ॥११॥ ह्मणे धन्य अनुसूया पतिव्रता । तुह्मां तिघींहूनि समर्था । तुमचे पुतळे तत्वतां । तिनें तोडरीं बांधिले ॥१२॥ ऐकोनी तटस्थ झाली रमा । आतां काय करूं पुरुषोत्तमा । मजहुनी वाढ ऐसी सीमा । ते कैसेनी निरसेल ॥१३॥ नारद ह्मणे उपाय एक । तेथें पाठवा वैकुंठनायक । नग्न भोजन मागावें देख । तेणें ते छळेल ॥१४॥ सांगोनी ऐसा वृत्तांत । सत्यलोकासी गेला ब्रह्मसुत । सावित्री पुसे त्वरित । कांहीं अपूर्व वर्तलें ॥१५ मग तो ह्मणे सावित्रीसी । अनुसूया ऐशी गुणराशी । सामर्थ्य अधिक तियेपाशीं । पदीं तिघींसी बांधिलें ॥१६॥ सावित्री ह्मणे नारदाप्रती । कैसा उपाय करावा तीतें । जेणें भंगेल गर्वातें । शरण आह्मांतें येईल ॥१७॥ पाहतां आह्मापासूनि उत्पत्ती । एवढी काय तिची स्थिती । टिटवी काय समुद्राप्रती । शोखूं शके ॥१८॥ आम्हांहूनि काय वाड । ऐसें पीडिलें महागूढ । आतां उपाय सांगा दृढ । जेणें गर्व भंगेल तिचा ॥१९॥ मग ती ह्मणे नारदासी । काय उपाय करावा तिशीं । तंव तो ह्मणे सावित्रीशी । ऐक तुजसी सांगेन ॥२०॥ प्रार्थूनियां चतुरा-

नना । पाठवावें अत्रिभुवना । जायें तूं आतां याच क्षणां । आवश्य वचन बोलवी ॥२१॥ ह्मणावें दे नग्न भोजन । तेणें होईल तिचें छळण । मग यावें सत्व घेऊन । ब्रीद जाण तुटेल ॥२२॥ ऐसा नारद सांगून गेला । मग तिघी प्रार्थिती तिघांला । श्रुत करोनि नारद गेला । ह्मणवूनि विनविती ॥२३॥ ऐकुनी ऐसें वचनीं । तिघे निघाले तत्क्षणी । स्त्रियांची करुणा देखुनी मनीं । कृपा आली तयांसी ॥२४॥ मग पवन वेगें ते अवसरी । तिघे प्रवेशले आश्रमाभीतरीं । वहनें ठेवूनियां दुरी । माध्यानकाळीं पैं आले ॥२५॥ तंव ते ह्मणती तिघे जण । आह्मांस घेणें अनुसूया दर्शन । ऋषीनें आज्ञा करून । दारा बाहेर पाठविली ॥२६॥ ते देखोनि अत्रीऋषीनें । तिघांचे केलें सांग पूजनें । मग ह्मणे येणें काय कारणें । आवश्यक पैं झालें ॥२७॥ तंव द्वाराबाहेर तिन्ही मूर्ति । ब्रम्हा शीव कमळापती । नमस्कारू झालिया पुसती । काय आज्ञा ते सांगिजे ।२८॥ ते ह्मणे अनुसूयेसी । तूं पतिव्रतेमाजी श्रेष्ठ ह्मणविसी । तरी मागतों तें देईं आह्मासी । ह्मणोनि भाकेसी गोविलें ॥२९॥ मग ह्मणती तयाप्रती । तुमचें देणें त्रिजगतीं । आणि तुह्मी मागतां मजप्रती । इच्छा जैशी मागिजे ॥३०॥ देव ह्मणती होऊनि नग्न । आह्मांशी घालावें भोजन। अनुसूया अवश्य ह्मणे । मग काय करिती जाहली ॥३१॥ ठेवूनियां तिघांचे मस्तकीं कर । तंव ते तिघे झाले कुमर । मग नग्न होऊनि सत्वर । करवी स्तनपान तयातें ॥३२॥ करूनि तयांची उदर तृप्ती । वसन नेसली शीघ्रगती । मग घालूनि पालखीप्रती । गाती झाली तेधवां ॥३३॥ मग ह्मणे चतुरानना । जो जो जो जोरे सगुणा । उत्पन्न करूनि त्रिभुवना । बहु श्रम पावलासी ॥३४॥ याकारणें केलें बाळ। आतां राहिलें कर्तृत्व सकळ । स्तनपान करोनि निर्मळ । सुखें निद्रा करावी ॥३५॥ जो जो जो जोरे लक्ष्मीपती । तुझी तंव अगाध कीर्ति । अवतार धरूनि पंक्ती । दुष्ट संहार पैं केले ॥३६॥ ते श्रम पावलासी थोर । निद्रा करावी बा सत्वर । म्हणोनि केला कुमर । विश्रांती सुख पावावया ॥३७॥ जो जो जो जोरे बा शंकरा । महादेवा पार्वतीवरा । करोनि दुष्ट संव्हारा । बहु श्रम पावलासी ॥३८॥

तरी आतां सुखें निद्रा करीं । कुमारत्व प्राबले यावरी । आतां क्लेश नाहीं तरी । पालखाभींतरीं पहुडावें ॥३९॥ असे आखेद स्तनपान । पालखांत निजवी बाळकें पूर्ण । नित्य गीत गायन । भक्ती ज्ञान वैराग्य ॥४०॥ ऐसे गेले बहुत दिवस । मार्ग नाहीं जावयास । न सुटे बाळपणाचा वेष । सामर्थ्य विशेष अनुसूयाचें ४१ उमारमा सावित्रीतें । थोर गर्व होतां तिघींतें । तो निरसावयातें । विंदान केलें नारदें ॥४२॥ मागुती सांगे तिघीप्रती । काय निश्चित बैसल्याती । बाळकें करूनि तिघांप्रती । अनुसूया सती खेळवितसे ॥४३॥ नित्य करवी स्तनपान । षण्मासांचें बाळें करून । पाळण्यामाजी निजवून । गीत गायन करीतसे ॥४४॥ पाहतां ऋषीपत्नी जाण । परी सामर्थ्य आगळें तुह्मांहून । तिचे तुळणे न पुरे त्रिभुवन । आतां जाणे शरण तियेशी ॥४५॥ तंव त्या तिघीजणी बोलती । आह्मी तरी आदिशक्ती । आमुचे सामर्थ्य त्रीजगतीं । प्राणी वर्तती एकसरें ॥४६॥ सुरनर गंधर्व किन्नर । पशुपक्षी अपार । आमुच्या सामर्थ्यी थोर । चराचर नांदत ॥४७॥ तरी आमुचे आह्मीच पती । सोडवूं आपले सामर्थी । अनुसूया ते बापुडी किती । काय तिची कीर्ति आपुल्या पुढें ॥४८॥ ऐसें बोलोनी अभिमानी । तिघी निघाल्या ते क्षणीं । लगबग आल्या धांवुनी । अनुसूया भुवनीं तत्काळ ॥४९॥ तें देखोनियां ऋषीश्वरें । तिघी पूजिल्या षोडशोपचारें । काय आज्ञा पुसे त्वरें । ते प्रश्नोत्तरें सांगीजे ॥५०॥ मग त्या तिघीजणी बोलती । पाठवावें अनुसूयाप्रती । येरें आज्ञा करुनी शीघ्रगती । स्त्रीयाप्रती आणाविलें ॥५१॥ तंव ते पातलीसे त्वरें । केला तिघींसी नमस्कार । आज्ञा पुसे सत्वर । भाग्यें थोर आलेती ॥५२॥ तिघी ह्मणती आमुचे पती । आणून देईं शीघ्रगती । तंव त्या बाळकांच्या मूर्ती । पुढें क्षीतीं ठेविल्या ॥५३॥ तंव ते सारीखे बाळ तिन्ही । बोलूं नेणती वचनीं । तिघी चकीत झाल्या । परि कोण्हा न लक्षवेना ॥५४॥ सर्वेही सामर्थ्य बेचलें । अभिमान धैर्य गळालें । मग लोटांगण घातलें । चरण वंदीले सतीचे ॥५५॥ अनुसूया थोर तूं पतिव्रता । धन्य धन्य तुझी सामर्थ्यता ।

आह्मी लीन जाहलों पाहतां । नको निष्ठुरता करूं माये ॥५६॥ जैसे होते आमुचें पती । तैसे करावे पुढती । अगाध धन्य तुझी कीर्ति । पूर्ण सती पतिव्रता ॥५७॥ ऐकोनी सतीत्रयीचें वचन । तिघांचे मस्तकीं स्पर्श करून । कृपायुक्त अवलोकून । पूर्व चर्या तें आणिले ॥५८॥ तिघांचें स्वरूप जैसें होती । तैशा केल्या तिन्ही मूर्ती । देव आंतरिक्ष कवतुक पाहती । वृष्टी करिती पुष्पांची ॥५९॥ दुंदुभी वाजविल्या भेरी । आनंद झाला सर्वांतरीं । बोलिले सत्वरीं । अनुसूया तूं पतिव्रता ॥६०॥ त्रये देव म्हणती धन्य माते । आगाध सामर्थ्य तुझें सत्य । प्रसन्न झालों मागा वरातें । मनोरथ पूर्ण करूं हो ॥६१॥ मग ते बोले करुणावचन । अपूर्व तुमचें दरुशन । मज न गमे तुह्मांविण । अर्धक्षण जाणिजे ॥६२॥ तरी तिघे रूप असावें । एवढें वरदान मज द्यावें । आणीक न लगे स्वभावें । ह्मणोनी भावें प्रार्थितसें ॥६३॥ मग देवत्रयाची मूर्ती । करकमळीं जाली शीघ्रगती । दत्तात्रय नामें ऐसी ख्याती । तिहीं लोकांप्रती विशेष ॥६४॥ वर देऊनि गेला स्वस्थाना । शक्तीसहीत आरुढले वहना । सर्व देव समुदाव जाणा । स्वर्गभुवना पातले ॥६५॥ येरीकडे दत्तात्रय मूर्ती । बालरूपें अनुसूयेप्रती । पुढें व्रतबंध झाले निश्चितीं । आभ्यासिल्या सकळ कळा ॥६६॥ एकाजनार्दन ह्मणे । दत्तात्रय जन्मकथन । भावें करितां श्रवण । मनोरथ पूर्ण श्रोतियांचे ६७

---

## हनुमान जन्म.

३४१४. सुवर्च्यानामें स्वर्गींची देवांगना । ब्रह्मशापें जाणा घारी जाली ॥१॥ अयोध्येचा राजा दशरथ नृपाति । यज्ञ पुत्राप्रती करविला ॥२॥ शृंगीपायस पात्र दिधलें वसिष्ठा हातीं । त्वरें करीजेती तीन भाग ॥३॥ तीनभाग वसिष्ठें करूनी निश्चितीं । दिधलें राणी हातीं तिघी तीस ॥४॥ कैकई रुसली तेथें विघ्न जालें । घारीनें ते नेलें निजभागा ॥५॥ एकाजनार्दनीं घारी पिंड नेतां । पुढें जाली कथा श्रवण करा ॥६॥

३४१५. ऋष्यमूक पर्वतीं अंजनी तप करी । आठविला अंतरीं

सदाशिव ॥१॥ तपाचिया अंतीं शिव जाला प्रसन्न । मागे वरदान काय इच्छा ॥२॥ येरी म्हणे तुज ऐसा व्हावा मज पुत्र । ज्ञानी भक्त पवित्र उत्तम गुणी ॥३॥ म्हणतसे शिव अंजुळी पसरुनी । बैस माझे ध्यानीं सावधान ४ वायुदेव येउनी प्रसाद देईल तुजला । भक्षीं का वहिला अविलंबें ॥५॥ एकाजनार्दनीं घारीं नेतां पिंड। वायूनें प्रचंड आसुडिला ॥६॥

३४१६. वारीमुखींचा पिंड अंजनीच्या करीं । पडतां निर्धारीं भक्षियेला १ नवमास होतां जाली ती प्रसूत । दिव्य वायुसुत प्रगटला ॥२॥ वानराचा वेष सुवर्ण कौपीन । दिसती शोभायमान कुंडलें तीं ॥३॥ जन्मतांची जेणें सूर्यातें धरियलें । इंद्रादिकां दिले थोर मार ॥४॥ अमरपति मारी वज्रहनुवटि । पडिला कपाटीं मेरूचिया ॥५॥ वायुदेव येवोनी बाळ तो उचलिला । अवघाचि रोधिला प्राण तेथें ॥६॥ सकळ देव मिळोनी प्रसन्न पैं होती। वरदान देती मारुतीसी ७ सर्व देव मिळोनी अंजनीशी बाळ । देतां प्रातःकाळ होतां तेव्हां ८ तिथि पौर्णिमा चैत्रमास जाण । एकाजनार्दनीं रूपासी आला ॥९॥

---

## प्रल्हादचरित.

३४१७. हिरण्यकश्यपाचे पोटीं । भक्त जगजेठी प्रल्हाद ॥१॥ सदा वाचे नारायण । छंद आन नाहीं दुजा ॥२॥ एकाजनार्दनीं पाहुनी पिता । क्रोधें तत्त्वतां बोलत ॥३॥

३४१८. वांयां जन्मलें हें पोर । सदा हरी उच्चार करितसे ॥१॥ न कळे आपुली पैं याती । येणें धरिली हरिभक्ति ॥२॥ एकाजनार्दनीं निर्धार । याचा आमुचा वैराकार ॥३॥

३४१९. करीं विचार मानसीं । काय उपदेश पुत्रासी ॥१॥ नावडेचि राज्य धन । सदा पुत्रीं गुंतलें मन ॥२॥ काय जन्मला पामर । एकाजनार्दनीं भूमीभार ॥३॥

३४२०.बोलावुनी एकांतासी । सांगे विद्या अभ्यासासी ॥१॥सकळ विद्यांचें जीवन । मनीं धरी नारायण ॥२॥ एकाजनार्दनीं जाण । सदा घोकी नारायण ॥३॥

३४२१. नारायणीं बैसला भाव । दुजा ठाव शून्य दिसे ॥१॥ कायावाचा आणि मन । गुंतला प्राण नारायणीं ॥२॥ एकाजनार्दनीं द्वैत । बैसला चित्तांत सर्वदा ॥३॥

३४२२. पिता क्रोधें पुसे बाळा । काय शिकला तें सांगें ॥१॥ येरु ह्मणे नारायण । कांहीं यावांचून मी नेणें ॥२॥ एकाजनार्दनीं ऐकतां मात । जाहला संतप्त मानसीं ॥३॥

३४२३. ऐसा पुत्र असोनि काय । जो नारायणासी ध्याय ॥१॥ मुख्य आमुचा जो वैरी । त्यासी चिंती हा निर्धारीं ॥२॥ बाळ नोहे केवळ काळ । एकाजनार्दनीं लडिवाळ ॥३॥

३४२४. सांगे स्त्रियेसी एकांतीं । पुत्रें मांडिली भगवद्भक्ति ॥१॥ यासी आतां करावें काय । शिकविलें ऐकों न जाय ॥२॥ एकाजनार्दनीं मन । येणें धरिलें नारायण ॥३॥

३४२५. माता ह्मणे प्रल्हादासी । वडिलें शिकविलें नायकशी १ कांहीं नायकसी शिकविलें । विद्या अभ्यास वहिलें ॥२॥ एका-जनार्दनीं ऐकुनी मात । प्रत्युत्तर तया देत ॥३॥

३४२६. सर्व विद्यांचा जो धनी । मोक्षदानी चिंतीतों ॥१॥ मज आणिकांचें नाहीं काम । माझा सखा पुरुषोत्तम ॥२॥ माय-बाप सर्व गोत । एकाजनार्दनीं भगवंत ॥३॥

३४२७. ऐकोनियां पुत्राचें वचन । मातेनें वर्तमान कथियेलें १ तेणें तया क्रोध भरलासे मनीं । दूतालागुनी तत्क्षणीं आज्ञा केली २ एकाजनार्दनीं करिती यातना । परी नारायणा आठवीत ॥३॥

३४२८. नानापरी दूत मारिती निष्ठुर । शस्त्रांचे दुस्तर घाय हाणती ॥१॥ अग्नींत घालिती पाणीयें बुडविती । ढकलोनियां देती पर्वतशिखरीं ॥२॥ एकाजनार्दनीं रक्षी नारायण । कोण करी विघ्न तया भक्ता ॥३॥

३४२९. विषादि पाजिती पुरीं ढकलिती। परि निर्भय तो चित्तीं घेत नाम ॥१॥ संतप्त होउनी पुसताती बाळा । काय वेळो-वेळां आठविशी ॥२॥ एकाजनार्दनीं नाम जपे होटीं । मानीच नावडी बोल त्याचे ॥३॥

३४३०. क्रोधेंयुक्त पिता पुसे प्रल्हादासी । सांग हृषिकेशी कोठें आहे ॥१॥ येरू म्हणे जळीं स्थळीं काष्ठीं भरला । व्यापुनी राहिला दिशाद्रुम ॥२॥ एकाजनार्दनीं ऐकतांचि मात । मारितसे लाथ स्तंभावरी ॥३॥

३४३१. दुर्जन तो लाथ मारी खांबावरी । स्तंभीं नरहरी प्रगटला ॥१॥ धांवूनियां हरी आडवा तो घेतिला । हृदयीं विदारिला हस्तनखीं २ एकाजनार्दनीं भक्तांचें रक्षण । स्वयें नारायण करितसे ३

३४३२. अवतार नरहरी । केली दैत्याची बोहरी ॥१॥ प्रल्हादासी आलिंगन । स्वयें देत नारायण ॥२॥ भक्तवचनालें मान । एकाजनार्दनीं सत्य जाण ॥३॥

३४३३. स्तंभ फोडीत कटकट । दाढा व्यंकट विकट । उद्भट विर विकट । नरकेसरी ॥१॥ जिव्हा लळलळित लटलट । घुरघुरीत कंठ । स्वासें नासापुट उतट । पिंगट जटाजूट दाट ॥२॥ बाण सणसणाट । वज्र दणदणाट । नखें तिखें तिखट बोट । रागें फोडी पोट ॥३॥ हाततट सुभट भट । नेत्र गरगराट । चंद्र सूर्य गरगराटे ॥४॥ शब्द कट कट । साधनीं कष्ट फुकट । एकाजनार्दनीं नामें वैकुंठपीठरे ॥५॥

---

## ध्रुवचरित्र.

३४३४. सूर्यवंशामाजी उत्तानपाद राय । सत्यधर्मी होय पराक्रमी ॥१॥ भूतांचा मत्सर नाहीं तेथें द्वेष । चारी धर्म निर्दोष चालताती ॥२॥ प्रजेलें समाधान अपत्याचे परीं । ऐसा राज्य करी न्याय नीती ॥३॥ एकाजनार्दनीं होउनी सावधान । ऐका वर्तमान काय पुढें ॥४॥

३४३५. वडील धाकुली ऐशा दोन जाया । संतान तें तयां नसे कांहीं ॥१॥ वडील पट्टराणी ममता तिजवरी । धाकुलीस अव्हेरी क्षणक्षणां ॥२॥ ऐसा कांहीं काळ लोटलियावरी । धाकुलीस निर्धारीं पुत्र जाहला ॥३॥ तयाचें तें नाम ध्रुव पैं ठेविलें । एकाजनार्दनीं जाहलें नवल तेथें ॥४॥

३४३६. पंच वर्षांचा बाळ खेळे नाना खेळ। मेळवोनी मेळ सवंगडियांचा ॥१॥ सवगड्यांत खेळे विटीदांडू चेंडु। नामाचा तो छंदु मुखीं सदा ॥२॥ खेळतां खेळतां राजवाड्या आला। न कळे तयाला राजा कवण ॥३॥ एकाजनार्दनीं पाहूनियां बाळ। मोहें त्या तात्काळ उचलिलें ॥४॥

३४३७. अंकावरी घेउनी खेळवी नानापरी। मोहाची तों थोरी ऐशी आहे ॥१॥ वडील ती स्त्री येऊनियां पाहे। राजअंकीं आहे कोण बाळ ॥२॥ सापत्न तो भाव धरूनियां पोटीं। पदें तया लोटी अंकावरुनी ॥३॥ रडत रडत तेथोनी निघाला। एकाजनार्दनीं आला माता जेथें ॥४॥

३४३८. सांगे मातेप्रती सापत्नें लोटिलें। म्हणोनी वाटलें दुःख मज ॥१॥ येरी म्हणे बाळा नको करूं खेद। दैव नाहीं शुद्ध आपुलें तें ॥२॥ आपुलिया दैवीं देवें जें लिहिलें। भोगणें प्राप्त जाहलें आपणासी ॥३॥ एकाजनार्दनीं देवाविण शीण। निवारील कोण दुजा बापा ॥४॥

३४३९. माता समाधान करी त्या बाळाचें। परि चित्त त्याचें गुंतलें देवीं ॥१॥ मातेलागीं पुसे देव कोठें आहे। येरी म्हणे सबाह्य कोंदलासे ॥२॥ एकाजनार्दनीं ऐकोनियां मात। केला प्रणिपात मातेलागीं ॥३॥

३४४०. सबाह्य अभ्यंतरीं देव आहे हा निर्धार। करुनी सत्वर मार्ग धरी ॥१॥ नुठवी सापत्न माता ऐसा धरुनी हेत। चालिला त्वरीत वनालागीं ॥२॥ एकाजनार्दनीं माता मागें लागे। पुढें लागवेगें पळतसे ॥३॥

३४४१. जाउनी निरंजनीं तप आरंभिलें। धांवे देवा वाहिलें ओभासे ॥१॥ आलब्धाचा ठेवा वैष्णवांचा रावो। नारद तो हा हो आला तेथें ॥२॥ पाहिलासे बाळ सुकुमार सांवळा। दृष्टीं कळवळा आला मनीं ॥३॥ एकाजनार्दनीं पाहुनी निर्धारीं। मंत्र द्वादशाक्षरी सांगतसे ॥४॥

३४४२. ठेवूनियां हात गेला नारदमुनी। मंत्र हृदय ध्रुवनीं

प्रकाशला ॥१॥ उच्चार करितां त्रिभुवन ठेंगणें । विसरला मनें सापत्न दुःख ॥२॥ आठवे गोविंद माधव अच्युत । वाचेसी जपत रामनाम ॥३॥ एकाजनार्दनीं दासाची कळवळ । धांवला तात्काळ देवराव ॥४॥

३४४३. वैकुंठींचा राणा येउनी लवलाहें । सुकुमारा पाहे अवलोकुनी ॥१॥ धांवूनियां देव गळां घाली मिठी । आलिंगिला पोटीं सद्गदीत ॥२॥ ह्मणे बाळा काय इच्छा पोटीं आहे । माग लवलाहें पुरवीन ॥३॥ एकाजनार्दनीं नुठवी दुजी आई । ऐसें कांहीं देईं मजलागीं ॥४॥

३४४४. ऐकोनियां ऐसें कोमळ उत्तर । भक्त करुणाकर काय करी ॥१॥ अढळ ते पदीं स्थापियेला बाळ । जाहला जयजयकार तयेवेळीं ॥२॥ नुठवे दुजी आई ऐसा स्थापियेला । आपण निघाला वैकुंठासी ॥३॥ एकाजनार्दनीं भक्ताचें चरित्र । स्वयें राजीवनेत्र वदतसे ॥४॥

३४४५. अनाथाचा नाथ पतीत पावन । ब्रीद सत्य जाण करितसे ॥१॥ अनंत भक्तांचें अनंतें धांवणें । वाढविलें तेणें नामासाठीं ॥२॥ एकाजनार्दनीं भक्ताचा अंकित । हांकेसरसा त्वरित उडी घाली ३

३४४६. न पाहे यातीकुळाचा प्रचार । धांवे सर्वेश्वर नामासाठीं ॥१॥ आपुलेंचि नाम आपण वाढवी । भक्तपणा मिरवी आपणचि २ स्वयें अवतार आपणाचि घेत । एकाजनार्दनीं मात ऐका त्याची ३

## उपमन्यूकथा.

३४४७. होऊनि सावधान चित्ता । ऐका उपमन्यूची कथा । एका भावें ऐकतां । सायुज्यता पाविजे ॥१॥ उपमन्यु मागितलें । देवें तयासी दिधलें । तें सांगेन वहिलें । चित्त देउनी परियेसा ॥२॥ ब्राम्हणासी पुत्र झाला । पित्यासी हर्ष वाटला । थोर कष्टें वाढविला । स्नेहो आशा धरुनी ॥३॥ बाळक तो जाणता । पित्यासी उपजली चिंता । एकाजनार्दनीं तत्त्वतां । वचनार्थ परिसावा ४

३४४८. मातेसी ह्मणे बाळ । दूध पितीं मुलें सकळ । मजही

दूध तत्काळ । माते देई भोजना ॥१॥ मग ते करडया वांटुनी । जननी काढी शुभ्र पाणी । बारे दूध ह्मणोनी । वाटीये भात कालविला ॥२॥ तंव शेजारीं ब्राह्मणें श्राद्ध केलें । तयाचिया घरां जेवावया नेलें । बरवें उत्तम पक्वान्न वाढिलें । नानापरी भोजना ॥३॥ बाळासी वाढिली दूध क्षीरी । तें जेविलें पोटभरी । एकाजनार्दनीं निर्धारीं । गेलें आपुल्या गृहासी ॥४॥

३४४९. गेला आपुल्या गृहाप्रती । बाळ तो निद्रा न करी रात्रीं । क्षुधा लागलीसे बहुती । मागे दूधभात जेवाया ॥१॥ पुढें ती करडया वांटुनी । काढिलें शुभ्रपाणी । येरें टाकिलें थंकोनी । ह्मणे माते कालीचें नव्हे ॥२॥ बारे त्या समर्थाचे घरीं । देवें दिधलीं दूध क्षीरी । आह्मा दुष्कृताचे घरीं । तें कैंचें रे बाळका ॥३॥ कोठें आहे तो श्रीहरी । दाखवी मज निर्धारीं । एकाजनार्दनीं परी । ध्यान लागलें हरीचें ॥४॥

३४५०. बरवी श्रीहरीची मूर्ति । देव्हारा पूजिली होती । बारे हा लक्ष्मीचा पती । दूध मागे तयासी ॥१॥ ऐशीं तिघे उपवास करती । मातापितरें चिंतेंत पडती । जन मिळाले बहुती । तयासी उठऊं आदरिलें ॥२॥ बाळारे तुज कारण । बांधूं सहस्र गोधन । येरू ह्मणे नायके वचन । मज देईल श्रीहरी ॥३॥ माता ह्मणतां हें वचन । दूध आणिलें ब्राह्मणाचे घरींहून । एकाजनार्दनीं वचन । असंतोषित बाळ तें ॥४॥

३४५१. दूध आणिलें परगृहींहुनी । संतोष नाहीं माझें मनीं । श्रीहरी देईल मजलागुनी । तरीच दूध घेईन ॥१॥ पिता ह्मणतां हें वचन । बाळा तूं अज्ञान । कां वार्जिलें अन्नपान । क्षुधा बहुत पीडिलसे ॥२॥ तंव बोले उपमन्यु । भोजन न करी दुधावांचून । श्रीहरी देईल मजलागून । तरीच भोजन करीन ॥३॥ देवा त्वां ध्रुवा अढळपद दिलें । मजलागीं निष्ठुर मन केलें । एकाजनार्दनीं बोले । बाळ वाचे सद्गद ॥४॥

३४५२. ऐकोनी दुधाची बोली । कां मनीं निष्ठुरता केली । श्रीयाळ सत्वें राखिली । नगरी नेली वैकुंठा ॥१॥ अंबऋषीच्या

बोला । दाहीही अवतार नटला । माझे देखोनी उणिवाला । दूध कांहो न देसी ॥२॥ शरीर कवेंती भेदीन । अष्टांग योग साधीन । भक्तिबळें तुज काढीन । हुडकोनी तत्त्वतां ॥३॥ ऐकोनी तो शब्द करुणा । एकाजनार्दनीं धावे जाणा । माझिया भक्ताचिया वचना । उणीवता येऊं नेदी ॥४॥

३४५३. सुदर्शन घेउनी हातीं । पावला तो लक्ष्मीपती । देखतांची श्रीपती । तन्मय बाळ जाला ॥१॥ बाळकें धरिले चरण । देवें दिधलें आलिंगन । करें कुर्वाळुनी वदन । चुंबनातें दिधलें २ देव ह्मणे बाळकातें । काय अपेक्षा माग मातें । बाळ बोलें दूधभातें । मातें देईं सत्वर ॥३॥ हांसे वैकुंठींचा राणा । बाळक हें अज्ञान । एका जनार्दनीं शरण । काय मागणें मागत ॥४॥

३४५४. ऐके देवा सावधान । एवढें पुरवावें जाण । दुधावांचुनी दुसरें आन । न मागें मी सर्वथा ॥१॥ मातापिता उपमन्यु । तिघे गरुडावरी बैसून । क्षीर सागरीं नेऊन । इच्छा त्यांची पुरविली ॥२॥ राज्य दिधलें क्षीरसागरीचें । अमर शरीर केलें त्याचें । नित्य दर्शन श्रीहरीचें । सायुज्यता दिधली ॥३॥ एका जनार्दनीं शरण । उपमन्यु आख्यान पावन । श्रीव्यासें कथिलें जाण । तेंचि येथें वर्णिलें ॥४॥

---

## सुदामचरित्र.

३४५५. सुदामा संवगडी । त्याची बहु गोडी हरीसी ॥१॥ बाळपणीं खेळले खेळ । विद्या सकळ गुरुगृहीं ॥२॥ कृष्ण द्वारकेसी आला । सुदामा राहिला सुदामपुरीं ॥३॥ एकाजनार्दनीं सात्रें । परिसा चरित्र भक्ताचें ॥४॥

३४५६. पृथ्वीवरुता दुष्काळ पडला । न मिळे कोणाला धान्य कण ॥१॥ समर्थ तीं सत्त्व टाकिती बापुडीं । दुबळ्या तांतडीं कोण पुसे २ एकाजनार्दनीं काळाचें तें मान । सुदामा ब्राह्मण दैन्यवाणा ३

३४५७. कन्यापुत्रादिक मरती उपवासी । उपाव तयासी कांहीं न चाले ॥१॥ आणूनियां तृण बीज ते भक्षिती । निर्वाह या

रीतीं चालविती ॥२॥ वस्तीसी त्या ठाव न देती कोण्ही । दुर्बळ म्हणोनि उपहासिती ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसें भोगी दुःख । तयासी तें सुख स्वप्नीं नाहीं ॥४॥

३४५८. एकाचे अंगणीं राहिला परिवारें । उदर तों न भरे दुःख करी ॥१॥ कांता पुत्र स्वयें क्षुधेनें मरती । होतसे फजिती प्रपंचाची ॥२॥ बैसोनियां कांता विचार तो सांगे । द्वारके लागवेगें जावें तुह्मीं ॥३॥ कृष्णजी कृपाळु बंधु तुम्हां मानी । एकाजनार्दनीं कांता बोले ॥४॥

३४५९. तयाचिये भेटी जावें उठाउठीं । कृपाळु जगजेठी उदार तो ॥१॥ पूर्वीं उपमन्यूसी क्षीर सागर दिधला । अढळपदीं ठेविला बाळ ध्रुरू ॥२॥ राक्षसाचे कुळीं बिभिषण जाण । लंकेसी स्थापन चंद्रार्क तो ३ एकाजनार्दनीं उदार सर्वज्ञ । एक नारायण समर्थ तो ४

३४६०. ऐकोनियां ऐसें कांतेचें वचन । चित्त समाधान सुदाम्याचें ॥१॥ ह्मणतसे भेटी रिक्तहस्तें नवजावें । हा शास्त्राचा प्रवाहो भाष्य असे ॥२॥ देव द्विज गुरु या तिघांचें दरुशन । रिक्तपणें जाण न घ्यावें जी ॥३॥ एकाजनार्दनीं करूनि विचार । भेटीचा निर्धार बाणलासे ॥४॥

३४६१. पतिव्रता सती उठोनि सकाळीं । शेजारिणी सदनीं येती जाहली ॥१॥ अहो माते पती जाती कृष्णदरुशना । कांहीं तरीं धान्या देईं मज ॥२॥ ऐकोनियां ऐसें पतिव्रतेचें वचन । जाहलें समाधान चित्त तेणें ॥३॥ एकाजनार्दनीं हरिकृपा पूर्ण । पोहे दिले जाण तीन मुष्टी ॥४॥

३४६२. घेऊनि लवलाही गृहासी ती आली । मनीं संतोषली आनंद भरित ॥१॥ पतीसी तत्त्वतां दिले ते पृथक । बांधावया वस्त्र धड नाहीं ॥२॥ शत एक ग्रंथी वस्त्रासी बांधोनी । निघाला तेथोनि झडझडा ॥३॥ पतिव्रता बोले लवकरी यावें । एकाजनार्दनीं बरवें ह्मणोनि निघे ॥४॥

३४६३. निघतां उत्तम शकुन ते जाहले । तेणें संतोषलें चित्त त्याचें ॥१॥ तांतडीनें द्वारके येऊनि पावला । सभामंडप देखिला दृष्टीभरी २ एकाजनार्दनीं द्वारपाळ पुसती । तुह्मी कोण तें निश्चितीं सांगा द्विजा ३

३४६४. करुणावचनीं बोलतसे स्ववाणी । कृष्णाचा बंधु जनीं म्हणताती ॥१॥ ऐकोनियां दूत हांसती मानसीं । जगद्बंधु सर्वांसी होय हरी ॥२॥ एकाजनार्दनीं वंदुनी सांगती । द्विज एक अवचितीं बंधु म्हणे ॥३॥

३४६५. सर्वांचा तो आत्मा कळली तया खूण । बाळपणींचा जाण सुदामा तो ॥१॥ उठोनी सत्वर धांवे आलिंगना । वैकुंठींचा राणा लवलाहें ॥२॥ एकाजनार्दनीं देउनी आलिंगन । आणिला संबोखून सुदामा तो ॥३॥

३४६६. आणूनियां सिंहासनीं बैसविला । पूजा उपचार केला षोडशोपचार ॥१॥ वस्त्र अलंकार देउनी गौरविला । मग पुसता जाहला क्षेम सर्व ॥२॥ अष्टनायकादि मिळालीसे मांदी । नमिती आनंदीं सुदाम्यासी ॥३॥ एकाजनार्दनीं सारुनी भोजन । सुख-रूप शयन करविलें ॥४॥

३४६७. प्रातःकाळ जाहला मिळाल्या नायका । उष्णोदकें देखा अभ्यंगिती ॥१॥ सोळा सहस्र शत अष्ट त्या नायका । विनोद तो देखा मेहुणपणें ॥२॥ घालूनियां स्नान वस्त्र अलंकार देती । भोजन सारिती यादव पंक्ती ॥३॥ एकाजनार्दनीं बैसले निवांत । मग कृष्णनाथ काय बोले ॥४॥

३४६८. वहिनीनें आह्मां काय धाडियेलें । मग आठवलें सुदाम्यासी ॥१॥ म्हणे माझें वस्त्र ग्रंथी कोठें आहे । तंव ती आणुनी देतसे जगन्माता ॥२॥ बंधूची संपदा पहा कृष्णनाथा । सत्यभामा तत्त्वतां बोलतसे ॥३॥ सोडोनियां ग्रंथी समग्र ते केले । पुढें वोडविले कर देवें ॥४॥ एकग्रास मुखीं घालितांचि जाण । एकाजनार्दनीं खूण समजली ॥५॥

३४६९. मनामधीं तर्क करी भीमक बाळी । त्रैलोक्यचि सकळीं देईल राज्य ॥१॥ ह्मणोनी विनोदें धरीतसे हात । एक ग्रास मुखांत घालितांचि ॥२॥ आम्हांसी तों कांहीं प्रसाद जी द्यावा । खूण ती केशवा कळली मनीं ॥३॥ एकाजनार्दनीं हांसे चक्रपाणी । न कळे कोणा करणी त्याची कांहीं ॥४॥

३४७०. अंतरीं विचार करितो श्रीहरी । सुदाम्याचे घरीं फार कष्ट ॥१॥ विश्वकर्म्यालागीं पाचारिलें तेव्हां । सांगतसे निर्मावा ग्राम ऐसा ॥२॥ जैशी हे द्वारावती दिसती साजिरी । ऐशी सुदामपुरी रची वेगीं ॥३॥ एकाजनार्दनीं तुष्टलासे देव । मग कैंचे भेव दैन्याचें तें ॥४॥

३४७१. सर्व सामोग्री ते भरुनी ठेविली । द्वारकेसम निर्मिली सुदामपुरी ॥१॥ विश्वकर्मा येउनी वंदोनियां पाय । निर्मिला तो आहे ग्राम तेथें ॥२॥ एकाजनार्दनीं ऐसें करुनी कृत्य । मग जगन्नाथ काय बोले ॥३॥

३४७२. काय चरितार्थ प्रपंचाचा आहे । सुदामा तो वाहे नेत्रीं जळ ॥१॥ एक मास येथें राहिलों निवांत । घरची तों मात न कळे कांहीं ॥२॥ जोडोनियां हात विनवी चक्रपाणी । आज्ञा मजलागुनी द्यावी आतां ॥३॥ एकाजनार्दनीं नाटकी तो देव । दावितसे भाव भक्तालागीं ॥४॥

३४७३. रुक्मिणीसी सांगे स्वयें कृष्णनाथ । याचें वस्त्र त्वरित आणूनि द्यावें ॥१॥ आणूनियां ग्रंथी देई जगन्माता । वस्त्र अलंकार तत्वतां काढुनी ठेवा ॥२॥ जीर्ण तें वस्त्र करुनी परिधान । वंदिले चरण कृष्णजीचे ॥३॥ एकाजनार्दनीं करुनी नमन । निघाला ब्राह्मण तेथोनियां ॥४॥

३४७४. ग्रामाचे बाहेरी येवोनि श्रीहरी । सुदाम्यासी भेटुनी करी समाधान ॥१॥ जोडोनियां हात विनवी सुदामा । पूर्ववत प्रेमा असों द्यावा ॥२॥ एकाजनार्दनीं बोलोनियां ऐसें । तांतडी निघतसे क्रमीत मार्ग ॥३॥

३४७५. बहुत विचार करीत मानसीं । काय प्रारब्धासी करील कृष्ण ॥१॥ आह्मासी तों पूर्ण दरिद्र भोगणें । तेथें नारायणें काय कीजे ॥२॥ एकाजनार्दनीं करीत विचार । चालिला सत्वर ग्रामपंथें ॥३॥

३४७६. चालतांना वाटे अपूर्व देखिलें । मनीं ह्मणे वहिलें द्वारका दिसे ॥१॥ भ्रमलासे मनीं न सुचे विचार । ह्मणे द्वारके

